कॉंटिनेंटल् प्रकाशन···५४

# शमीपूजन

( राज्यक्रांतीचा पहिला प्रयत्न )

लेखक

**काशिनाथ नरसिंह केळकर**, ॲडव्होकेट

हिंदु व्यवहार धर्मशास्त्र, नव्या स्मृतीची आवश्यकता;
नेपोलियन व हिटलर इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

१९४७

किंमत पांच रुपये

# ग्रंथकर्त्याचे चार शब्द

दहा वर्षांपूर्वी या विषयावर जें पुस्तक लिहिण्याचा संकल्प केला तें आज हातावेगळे होऊन प्रसिद्ध होत आहे याबद्दल समाधान वाटतें. १९३७ सालीं झांशीची राणी लक्ष्मीबाई या थोर स्त्रीबद्दल फिलिप फॉक्स या साहेबानें बदनामीकारक मजकूर लिहिला, त्याविरुद्ध चळवळ करतांना या बंडाचा कांही इतिहास मी वाचला. पण हा विषयच इतका चित्तवेधक आहे कीं, इतिहासाचीं आणखी पुस्तकें वाचून त्यांत खोल शिरावेसें वाटलें. त्याच सालीं मी झांशी, कानपूर, ग्वाल्हेर, ब्रह्मावर्त इत्यादि ठिकाणीं मुद्दाम प्रवास करून ही सारीं ऐतिहासिक ठिकाणें पाहिलीं यामुळें तो सारा इतिहास सजीव होऊन दृष्टीसमोर उभा राहिला! विशेषतः ब्रह्मावर्तास गंगेच्या विस्तीर्ण पात्राकडे निश्चल दृष्टि ठेवून पाहात असतां, शेंकडों विचारतरंग मनांत आले आणि असें वाटलें कीं, या अनेक ठिकाणीं राष्ट्रीय अभिमानाच्या हटातटानें जें पूर्वी घडून आलें तें कोणाला तरी यथार्थ रीतीनें वर्णन करून सांगतां येईल काय? त्या महायज्ञांत हजारों लोकांचें बलिदान झालें, शेंकडों माणसें तोफेच्या तोंडी दिलीं गेलीं, हजारोंनी निर्वासितांचें जीवन व अज्ञातवास भोगला. त्यांचें जीवन जगानें पाहिलें नाहीं, ऐकलेंहि नाहीं. त्यांच्या दुःखाला कोणी वाचा फोडली नाहीं. बंड हा शब्द तर राहोच, पण त्यानंतर पन्नास वर्षेपर्यंत 'स्वराज्य' हा शब्द उच्चारण्याचीहि चोरी होती. त्या महायज्ञांत समग्र पेशवेकुल नष्ट झालें; व अनेक त्यागी माणसें कीं आतां ज्यांची इतिहासांत नांवनिशाणी देखील राहिली नाहीं, तीं नामशेष झालीं! त्यांच्या वासनांचे पुढें काय झालें? ज्या इंग्रजी राज्याविरुद्ध त्यांनीं झगडा केला तें आज देखील आहेच! मग त्यांचा स्वार्थत्याग फुकट गेला काय? हा विचार मनाला फार अस्वस्थ करूं लागला आणि आपण हें ऐतिहासिक ऋण कांहींतरी स्मरावें अशा विचारानें प्रस्तुत ग्रंथकर्त्यानें हें पुस्तक लिहिण्याचा संकल्प केला.

जसजशीं इतिहासाचीं साधनें म्हणजे ग्रंथ वगैरे वाचत होतो तसतसें एकीकडे वर्तमानपत्रांत हा विषय जागृत ठेवण्याकरितां प्रसंगानुसार मी लेखहि लिहीत होतो. कारण नेहेरु वगैरे पुष्कळांनीं या विषयाची जी मीमांसा केली ती मला पटत नव्हती. हल्लीच्या राज्यक्रांतीविषयी ज्याचे जे राजकीय विचार असतील त्याच दृष्टीनें

तो इतिहास पाहणार! याकरितां मी केसरींत १९३८ सालीं ज लिहिलें त्यांतील एक उताराच मुद्दाम पुढें देतोः—

"बंडासारखी गोष्ट करूं म्हटल्यानें होत नाही. कीं कांही हुकुमी नसते. सातारा, नागपूर हीं राज्यें, इतकेंच काय पण १८१८ सालीं प्रत्यक्ष पेशवाई बुडाली तरीहि अशा व्यापक प्रमाणावर इंग्रजांना सळो का पळो करून सोडणारे बंड झालें नाही. तें चाळीस वर्षांनंतर १८५७ सालीं झालें व त्याला तात्कालिक निमित्त नुसत्या काडतुसाचें पुरलें! याचाच अर्थ असा कीं, वादळाचे ढग जमत होते. नुसता प्रजेचा असंतोषहि पुरा पडला नसता. त्यावेळीं साऱ्या हिंदुस्थानांत ब्रिटिश फौज सारी चोवीस हजार होती. हिंदुस्थानबाहेर सैन्य गुंतलें होतें, तेथे इंग्रजांचे पराभव होत होते. हिंदु संस्थानिक व मुसलमानी राज्यें या दोघांच्याहि बाबतींत सरकारने बेइमानाने तहनाम्यांना हरताळ फासला होता, म्हणूनच बंडाच्या पुढाऱ्यांना सरकाराविरुद्ध असंतोषाचें वादळ एकत्र करून प्रक्षोभाची ठिणगी पाडता आली. त्या वेळीं हिंदी प्रजेच्या हातीं शस्त्र होतें, हिंदु-मुसलमानांची एकी आटोकाट होती, बेदिल झालेली कां होईना पण इंग्रजांच्या हाताखाली शिक्षण घेतलेली कवायती फौज बंडवाल्यांना सामील होती, आणि सर्वांत दुर्मिळ गोष्ट म्हणजे झांशीची महाराणी, तात्या टोपे, नानासाहेब पेशवे, तसेंच अयोध्या, लखनौ, बांदा, दिल्ली इत्यादि ठिकाणचे अनेक मुसलमान सरदार जातीने पुढारीपण करण्याला लाभले होते. अशा स्थितींत देखील सशस्त्र बंडाला यश आले नाही! आज पाहावें तों हिंदी लोकांना शस्त्र वापरण्याचा हक्क नाही, हिंदु मुसलमानांत एकी नाही, सैन्यांत शिरकाव नाही व व दुसरें सैन्य हातीं येण्याची खात्री नाही. सरकारवर बाहेरून परचक्र येऊन इंग्रज सरकार दुसरीकडे युद्धांत गुंतलें जाण्याचा संभव नाही, आणि भौतिक शास्त्र-विद्येमुळे जी युद्धकला पाश्चात्य राष्ट्रांत गेल्या ५० वर्षांत आता अगदी शिखरास पोंचली आहे तिचें ज्ञान हिंदी लोकांना काडीमात्र नाही! अशा स्थितींत स्वराज्य अगर स्वातंत्र्य किती दूर आहे हा विचार मनांत आल्यावर मनावर निराशेची छाया येऊन गेल्याशिवाय कशी राहील? आणि त्यांतहि विशेष खेदाची गोष्ट ही कीं, धर्माला नसतें महत्त्व देऊं नये, संस्थानिक व जमीनदारांना स्वराज्याचे शत्रू मानावें, प्रांतिक अभिमान हिंदी राष्ट्रीयत्वाला विघातक म्हणून इतिहास विसरून जावा, व स्वराज्य मिळवावयाचें तर अहिंसेचें तत्त्वज्ञान आत्मसात करावे, असल्या गोष्टी ज्ञाते पुढारी शहाजोगपणाने शिकवीत आहेत; आणि इतिहासाचें सगळें

ज्ञान व शहाणपण विसरून आपण त्या गोष्टी शिकत आहो ! पारतंत्र्याचे विष हें असें चमत्कारिक आहे कीं त्याची भावना अंगी बाणली कीं क्षात्रतेज लोपून नुसतें शरीरच नादान बनतें असें नाहीं, तर बुद्धिहि दूषित होऊन आपण भलभलत्या गोष्टी खऱ्या मानूं लागतो, या अनेक दृष्टींनीं १८५७ च्या बंडाचे स्मरण करून त्याच्या यशापयशाचें मनन करणें फार उद्बोधक होणार आहे."

असो. तथापि प्रत्यक्ष पुस्तक लिहावयाला घेतल्यानंतर १८५७ च्या संघर्षाचा सुसंगत इतिहास सांगणें ही गोष्ट वाटतें तितकी सोपी नाहीं हें दिसून आलें. या बाबतींत केवळ चार दोन पुस्तकें व कांहीं थोडी पत्रें याखेरीज हिंदी लोकांच्या बाजूचा सर्व लेखी पुरावा नामशेष झाला आहे आणि इंग्रजी पुस्तकांचा बहुतेक पुरावा एकतर्फी व प्रचारदूषित आहे. शिवाय त्या गोष्टीला जवळ जवळ शंभर वर्षे होत आल्यानें खऱ्या इतिहासाचा धागा समजणेंहि मुष्कील होऊन बसलें आहे. लॉर्ड कॅनिंगच्या वरिष्ठ कार्यकारी मंडळाचे सभासद सर जॉर्ज कॅंबेल यानीं आपल्या पुस्तकांत अखेरीस स्पष्ट लिहिलें आहे कीं "१८५७ च्या घटनेचा खरा इतिहास या पुढें कधींतरी बाहेर येईल किंवा कोणाला समजूं शकेल ही आशा अगदीं व्यर्थ आहे !" त्या चळवळीवर गूढ वातावरण फार आहे. अनेक इंग्रजी ग्रंथांतील हकिगतींत मेळ नाहीं. परस्पर विरोधहि पुष्कळ सांपडेल, पुष्कळ दुवे असे आहेत कीं अनेक ग्रंथ वाचूनहि त्याची संगति लावतां येत नाहीं. आणि तत्कालीन प्रमुख व्यक्तींच्या हेतूबद्दल इतका मूलग्राही मतभेद आहे कीं, हे सारे इंग्रजी ग्रंथ वाचून या चळवळीची नुसती साधी हकीगत किंवा गोष्ट सांगावयाची म्हटलें तरी सांगणाराला अगदीं पहिल्याच पावलाला अडावें लागेल ! दुसऱ्याला जी हकिगत सांगावयाची त्याचे धागेदोरे स्वतःच्या मनाशीं तरी ठरले पाहिजेत ना ? याकरितां प्रस्तुत विषयावर पुस्तक लिहिण्याची इच्छा असूनहि तें काम फार अवघड होऊन बसलें.

कारण थोडें खोल गेलें म्हणजे या हकिगतींत इतके प्रश्न येतात कीं त्याचें निर्विवाद उत्तर देणें कठीण आहे असें दिसेल. नानासाहेबांच्या एकाच उदाहरणाने ही गोष्ट सागतों. कोणी म्हणतात तो बंडाचा पुढारी होता ! दुसरे म्हणतात तोच तर या कटाचा मुख्य प्रवर्तक व सूत्रचालक होता. आतां असें पाहा, जो पुढारी होईल तोच गुप्त कटवाला कसा असेल ? स्वभावतःच या दोन्ही गोष्टी भिन्न नाहींत काय ? सर जॉर्ज कॅंबेल यानें म्हटलें आहे कीं "मीहि नानाला पाहिला होता ! कानपुरांतील एकादा सामान्य किराण्या मालाचा व्यापारी जसा दिसत असेल इतका तो साधा

इसम होता ! त्याला पकडून चौकशी करण्याचें ठरलें असतें तर, बहुधा त्याला निरपराधी म्हणून सोडून देण्याचीच पाळी आली असती ! ” पण हें वर्णन खरे मानावयाचें तर, पुढें याहि वर्णनांत विरोध कसा काय येतो पाहा. जो मनुष्य ‘ निरपराधी ’ होता तो पुढारी कसा असूं शकेल ? आणि ज्यानें बंडाचें ‘ पुढारी ’पण पत्करलें त्याला निरपराधी कसें राहतां येईल ? यांत कांहींतरी एक पत्करलें पाहिजे ! मार्शमन यांनीं आपल्या इतिहासांत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं “ या अनेक वादग्रस्त प्रश्नांचा कधींहि निकाल लागणार नाहीं ! ”

चारित्र्य-चिकित्सा व हेतुसंशोधन या दोनहि बाबी नेहमीं वादग्रस्त व अवघड असतात. त्या बाबतींत जितकें दूर जाववेल तितकें जावें, पण त्यांचा हमखास निर्विवाद छडा लावतां येईल अशी कोणी अपेक्षाच करूं नये ! इतिहास व राजकारण हीं भिन्न नाहींत. कालच्या राजकारणाला ‘इतिहास’ म्हणावयाचें; व आजकाल घडणाऱ्या इतिहासाला ‘ राजकारण ’ म्हणावयाचे, यापेक्षां त्यांत ज्यास्त काय आहे ? पण राजकारण हें आपल्या डोळ्यासमोर घडतें म्हणून त्याच्याहि हकीगती ऐकतांना जितकें सत्य हातीं येतें, त्यापेक्षां वादग्रस्तताच प्रत्ययाला येत नाहीं काय ? अगदीं अलीकडचें १९४२ सालचें कॉंग्रेसचें बंड घेतलें तरी ता. ८ ऑगष्टचे पुढारी व ९ ऑगष्टचे पुढारी यांच्या हेतूंमध्यें कसें महदंतर पडलें व दोघांत कसे जाहीर सवाल-जबाब झाले ही गोष्ट वर्तमानपत्रवाचकांचे स्मरणांत ताजी आहे. आणि खुद्द ८ ऑगष्टच्या चळवळीचे पुढारी घेतले तरी त्यांचेहि हेतू एक नव्हते ! जवाहिरलाल नेहेरु यांनीं Discovery of India या पुस्तकांत असें लिहिलें आहे कीं, तारीख ८ ऑगष्ट १९४२ रोजीं सरकारला दिलेल्या अंतिमोत्तराला जर सरकारनें नीट उत्तर दिलें नाहीं तर, गांधीजींनीं पुढें काय करावयाचें ठरविलें होतें हें आम्हालाहि माहीत नव्हतें ! त्यांच्या मनाशी तरी ती कल्पना निश्चित झाली होती कीं नाही हेंहि सांगतां येत नाही !! ”

“Many of the theoretical and other differences that had often separated some of us from Gandhiji disappeared, but still that major difficulty remained–any action on our part must interfere with the war effort. Gandhiji, to our surprise, still clung to the belief that a settlement with the British Govenment was possible and he said he would try his utmost to achieve it. And so, *though he*

*talked a great deal about action, he did not define it or indicate what he intended to do."*

(The Discovery of India Page 576-78.)

'करेंगे या मरेंगे' अशा निर्वाणीच्या घोषणेनें ज्यांनीं १९४२ सालीं सरकारविरुद्ध बंड पुकारलें त्यांची जेथे ही स्थिति, तेथें शंभर वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या सत्तावनचे बंडांत कोणाचे काय हेतु होते याची आम्ही तरी चिकित्सा किती कशी करावयाची? आणि ती कां करावयाची?

तात्पर्य, कालानुक्रमानें जसा त्यावेळीं इतिहास घडला, तसाच तो शक्य तितका साधार व चिकित्सक दृष्टीनें या पुस्तकांत दिला आहे. आधाराशिवाय केवळ कल्पनेनें एक ओळहि या पुस्तकांत लिहिलेली नाहीं. बोलून चालून शंभर वर्षांपूर्वी घडलेल्या या हकीगती असल्यानें, शुद्ध इतिहासाची दृष्टि हीच प्रधान मानली आहे. कोणाहि व्यक्तीबद्दल विशेष अभिनिवेश किंवा प्रचार करण्याचें लेखकाला कारण आहे असें वाटत नाहीं. इतिहास तो इतिहास. त्यांत अभिनिवेश कसला? अशा रीतीनें इतिहास लिहितांना फार श्रम पडतात; पण त्या परिश्रमानें जी शुद्ध ऐतिहासिक सत्याची साकार मूर्ति आपण घडवीत असतों त्यानेंच त्या श्रमांचा परिहार झाल्याचा सात्त्विक आनंद आपणांस लाभत नाहीं काय?

पण याहि सात्विक आनंदावर विरजण पडावें, असेंच दुर्दैवानें यावेळीं 'विधिलिखित' होतें. कारण हा ग्रंथ प्रसिद्ध होण्याचे अगोदर फक्त दहाच दिवस तीर्थरूप तात्यासाहेब केळकर यांनीं इहलोकाची रजा घ्यावी यापेक्षां अधिक दुःखद घटना प्रस्तुत लेखकाच्या दृष्टीने जगांत दुसरी कोणती असेल? खरोखर लिहिणाराचें कौतुक करावे तात्यांनीच. त्यांच्याकडून प्रशंसेचा एक किंवा अर्धाहि उद्गार कानीं पडला म्हणजे आणखी दुसरें बक्षीस काय हवें? हा एक विषय इतकीं वर्षे मनांत ठेवून त्याकरितां मी काय काय गोष्टी केल्या, काय काय लिहिलें तें सारें त्यांना माहीत होतें. पण—आतां काय? आल्या प्रसंगाला कर्तव्य बुद्धीनें सादर झालें पाहिजे! हें पुस्तक राजकीय इतिहासासंबंधीं लिहिलें असल्यामुळें त्यांनाच अर्पण करण्याचें मनांत योजलें होतें, त्याप्रमाणें आल्या प्रसंगाला सादर होऊन मी तें करीत आहे. आपल्या दुःखी मुलाच्या सुमनांजलीचा स्वीकार करून त्यांचा आत्मा संतोष पावो!!

पुणें<br>ता. १९ ऑक्टोबर १९४७ } **काशिनाथ नरसिंह केळकर**

# अनुक्रमणिका



# शमीपूजन

या पुस्तकांत सन १८१८ ते १८५८ या अर्धशतकाचा राजकीय इतिहास सांगून त्यांत १८५७ चें जें क्रांतियुद्ध घडलें त्याचें सविस्तर वर्णन केलें आहे. अव्वल इंग्रजीच्या पहिल्या काळांत निराशा व झालेला पराभव यांची छाया अधिक. मात्र त्या पन्नास वर्षांच्या काळांत ही एकच चळवळ अशी तेजस्वी झाली कीं पुढें निदान शंभर वर्षें तरी इतिहासानें त्याची आठवण ठेवावी !

" कॉंग्रेसच्या जन्मापूर्वीहि चाळीस वर्षें होऊन गेलेली ही पहिली राष्ट्रीय चळवळ होती " असा " यंग इंडिया " पुस्तकांत लाला लजपतराय यांनी १८५७ च्या चळवळी बद्दल गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. त्या चळवळी मुळे प्रत्यक्ष राज्यक्रांति न झाली तरी कंपनी सरकार नाहीसें झालें ! म्हणजे मर्यादित अर्थानें राज्य-क्रांतीच झाली. बेजबाबदार कंपनीची जुलमी राजवट नष्ट झाली !

त्या काळांत लोकांनी जो वनवास, हालअपेष्टा व छळ भोगला त्याची आठवण पुढें शंभर वर्षें बुजली नाहीं. १९४२ सालच्या ऑ. इं. कॉंग्रेस कमेटींत जवाहिरलाल

नेहेरु यांनी उद्गार काढले कीं, १८५७ सालीं बिहारमध्ये इंग्रजांनीं केलेले अत्याचार व छळ यांची आठवण लोक अद्यापिहि विसरले नाहींत.

बारा वर्षें वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास अशी विटंबना सोसल्यावर पांडवांनाहि शमीवृक्षावर लपवून ठेवलेली आपलीं शस्त्रास्त्रें काढून पुनः रणदेवतेचें आवाहन करावें लागलें! त्याचप्रमाणें, इंग्रजांनी हिंदी स्वातंत्र्य लक्ष्मीची विटंबना केल्यावर, या अपमानाचें उसनें फेडण्याकरितां हिंदी लोकांना हातांत शस्त्र घेऊन बंड करण्याची पाळी आली व अखेर तें त्यांनी केलेंहि. याच कल्पनेने या पुस्तकाला " शमीपूजन " हें नांव दिलें आहे.

या लढ्याची आठवण ठेवून तसा लहान मोठा उद्योग करणारी कित्येक स्वार्थत्यागी माणसें नंतरच्या काळांत निघालीं. कित्येकांनी या जुन्या प्रसंगावर कवनें, चरित्रें व इतिहास लिहिले. पण जगाच्या रंगभूमीवर, दुसऱ्या महायुद्धांत इंग्लंड परचक्रांत सांपडलें असतां, नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं जे १८५७ चें भव्य प्रात्यक्षिक पुनः करून दाखविले तसें आजवर कोणीहि केलें नसेल! या दोन्ही प्रसंगांतील भव्योदात्तपणा आणि अपयश मनाला अगदीं चटका लावण्यासारखीं होतीं. इतिहासाची इतकी तंतोतंत पुनरावृत्ति कधीहि झाली नसेल. रंगून येथे बहादुर शहाच्या कबरीला साक्ष ठेवून नेताजीनीं सैनिकाना उद्देशून भाषण केलें कीं " १८५७ च्या अपयशाचा आम्हीं सूड उगवूं आणि त्याकरितां स्वतःचें आणि शत्रूचें रक्त सांडू! " तसें त्यांनी केलें म्हणूनच आज हिंदुस्थान स्वतंत्र झाला आहे. **स्वातंत्र्यवीर** ही पदवी खरोखर त्यांनाच शोभते!

सुभाषसेनेचा इतिहास अलीकडचा असल्यानें लोकांच्या स्मरणांत ताजा आहे. १८५७ चा इतिहास जुना व विस्मृत आहे. तो नीट समजण्याला त्याहीपूर्वीच्या पन्नास वर्षांतील हकीगती नीट समजल्या पाहिजेत. या करितां संक्षेपाने पेशवाईच्या अंतापासूनच या विषयाला प्रारंभ करूं.

# २

## पेशवाईची परिसमाप्ति

अठराशेअठरा सालीं पेशवाई बुडाली आणि १८५७ सालीं बंड होवून राज्यक्रांतीचा पहिला प्रयत्न झाला पण तो फसला. मध्यंतरीच्या काळांत लोकस्थिति परमावधीची निकृष्ट झाली व इंग्रजांचा प्रजेशीं वागण्याचा तोल अजीबात सुटून मऊ लागल्यामुळे त्यांनी कोपराने खणण्यास सुरुवात केली. या क्षोभजनक लोकस्थितीचा उद्गार म्हणजेच बंड होय. हें बंड जसें उत्तर हिंदुस्थानांत झालें तसें तें त्या वेळीं दक्षिणेंतहि कां झालें नाही, याला कांहींच कारण नाही. इंग्रजांच्या राज्यकारभाराचा जुलूम उत्तर व दक्षिणेंत सर्वत्र सारखाच होता. वातावरणांत वादळ असलें म्हणजे कोठेतरी एखाद्या विशिष्ट ठिकाणीं त्याचा आवर्त बनून राहतो. पण इतर ठिकाणींहि त्या वादळाचें अस्तित्व नाही असें म्हणतां येत नाही. कित्येक वेळां वाऱ्यामुळे आग भडकते, तर कांही वेळां वारा सुटून असलेली आग विझतेहि ! बंडानंतर इंग्रजांच्या राजकारणाची मीमांसा जितकी व जशी उत्तर हिंदुस्थानांतल्या लोकांनी केली असेल तशी इकडे दक्षिणेंतल्या लोकांनीहि केली नसेल काय ? कालांतराने तीं सर्वच जुनीं राजकारणें आता विस्मृतीच्या सदरांत जात

आहेत. पेशवाई बुडाली आणि बाजीरावाला फिरून पुणें दिसलें नाही, अशा दोनच वाक्यांत आपण साठ सत्तर वर्षांच्या इतिहासाचा संक्षेप करतों; पण या विस्मृतीमुळे अनेक गोष्टींचे कार्यकारणभाव विकृत झालेले आहेत असें दिसेल. याचकरिता स्थूल रूपाने इ. स. १८१८ पासून कांही जुन्या हकीगतींचा इतिहास सांगावयाचें योजिलें आहे.

ही हकीकत सांगण्यापूर्वी प्रथमतःच नमूद करण्यासारखी ठळक गोष्ट म्हणजे इंग्रजांचा स्वभाव व राजकारण. इंग्रजांचा हिंदी लोकांशीं संबंध आल्यापासून इंग्रजांच्या आक्रमक राजकारणाचें सूत्र गेल्या दीडशें वर्षांत अगदी अखंड व एकच होतें, हें जाणत्या लोकांच्या वेळोवेळीं नीट लक्षांत आलें होतें. इंग्रज म्हणजे माळसूदपणाने फक्त व्यापार उदीम करणारे दरवेशी असें कोणी कधीच मानलें नाही. बंगाल्यांत व्यापाराच्या निमित्ताने हात शिरकविल्यानंतर तेथील राजकारणांत त्यांनी काय काय कारस्थानें केलीं, हें सर्वश्रुत होतें; आणि दक्षिणेंतहि जाणत्या राजकारणी माणसांची अशीच समजूत होती कीं हे लोक व्यापाराच्या मिषाने हवें तें करणारे, न्यायाची चाड न बाळगणारे, बोलण्यांत मोठे साळढाळ व शहाजोग; पण व्यवहारांत उचापती करणारे आहेत. स्वतः संभावितपणाने नामानिराळे राहून अगर भलेपणा घेऊन दुसऱ्यांत फूट कशी पाडावी या भेदविद्येंत यांचा हात कोणीहि धरूं शकणार नाही.

याचीं चार ऐतिहासिक उदाहरणेंहि सांगतां येतील. पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत मराठ्यांनी वसई सर केल्यावर इंग्रजांना मुंबईबद्दल साहजिकच भीति वाटूं लागली. वरकरणी ते बाजीराव व चिमाजीअप्पा यांच्याशी सलोख्याचीं बोलणीं बोलत; पण दुसरीकडे साताराचा शाहू छत्रपति व पेशवा यांच्यामध्ये फूट पाडण्याचे त्यांचे अंतस्थ प्रयत्न चालू होते. १७३९ च्या जुलैमध्ये इंग्रजांनी गार्डन यांस शाहू छत्रपतीकडे वकिलातीकरिता पाठविलें, त्याला पुढील बाबीसंबंधी बारीक चौकशी करण्याचा हुकूम होता—"बाजीरावाचे शत्रू सातार्‍यास कोण आहेत ? ते शत्रु वजनदार आहेत असें दिसल्यास त्यांस थोडेंसें बाजीरावाविरुद्ध चिथावून द्यावें ! कारण पोर्तुगीजांचा जसा उच्छेद झाला तसा आमचाहि होण्याचा संभव आहे. म्हणून बाजीरावाचें प्रस्थ वाढूं देणें राज्यास अपायकारक आहे, अशी समजूत तेथे पसरून द्यावी. मात्र बाजीरावाचें वजन एवढें मोठें आहे कीं, विशेष अंगावर

येईल अशा थरास मात्र खटपट येऊं देऊं नये ! उलट आम्ही इकडून बाजीरावास सलुखाचें व वसई काबीज केल्याबद्दल अभिनंदनाचें पत्र पाठवीतच आहों !! " पण हा आगलावेपणा चिमाजी अप्पाच्या लक्षांत आला होता. 'तुम्ही परभारें शाहूकडे जाऊन फूट पाडतां' याबद्दल चिमाजीनें इंग्रजांचा वकील अिंचबर्ड याचा पुष्कळ निषेध केला" (मराठी रिसायत पृ. ३०७) मराठी राज्याची सद्दी पहिल्या बाजीरावाच्या वेळीं जोरावर असल्यामुळें इंग्रजांच्या या भेदनीतीचें कांहीच चाललें नाहीं. पण दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत त्यांनी प्रतापसिंह छत्रपतीला खिशांत घालून बाजीराव पेशव्याविरुद्ध हाच डाव फार यशस्वी रीतीनें खेळून दाखविला.

नाना फडणिसाला इंग्रजांच्या कारस्थानी स्वभावाबद्दल अत्यंत द्वेष वाटे आणि राघोबाला पाठीशीं घालून मराठ्यांच्या गृहकलहांत इंग्रजांनी नसतें तोंड घातल्याबद्दल तर त्याला फार संताप येत असे. "आपण मराठ्यांच्या दौलतीच्या शत्रूच्या हातांत गेलों. पण त्याला तरी काय करावें ? पेंच कोणालाहि सहन होत नाही" असा भाव आनंदीबाईच्या कितीतरी पत्रांत व्यक्त झाला आहे. 'जग आपणाला काय म्हणत असेल' हा विचार तिच्या मनांत कितीदा तरी येई. पण इतकी सारासार बुद्धि राघोबाला राहती तर मग गृहकलह तो कसला ? अखेर राघोबाला पेशवाईची गादी मिळाली नाहीच पण राघोबानें शरण येऊन क्षेत्रांत सर्वांसमक्ष आपल्या पातकाचा मोठ्यानें त्रिवार उच्चार करून प्रायश्चित्त घेतलें तेव्हाच त्याला मराठ्यांच्या राज्यांत थारा मिळाला ! राघोबाला आठ वर्षें पाठीशीं घालून अखेर त्याला मराठ्यांच्या स्वाधीन करणें इंग्रजांना मोठें कठीण वाटलें व त्यांनी फार आढेवेढे घेतले. पण नानानें इंग्रजांचा स्वभाव पक्का ओळखला होता म्हणूनच नानाच्या हयातींत मराठी राज्यांत इंग्रजांचें बोट देखील शिरकूं शकलें नाही. सालबाईच्या तहाच्या वेळच्या एका पत्रांत तो लिहितो—'इंग्रज दगाबाज आहेत. त्यांचे संदर्भ येतील ते कदापि ऐकूं नयेत. पारपत्यच व्हावें. दादासाहेबांस कुटुंबासुद्धा इंग्रज निखालस हवालीं करीत असेल तरच तह करावा. ते हजार बहाणे लावतील व शेवटीं दुसरीच तऱ्हा पाडतील !'

अखेर इंग्रजांच्या राजकारणाला सवाई माधवरावाच्या आकस्मिक मृत्यूमुळे दैवाचा हात मिळाला व जें त्यांचें राजकारण राघोबाच्या वेळीं साधलें नाही तें दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं साधलें. बाजीरावास गादीवर बसवावा याला नाना

फडणीस विरुद्ध, म्हणून यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देण्याची कल्पना निघाली; पण औरस असतांना दत्तक घेण्याला लोकमत विरुद्ध म्हणून दत्तकाची कल्पना जिरली आणि बाजीरावालाच गादीवर बसविण्याचें ठरलें ! बाजीराव तर उघडपणें असा युक्तिवाद करी की 'बाळाजी विश्वनाथाचा वंश ईश्वरानेच संपुष्टांत आणला त्याला कोणीं काय करावें ?' आणि एका अर्थाने हा वाद बिनतोड होता. 'त्या वेळीं नाना फडणविसाने अमुक करावयास पाहिजे होतें' अशा शहाणपणाच्या गोष्टी आज कित्येकजण आपल्या पुस्तकांत लिहितात. पण त्यांच्या हें लक्षांत येत नाही कीं, नाना फडणीस कितीहि शहाणा झाला तरी तो कांहीं स्वतः पेशवाईच्या गादीवर बसूं शकत नव्हता ! जो हक्क केवळ जन्मानेच साध्य तेथे नाना फडणीस झाला तरी काय करणार ? औरस वंश असतांना दत्तकाचा खेळ हा मुळांतच कमजोर होता. अशा स्थितींत नानालाहि दैवापुढे हार खावी लागली. एरीतेवी दौलतरावाच्या साहाय्याने अगर इंग्रजांच्या साहाय्याने बाजीराव गादीवर बसणारच, मग स्वतःच्या संमतीने तो बसला तर कांहीसा भलेपणाच्या उपकाराने तो मारला जाऊन सुधेपणाने तरी वागेल. अशा अपेक्षेने उभयपक्षी करार होऊन बाजीरावास गादीवर बसण्यास नाना फडणिसाने संमति दिली ! त्याने अधिकार संन्यास केला असता तरी, ऐन आणीबाणीच्या वेळीं स्वतःचें स्वास्थ्य व स्वार्थ यांकडे पाहून त्याने राष्ट्राला दगा दिला असाहि आरोप त्याच्यावर आलाच असता ! अखेर व्हावयाचें तें झालेंच व नानांची विटंबना होऊन त्यांस मरण आलें. बाजीराव स्वतः नादान असल्याने व मराठेशाहींतल्या एकाहि सरदारावर त्याचा भरवंसा नसल्याने स्वतःच्या संरक्षणाकरिता त्याने इंग्रजांवर विश्वास टाकला आणि वसईच्या तहाने स्वतःचे हातपाय बांधून घेतले !

वास्तविक मराठ्यांना स्वतःच्या राज्यांत इंग्रजांच्या तैनाती फौजेचें संरक्षण घेण्याचें कारण काय ? बाजीरावालाहि हें समजण्याची पात्रता व अक्कल खचित होती. पण ती पाळी गृहकलहाने आणली ! बाजीरावाने वसईच्या तहामुळे स्वतःबरोबर मराठासंघाचेंहि स्वातंत्र्य घालविलें. ही गोष्ट शिंदे होळकरांना मान्य नव्हती. धन्याला धनीपण गेल्याचें जितकें दुःख झालें नाही तितकें दुःख नोकराला आपलें नोकरपण गमावल्याने झालें ! आणि याकरिता शिंदे होळककरांशीं इंग्रजांच्या आसई लासवारी इत्यादि ठिकाणीं घनघोर लढाया होऊन, शिंदे होळकर व भोसले यांच्याशीं इंग्रजांचे स्वतंत्र तहनामे झाले व मराठा संघ कायमचा मोडला ! यानंतर बाजीरावाच्या पेशवेपणाची सर्व खानदानी नष्ट झाली व राज्याला

हीनकळा आली. स्वतः तो अत्यंत स्वार्थी नादान व चारित्र्यहीन होता. आणि इंग्रजांच्या पाठबळाच्या जोरावर जेव्हा प्रजेवर त्याने अनन्वित जुलूम केले, तेव्हा या नराधमाच्या तावडींतून आपणांस कोणी सोडवील तर बरें असें प्रजेला होऊन गेलें! श्री. विनायकराव भावे यांनी म्हटल्याप्रमाणें "या आनंदवल्लीच्या तुऱ्याला मातृवेलीचा दर्प असता तरी पुरे होतें. पण आनंदीबाईच्या शहाणपणाचा शतांशहि त्याच्यांत नव्हता." त्याच्या कारकीर्दींत "जुन्या सरदाऱ्या लिलावांत निघाल्या, पागा मोडल्या, पथकें देशोधडीला लागलीं, मोठमोठे सरदार, मुत्सद्दी, सावकार, कार्यकर्ते पुरुष, समाजाचे धुरीण सर्व धुळीस मिळाले. देशांत पौरुषत्वाचा लेश राहिला नाही. अशा दुर्दशेमुळे इंग्रजांना हा देश काबीज करण्याचा मार्ग सोपा झाला! राज्याचें वाटोळें झालें तरी बेहेत्तर पण मीच पेशवाईच्या गादीवर बसणार हा त्याचा दुराग्रह होता. आणि लोकांना तर तो मुळीच नको होता. अशा स्थितींत आपणांस पाण्यांत पाहणारे हे जुने राजिक मुळीच नसावे असें बाजीरावास साहजिक वाटूं लागलें आणि दौलतरावाच्या साहाय्याने ते त्याने मोडून टाकले." (खरे)

यानंतर बाजीरावानें जो कारभार केला त्याचें वर्णन न केलेलेंच बरें! आर्थर वेलस्ली याने पुण्याच्या रेसिडेंटास लिहिलें, "तुम्ही बाजीरावांस कळवा कीं, तुमच्या राज्यांत लहानापासून थोरापर्यंत एकाहि इसमाचा विश्वास तुमच्यावर नाही. एकाचीहि इच्छा तुमच्याशीं संबंध ठेवावा अशी नाही. इंग्रज सरकारच्या मध्यस्थीशिवाय अगर जामीनगिरीशिवाय तुमचा एकहि व्यवहार सिद्धीस जात नाही! बाजीरावास कशाची चाड नाही. खासगी संबंधांत तर त्याजकडून लोकांचा भयंकर छळ होतो. त्यांच्या रक्षणास असलेलें ब्रिटिश लष्कर काढून घ्या, म्हणजे त्यास राज्य नाही की प्रजा नाही अशी त्याची स्थिति होईल?"

अशा परिस्थितींत 'तुम्हांला परके इंग्रज हवे की बाजीराव हवा' याचें उत्तर विचारणें म्हणजे कोणाच्याहि देशभक्तीची सत्त्वपरीक्षाच पाहाण्यासारखें होतें. त्याला खरा उपाय म्हणजे सर्व मराठा मंडळाने बाजीरावाला पदच्युत करणें व इंग्रज त्याला पाठीशीं घालतील तर इंग्रजांशीं सामना करणें हा एकच होता. पूर्वी राघोबाच्या वेळीं देशाभिमानाने प्रेरित होऊन सर्व मराठ्यांनी एक होऊन इंग्रजांशी युद्धच केलें नव्हतें काय? हा मार्ग स्पष्टपणें शिंदे, होळकर व भोसल्यांना दिसत होता. पण इंग्रजांच्या नशिबाची सद्दी म्हणा अगर व्यापक राष्ट्रीयत्वाकरितां आपलीं

व्यक्तिगत वैरे शिंदे होळकर वगैरे मराठे सरदार विसरूं शकले नाहीत म्हणून म्हणा, मराठा संघाची प्रबळ एकजूट होऊं शकली नाही. आणि विनाश दिसत असतांनाहि तो त्यांना टाळतां आला नाही, एवढी गोष्ट खरी. त्या बारा वर्षांत अनेक वेळा इंग्रजांचा पाडाव होण्याची संधी येऊन ती फुकट गेली. १८१७ सालच्या पेंढाऱ्यांच्या युद्धाच्यावेळीं खुद्द एल्फिन्स्टन लिहितो —" बाजीरावाच्या नेभळट स्वभावामुळे या वेळीं मराठ्यांची बाजू यशस्वी झाली नाही. आम्ही वारंवार पेशव्यास दरडावून त्याच्याकडून पाहिजे तशा अटी कबूल करून घेतल्या. त्यांत बाजीरावाचे ऐवजी दुसरा एखादा शूर तरतरीत पेशवा असता तर आमची गत काय झाली असती याचा विचार करणें फारसें कठीण नाही. इंग्रजांवर जोराने चढाई करण्याचीं सर्व साधनें या वेळी मराठ्यांकडे भरपूर होतीं. फौज पैसा शस्त्रास्त्रें दारुगोळा इत्यादि सर्व कांही सिद्ध होतें. पण दक्षिणेंत बाजीरावाने किंवा उत्तरेत दौलतरावाने यत्किंचित् हिंमत दाखविली नाही! उलट त्यांनी राष्ट्रद्रोहच केला असें म्हणावें लागेल." नादान मनुष्याला दैवानें संधि दिली तरी त्याचा काय उपयोग ?

बाजीराव मनांतून इंग्रजांचा द्वेष करी आणि त्यांच्या विरुद्ध अनेक खटपटीहि करी. पण त्याच्या परिवारांत हलकट लोकांचा भरणा असल्यामुळे त्याच्या राज-कारणाला खानदानी यत्किंचित् नव्हती. ज्याला सामान्य चारित्र्यहि नाही अशा मनुष्याने देशभक्तीच्या नांवानें जरी मराठा मंडळाला हांक मारली तरी त्यावर विश्वास कोणी ठेवावयाचा ? श्री. सरदेसाई यांनी म्हटल्याप्रमाणें "कोणत्याहि व्यक्तीस तारणारी किंवा मारणारी शक्ति म्हणजे त्याची दानत होय. ही दानत किंवा योग्यता ज्याची त्याजबरोबर राहात असते आणि लोकांना ती पूर्णपणें ठाऊक असते. याच योग्यतेवर समाजांत प्रत्येकाचा व्यवहार चालतो. बाजीरावाने आपल्याबद्दल लोकांच्या मनांत यत्किंचित् आदर उत्पन्न केला नव्हता, म्हणून कितीहि जीव तोडून त्यानें सरदारांस पत्रें अगर बोलावणीं पाठविलीं तरी हा मनुष्य घातकी आहे असें समजून त्याजवर कोणीहि विश्वास ठेवण्यास तयार झाले नाहीत! अशा परिस्थितींत एल्फिन्स्टनसारख्या कर्तबगार व जहांबाज मुत्सद्याशी त्याचे व्यवहार चालू झाले तेव्हा, ही दानतीची पुंजी बाजीरावाजवळ बिलकुल उरली नसल्याने त्याचें लवकरच दिवाळें निघालें." हे उद्गार यथार्थ नाहीत असें कोण म्हणेल ?

एल्फिन्स्टन ज्या संधीची वाट पहात होता ती गंगाधर शास्त्र्यांच्या खुनाच्या निमित्ताने त्याला आयती मिळाली. ती मिळतांच त्याने उग्र स्वरूप धारण केलें, व खुनी त्रिंबकजी डेंगळ्याला पकडण्याबद्दल बाजीरावाकडून जाहीरनामे लावविले, इतकेंच नव्हे तर त्याच्याकडून सक्तीने नवा तह लिहून घेऊन महाराष्ट्रा-बाहेरील पेशव्याचे सर्व प्रदेश, ३४ लाख वसुलाचे, इंग्रजांनी आपल्या कबजांत घेतले आणि इतर मराठे सरदारांशी त्याचा संबंध कायमचा तोडून टाकला. तदनुसार बाजीरावाजवळ असलेले शिंदे होळकरादिकांचे वकील पुण्यांतून काढून, बाहेर त्याचे असलेले वकील परत बोलवावे लागले. पुणे शहराला वेढा पडला होता, आणि रायगड, पुरंदर, सिंहगड, त्रिंबक या किल्ल्यांच्या सोडचिठ्ठ्या देऊन बाजीरावाने वरील तहावर निमूटपणें सही केली तेव्हाच त्याची सुटका झाली. या तहाने बाजीराव पूर्णपणें जखडला गेला व त्याचें मराठा-मंडळांतील सर्व पुढारीपण जाऊन त्याला एखाद्या क्षुद्र संस्थानिकाचा दर्जा प्राप्त झाला !

ज्याने इंग्रजांची सतत्पर्णी करण्यांत गेलीं पंधरा वर्षे आपली अगदी शिकस्त केली त्या बाजीरावाला आपली ही हीन स्थिति पाहून किती दुःख झाले असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. १८१७ च्या ऑक्टोबरांत एल्फिन्स्टनशीं बाजीरावाची शेवटची भेट झाली त्यांत त्याने काढलेले करुण उद्गार पाहून आजहि वाईट वाटतें—" तुमचे आमचे ऐक्यतेस किती संवत्सरं झालीं, आगम निगम भूतभविष्य पाहून तुम्हांशी ऐक्यता केली; ते समयीं करार–मदार कित्येक कामाच्या तजविजी करून रुपास आणावे त्याचा जिम्मा तुम्ही सर्व प्रकारे घेतला; आज तागाईत काय झालें याचें स्मरण करावें ! अितकें तुम्ही करीत असतां तुमचे मानस मी कदापि तोडलें नाही. येणेकरून ऐश्वर्य किंवा जो पदार्थ माझे अंगीं होता तो तेजहीन झाला. **मी मूळ मंत्राविगळा तुमचे करण्याने झालों. जो मी होतो तो आज नाही.** तुमचे स्नेहाची जोड मात्र केली आणि जी कला अंगीं होती ती दवडून बसलों ! " असें बहुता प्रकारचें करुणे त्यांचे पुढे ठेवून कुंठित करून बोलणें बंद केलें. ( सरदेसाई पृ. ४८३ )

अखेर सूड घेण्याकरिता निर्वाणीचा उपाय म्हणून बाजीरावाने इंग्रजांशीं युद्ध करण्याचें ठरवून युद्धाची तयारी केली. सर्व जन्मभर राष्ट्रद्रोह व पाप करून

अखेरीला त्याच्या मनांत देशभक्ति संचारली होती असें दिसतें ! कोणाच्या बळावर तो इंग्रजांशी लढणार होता कोणास ठाऊक ! पण त्याचा लढण्याचा इरादा होता हें मात्र खरें. एका बापू गोखल्याखेरीज कोणीहि जुन्या मुत्सद्याने अगर सरदाराने यावेळीं इंग्रजांशीं लढाई करण्याची त्याला सल्ला दिली नाही व शिंदे, हीळकर, भोसले, पटवर्धन वगैरे कोणीहि मातबर सरदार त्याच्या मदतीस आला नाही. तशाहि पडत्या काळांत त्याने एक कोट रुपये उभारून सैन्याची जमवाजमव केली, कित्येकांचे सरंजाम जप्तींतून मोकळे केले व माहुलीस साताऱ्याच्या छत्रपतीची भेट घेऊन आण-भाक करून छत्रपतीच्या नांवाने युद्धास सुरवात केली. पण खुद्द छत्रपतीच इंग्रजांना फितूर होते. ते गोपाळअष्टीच्या मैदानावर इंग्रजांना सामील झाले ! त्याची हकीगत अशीः—

या लढाईच्या दोनतीन वर्षें अगोदरपासून हें कारस्थान शिजत होतें व त्यांत चिटणीस बंधू, रंगो बापूजी, चतुरसिंग भोसले वगैरे अनेक सातारकर मंडळी सामील होती. कारण बाजीरावाचें राज्य बुडालें तरी महाराष्ट्राचें राज्य छत्रपतीला मिळणार होतें ! आणि हें खरें कशावरून तर इंग्रजाने तसें वचन दिलें होतें ! ! छत्रपती-मार्फत विठ्ठ कोंबडा मुंबईच्या गुढाणसाहेबाकडे ( गॉडर्ड ) हेलपाटे मारीत होता. ' या राजकारणास नऊ महिने झाले. तो श्रावण गेला. शेवटीं गुढाणसाहेबांनी अलिकडे बोलावून मंडळी बाहेर काढून बोलले की तुमचें काम एकदोन वर्षांनी होईल. आमचे साहेब या प्रयत्नांत आहेत. तूर्त निघून जावें. तुम्ही ही गोष्ट फुटूं देऊं नये. ' रंगो बापूजी गुप्ते यांनी स्वतःच्या लिहून ठेवलेल्या हकीकतीवरून दिसतें की, " प्रथम आंग्रे याजकडे एल्फिन्स्टनसाहेब गेले असतां तेथे रंगो बापूजीनी जाऊन त्यांची गांठ घेतली व नंतर गोसाव्याचा वेष घेऊन त्याने महाराजांचीं पत्रें त्यांस पोहोचवलीं. हें काम करण्यांत रोहीड खोऱ्यांतलें देश कुलकर्ण्याचें वतन आपणांस मिळावें व इतरहि प्रकारें आपला लाग साधावा हा हेतू होता व हें वचन त्याने प्रतापसिंहापासून घेतलें होतें. हळुहळू हें कारस्थान रंगो बापूजीने बरेंच रंगास आणलें. यांत नरसु काकडा, खंडेराव शिर्के, तात्या नारोळकर, दाजीबा उपाध्ये, महाजनी वगैरे मंडळी रंगोबाला साथीदार होती. बाळाजीपंत नातूस बाहेर घालवून हीं खलबतें एल्फिन्स्टन व रंगो बापूजी करीत. पहिल्याच भेटीस साहेबांनी रंगोबास पांच मोहरा बक्षिस दिल्या. "

छत्रपतीचें हें संधान लढाईच्या ऐन वेळीं फळाला आलें. छत्रपतीच्या लोकांनी इंग्रजांना परवलीकरिता खुणेचे शब्द काय काय करावयाचे हें ठरविलेंच होतें. आणि छाप्यामध्ये बाजीरावाची फौज उधळून छत्रपति इंग्रजांच्या हातीं लागले तेव्हा ' राजे सातारकर महाराज सच्चे ' असें म्हणून डव्हटनसाहेबानें वचन घेतलें आणि महाराजास ताब्यांत घेऊन बंदोबस्त केला. (पे. द. ४१. पत्र १८९.) खुद्द प्रतापसिंहाने ओव्हॉन्स याला लिहिलेल्या यादींत ही गोष्ट स्वच्छ आपल्या हाताने लिहिली आहे. " प्रथम बाजीरावाचे लष्करांतून इंग्रजी सरकारचा पादशाही चालीचा भरवसा व दोस्तीचीच इच्छा धरून इंग्रजी सरकारचे लष्करांत आलों. फक्त पूर्वीचे इशाऱ्यावर इंग्रजी सरकारचा भरंवसा. दोस्तीवर नजर ठेऊन येणें झालें. बाजीराव वगैरे लोक पुरे चालीचे रीतीचे भरंवसा देत असतां त्याचा भरंवसा धरला नाहीं. "

आप्पा देसाई निपाणकरासारखे त्या वेळीं कितीतरी लोक फितूर झाले होते आणि अनेकजण बाजीरावाचेंच पैसे घेऊन इंग्रजांना बातम्या पुरवीत होते. पेशवे दप्तर खंड ४१ यांत अशा अनेक लोकांनी सरकारला लिहिलेल्या याद्या पाहिल्या म्हणजे वाईट वाटतें. या यादीपत्रांत आपण घरभेदेपणा करून इंग्रज सरकारला कशी मदत केली व हल्ली आपण अन्नास महाग झालों असल्यामुळे इंग्रज सरकारने आपणांवर कांही कृपा करावी, अशी मोठ्या लाचारपणाने विनंति केली आहे. चतुरसिंग भोंसले व रंगो बापूजी गुप्ते या पुरुषांना रियासतकार सरदेसाई यांनी देशभक्तीचें सर्टिफिकेट दिलें आहे. पैकी १८१८ सालीं बाजीराव इंग्रजांशी लढत असतां चतुरसिंग कैदेंत होता. तेथून त्याने एलफिन्स्टन यास ' मदतीस दोनतीन पलटणें सत्वर पाठवावीं म्हणजे इकडून मुलखाचा बंदोबस्त करीत येतो,' असें पत्र लिहिलें आहे ! (पे. द. ४१ पत्र नं. १८४). तसेंच पेशवे दप्तर खंड ४१ पत्र नं. २५९ यांतील अर्जदास्तींत रंगो बापूजीने स्वतःच आपलें आत्मचरित्रपर पूर्ववृत्त इंग्रजास कळविलें आहे तें फारच नवलकारक आहे. ही यादी ता. ३ डिसेंबर १८२० रोजीं लिहिली असून त्यांत आपण जिवापेक्षाहि अधिक श्रम करून इंग्रजांची चाकरी कशी बजावली व इंग्रजांतर्फे पेशव्याचे मुलुखाचा बंदोबस्त करीत असतां, जे अनेक लोक पेशव्याला सामील होते त्यांपैकी कांही स्वतःचे आप्त असतां त्यांचा विश्वासघातहि करून कसा पाडाव केला हें सांगितलें आहे—" महत्पुरची लढाई झाल्यावर कप्तान ब्रिगसाहेब यांचें पत्र आल्यावरून पुणतांब्याचे मुक्कामीं

येऊन साहेबबहादुर यांजपाशीं हजर झालों. नंतर लष्करचें कूच होऊन औरंगाबादेस गेलों. मी बरोबरच होतों, तेथून बाजीरावसाहेब यांचा मुलूख सर करण्याचें ठरलें. तेव्हा वैजापूरचे मुक्कामाहून माझी रवानगी, फक्त एक जाहीरनामा मात्र पुण्याचा आला तो देऊन केली, आणि गनफडी वगैरे ठाणीं बसवावयासी हुकूम झाला. ते समयी शिबंदी कोणी मिळेना व कारकूनहि कोणी मिळेना. सर्व पेशव्याचे फौजेचा अंदेसा घेऊन जमीनदार मोकदम व रयत कोणी अनुकूल न होई. तेव्हा हरएक मनुष्याची खातरजमा करून मनुष्यें मिळवून, पे। नाशिक, पे॥ कुंभारी, पे॥ पाटोदें व शिन्नर, पे॥ वण, पे॥ दिंडोरे व घांटाखालील पेठ हरसूल राज्याचे येथील ठाणी कायम करून नंतर किल्ले घेण्याची सुरवात केली. तेव्हा किल्ला हातगड, रामशेज, देहर, बहूला, व वाघेरा ऐसे घेतले. नंतर किल्ले कानवई, गडगडा व त्रिंगळवाडी हे तीन किल्ले पेशव्याकडील असलांत आमचे व्याह्याकडे होते. ते किल्ले हस्तगत होईनात. तेव्हा कळेल त्या रीतीने त्यांची खातरजीमा करून, भेटीस म्हणून बोलावून आणोन, धरून घेऊन साहेब बहादूर यांचेजवळ हजर केले, आणि तिन्ही किल्ल्यांवर ठाणीं कायम केली. याप्रमाणें कित्येक किल्ले व महाल लढून व कित्येक फूस लावून घेतले. मध्ये पेशव्याचे फौजेची व रूपराम चौधरी याचे पलटणांची गांठ पडून, तेथे छापा घालून साहेबाचे प्रतापे पराभवातें पावविलें व लूट तोफा सरंजाम वगैरे सांपडला तो सरकारदाखल केला...मी जीवापेक्षा अधिक श्रम करून सरकारचाकरी बज्याविली आहे. ईश्वर जाणत आहे व खावंदसाहेबांस माहीत आहे. हे अर्जदास्त—" हें रंगो बापूजीनें स्वतःच्या हातानें लिहिलेलें त्याचें पूर्ववृत्त! हेच रंगो बापूजी प्रतापसिंह छत्रपतींच्या वकिलातीकरिता पुढें विलायतेस जाऊन ( सरदेसायांच्या दृष्टीनें ) मोठे देशभक्त ठरले! पण आयुष्याच्या अखेरीस केलेल्या एकच एक चांगल्या गोष्टीने मनुष्याच्या सर्व पूर्ववृत्तावर पडदा पडून जर तो देशभक्त ठरत असेल तर दुसऱ्या बाजीरावालाहि राष्ट्रवीरांच्या मालिकेंत बसविण्याला हरकत कोणती? त्यानेंहि आयुष्याच्या अखेरीस इंग्रजांशीं युद्ध करून, त्यांचेविरुद्ध बंड पुकारूनच आपलें राज्य घालविलें. पण ही दृष्टीच खरी नव्हे. मनुष्याच्या खाजगी आयुष्यांत काय किंवा राजकारणांत काय, 'Saints have a past and sinners have a future' हेंच खरें! राजकारणांत सामान्य मनुष्यांच्या देशभक्तीची मीमांसा याहून अधिक करण्यांत अर्थ नाही.

पेशवाई बुडाली आणि सातारच्या छत्रपतीच्या नांवानें द्वाही फिरली. " राजे प्रतापसिंह छत्रपति व प्रधान पेशवे आलफिष्टनसाहेब बहादूर " असा शिक्का कितीतरी दिवस चालत होता. बाजीरावाशी लढाई सुरू होतांच ' आमचे युद्ध फक्त बाजीरावाशी आहे. आम्हाला छत्रपतीचें राज्य कायम ठेवावयाचें आहे,' असा जाहीरनामा एलफिन्स्टनने काढून बाजीरावाचा डाव उलटविला आणि प्रतापसिंह हस्तगत झाल्यावर, 'बाजीराव बंड आहे सबब आम्ही त्याला नोकरीवरून दूर केलें आहे' असा जाहीरनामा जेव्हां प्रतापसिंहाकडून एलफिन्स्टननें काढविला तेव्हां तर या राजकीय डावांत बाजीरावाची मानच चिरली गेली ! इंग्रजांच्या राजनीतीचें शस्त्र असें दुधारी आहे. आणि ब्राह्मणांनीं राज्य बुडविलें असा उलटा प्रवाद व लोकनिंदेचा डंका सुरू होऊन त्यांतूनच पुढें जेव्हा ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद निघाला, तेव्हा इंग्रजी राजनीतीच्या तलवारीला भेदनीतीचें विषारी जहर कसें माखलेलें असतें, याचा जाणत्या लोकांना प्रत्यय आला ! पण नवल हें कीं, प्रतापसिंह महाराज पंचवीस वर्षांचे असतांना आणि इंग्रजांच्या नादीं लागून बाजीरावाची काय दशा झाली हें डोळ्यापुढें दिसत असतांना त्यांनी इंग्रजांवर विश्वास टाकण्याचाच मार्ग अनुसरला !!

प्रतापसिंह हा निर्व्यसनी सरळ बुद्धीचा व पापभीरू मनुष्य होता असें दिसतें. विश्वास टाकील त्याच्या मांडीवर खुशाल मान टाकील. मग त्याने ती चिरली तरी हरकत नाही, अशी सत्त्वबुद्धीहि त्याच्या अंगांत होती. पण असा विश्वास टाकण्याला योग्य इंग्रजच त्याला भेटले, किंवा मिळाले. याहून अधिक चांगले सल्लागार मिळाले नाहीत, हें तरी महाराष्ट्राचें दुर्दैव नव्हे काय ? राजकीय तारतम्यबुद्धि तर त्याच्या अंगांत अगदींच सामान्य प्रतीची होती याचीं पेशवे दप्तरांतलींच दोन ठळक उदाहरणें देतों--एक दिवस कचेरींत श्रेष्ठ मंडळीसह बोलत असतां बाळाजीपंत नातू बोलले 'सारे किल्ले पाडावे' त्यावर प्रतापसिंह म्हणाला, प्रतापगड देवीची जागा, परळी गुरूची जागा, हे दोन्ही न पाडावे, बाकीचे पाडावे. किंवा एलफिन्स्टन याचे विचारास येईल तसें करावें. किल्ले न पाडावे याचे नांवनिशीची याद विठ्ठलपंतास ग्रँटास बोलावयास दिली. बि॥ किल्ले सातारा, प्रचीतगड, प्रतापगड, परळी व केळजा एकूण पांच किल्ले न पाडावे बाकीचे पाडावे ...( पे. द. ४२ पृ. ३ ) 'तारवाला जसे खिळे तसे राज्याला किल्ले' असें महाराष्ट्रांतल्या या किल्ल्यांचें महत्त्व शिवाजी वर्णन करीत असे. पण या उद्गारांतील राजकीय

शहाणपण प्रतापसिंहाला ऐकून देखील माहीत नव्हतें ! आणि याच परिस्थितींत सातारचा रेसिडेंट ग्रँट डफ याचें मराठ्यांच्या इतिहासलेखनाचें काम चाललें होतें. साहेबानें निरोप पाठविला की, स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी याचीं अस्सल बादशाही फर्मानें हजर करा, की बळवंतराव चिटणीसाला दप्तर धुंडाळण्यास सांगून प्रतापसिंह ते जुने कागद हजर करी. आणि कदाचित् कांहीं जुने महत्त्वाचे कागद न सांपडल्याची सबब कोणी सांगील तर बाळाजीपंत नातू इंग्रजांतर्फे कारभारी म्हणून हजर होताच. त्याच्या काकदृष्टींतून कोणची गोष्ट कशी सुटेल ? मराठ्यांचा सर्व इतिहास आता संपलाच होता. तो फक्त लिहिण्याचें काम उरलें होतें ! आणि ग्रँट डफच्या हवालीं सर्व दफ्तरखाना करून छत्रपति पूर्वजांच्या ऋणांतून मुक्त झाले होते !

इंग्रजांच्या दोस्तीचा अनुभव प्रतापसिंहाला पुढें कसा काय आला, याचा उल्लेख पुढें येईलच. पण 'देशभक्त' रंगो बापूजी व त्याचे सातारकर सहकारी मल्हारराव चिटणीस व बळवंतराव चिटणीस यांचा अनुभव येथें सांगण्यासारखा आहे. रंगो बापूजीला रोहिडखोऱ्याचें वतन अखेर मिळालें नाहींच. पण त्याच्या खटपटीनें राज्य मात्र इंग्रजांचे घरांत गेलें ! व अखेरीस त्याला अत्यंत भणंग दशा कशी प्राप्त झाली वगैरे सर्व हकीगत रंगो बापूजीनेंच लिहून ठेवली आहे. मल्हारराव चिटणीस व बळवंतराव यांचीं वतनें पूर्वी बाजीरावानें जप्त केलीं होतीं. त्यासंबंधानें बोलणें करण्यास ते एलफिन्स्टनकडे गेले. त्या वेळीं एलफिन्स्टन, ग्रँट, व बाळाजीपंत नातू असे बसले होते. वतनाबद्दल विचारल्यावर एलफिन्स्टननें उत्तर केलें, 'आमचा दस्तुर चाल एक. एक चालीने चालावयाचें. बाजीराव यांनी ज्याचें जप्त केलें असेल तें जप्त राहील, चालविलें तें इनाम चालेल !' यावर यांनी उत्तर केलें, 'बाजीराव यांनी आमचें सर्व जप्त केलें. त्यावरून मनांत आणलें कीं, साहेबाची दोस्ती व्हावी तरीच आमचें कल्याण. बाजीराव असतां तीन वर्षे साहेबाचे दोस्तीचा यत्न चालविला. आणि कंपनीसरकारची व महाराज सरकारची दोस्ती व्हावी हा यत्न केला. बाजीराव यांस कळतें तर मारलेच जातों ! बाजीराव यांनीं चालविलें तेंच जर चालवावयाचें तरी आम्हांस फळ काय झालें ? असो, नशीब आमचें ! !' यावर 'तुम्ही यापुढे प्रतापसिंह महाराजांची सेवाचाकरी करावी, मेहनत करावी, कृपा करतील' असें कांही तरी बोलून एलफिन्स्टन याने विषय आवरता

घेतला. तात्पर्य, आपलें कार्य साधल्यावर एलफिन्स्टनने सर्वांच्या तोंडाला पानें पुसलीं; आणि आमच्यांतल्या ज्या कांहीं शहाण्या म्हणविणाऱ्या व्यक्तींनी क्षुल्लक स्वार्थाच्या आशेने आपण एक मोठें ' राजकारण ' घडवून आणण्यांत गुंतलों आहों असा आव आणला होता, त्यांची पूर्ण निराशा होऊन, ' बापापरी बाप गेला आणि बोंचलतांना ओठ गेला ' या ग्राम्य म्हणीचा त्यांना प्रत्यय आल्याशिवाय राहिला नाहीं ! " फितुरांनीं राज्य बुडविलें " या प्रभाकर शाहिराच्या करुण आक्रोशांत जशी तत्कालीन मराठी राज्याची वस्तुस्थिति व्यक्त होते, त्याप्रमाणेंच इंग्रजांच्या भेदनीतिप्रवण राजकारणावरहि त्यानें प्रकाश पडत नाहीं काय ?

३

# सातारच्या गादीचा शेवट

पेशवाई गेल्यानंतर पुढच्या चाळीस वर्षांत लोकांची दैना उडून जी चमत्कारिक स्थिति झाली त्याचें यथार्थ वर्णन करणें अशक्य आहे. पंचवीस वर्षांपूर्वी खर्ड्याच्या लढाईचे वेळीं ज्यांनीं पेशवाईचें सर्व वैभव आणि मराठे सरदारांची जूट पाहिली होती, त्यांनाच आपल्या डोळ्यांनीं १८१८ सालीं सर्व सरंजाम उध्वस्त झाले आहेत, सावकार लुटले गेले आहेत, आणि राजकीय सत्ता परकीय शत्रूच्या घरांत नांदण्यास गेली आहे असें पाहण्याची वेळ आली ! मराठी राज्यांत सरदार, सरंजामदार, वतनदार कांही थोडे नव्हते. पण संशयी स्वभावामुळे बाजीरावानेच अनेकांची वासलात लावली ; आणि यांतून जे उरले सुरले होते, त्यांना पुढें दहा-पांच वर्षांत इंग्रजांनीं नामशेष केलें. राज्यरक्षणाची जबाबदारी इंग्रजांनी आपल्या अंगावर घेऊन सरदारांचा फौजफाटा कमी करून टाकला; कायद्याचें राज्य आणि शांतता स्थापन झाल्यावर फौजेची जरूरीच काय ? कित्येक मूर्ख सरदारांना प्रथम त्यावेळीं असेंहि वाटलें की, पूर्वी फौज ठेवून चाकरी करावी लागत होती, आता घरबसल्या आयतें पेन्शन मिळतें तर यांत वाईट काय ? पण सरकारने

बहुतेक नेमणुका 'तहाहयात' ठरविल्या व कांहीं फक्त एक पिढीपर्यंतच जेव्हा चालू ठेवल्या तेव्हा, आपण केलें काय व त्याचें झालें काय, अशी सरदारांना पश्चात्तापाची वेळ आली! केवळ पोटाकरितां मनुष्य केवढी लाचारी पत्करतो हें पाहून वाईट वाटतें. पेशव्यांच्या खांद्याला खांदा भिडवून तळहातावर शीर घेऊन लढणारा हा सरदार वर्ग पेशवाईनंतर लाचार झाला आणि सरकार देईल तें घेऊन संतुष्ट राहूं लागला. बापू गोखले व विंचूरकर या दोन सरदारांशिवाय बहुतेक सर्वांनीं बाजीरावानें इंग्रजांशीं लढाईस सुरुवात करण्याचे सुमारास त्याचा पक्ष सोडला होता. "बाजीरावाच्या दुष्कृत्याबद्दल त्याला पदच्युत केलें तरी, त्याचे जागीं दुसरा कोणी बसवावा; पण पेशवाईची गादी बुडवूं नये अशी या सरदारांना इंग्रजांपाशीं खचीत रदबदली करतां आली असती. पण तसें करणें हें आपलें कर्तव्य आहे असें एकालाहि वाटलें नाहीं!"

पेशवाई गेल्यावर सामाजिक व आर्थिक परिस्थितीहि बदलून समाजावर अवकळा आली. श्री. शंकर बापूजी मुजुमदार यांनी 'पेशवाईनंतरचा पुण्याचा इतिहास' या पुस्तकांत लिहिलें आहे:—

"पेशवाईची कारकीर्द संपल्यावर पुणें शहराला दरिद्रकळा मूर्तिमंत दिसूं लागली. बाजीरावाच्या वेळेला संपत्तीचा प्रवाह मांडलिक संस्थानिकांकडून व सभोंवारच्या प्रदेशांतून सारखा येत होता. पण लढायांची धामधूम संपल्यावर पेढीवाले व सावकार यांना आपल्या संपत्तीचा प्रवाह अन्य मार्गानें वाढविण्याचा मार्ग नाहीसा झाला. बाजीरावाच्या वेळचें वैभव आणि संपत्ति लयास गेल्यानें, पुण्यांतील जरीचे व रेशमी कापडाचे व्यापारी व मागवाले, जे पैठणच्या व्यापाराची बरोबरी करीत असत, त्यांच्याकडे रेशमी माल व भरजरी कापडे यांची मागणी कमी झाल्यानें ते दरिद्रदशेला आले. कारकुनी पेशाचे कामगार हलाखींत आले व खेडयापाडयांत जाऊन निर्वाह करूं लागले. पेशवाईच्या भरभराटींत ज्याप्रमाणें उदरनिर्वाहाकरितां कोंकणांतून देशावर लोक आले त्याप्रमाणें, आतां अनेक कुटुंबें पुणें सोडून बडोदें वगैरे इतर संस्थानांत निर्वाहाकरितां गेलीं. पेशवाई गेल्यानंतर सुमारें आठ वर्षांतच पुणें शहरांत पूर्वी जो रंगेलपणा व जल्लोष नांदत होता तो सर्व नाहींसा होऊन शहराला उदासीनता आली व लोक आळसांत काळ घालवूं लागले! त्या वेळेस कितीएक लोक, हजारों सावकार, सरदार, कारकून, शिलेदार, कारखानेवाले

गृहस्थ, पालखींत बसून फिरणारे, यांस पायांत घालावयास जोडा नाहींसा होऊन ते अन्नासहि महाग झाले! त्यांचें लाखों रुपये सरदारांच्या दौलतीवर येणें होतें त्या दौलती बसल्या व त्यामुळें त्यांचें सर्वस्व गेलें. आनगळ, तांबेकर, वानवळे, गद्रे, परांजपे इत्यादि लाखोपती सावकार मंडळीजवळ नुसतीं खतें मात्र राहिलीं. कित्येकांचे घरीं एक दिवसाचें देखील अन्न नव्हतें. सुखवस्तु लोकांवर पूर्वीची दौलत मोडून खाण्याची पाळी आली. आदितवार पेठेंत जाऊन सोन्याचीं दुकानें पाहिलीं तर, दुरस्ता जुन्या दागिन्यांचे ढीग आढळतात. जुना दागिना लोकांचे घरचा खंडीच्या खंडी विकत आहे. इतर व्यापार मागें पडून पुण्यांत गहाणाचा व्यापार इतका माजला आहे कीं, कोट रुपयांचा व्यापार आज चालत आहे व पुण्यांतील बहुतेक द्रव्य गहाण ठेवणें अगर गहाण देणें यांत गुंतलेलें आहे.' ( पृ. ४५ ).

पेशवाई असतांना महाराष्ट्रांत लष्करी पेशाला भरभराट आली होती. दारीं घोडें नाहीं असें घर नाहीं आणि ज्याला घोड्यावर बसतां येत नाहीं असें घरांत मनुष्य नाहीं, अशी पूर्वी महाराष्ट्रांत अक्षरशः स्थिति होती. आणि स्वतः पेशवेच पराक्रमी निघाल्यामुळें महाराष्ट्रांतलें लष्करी तेज घांसून पुसलेल्या तरवारीप्रमाणें लखलखीत होतें. पण पेशवाई बुडाल्यामुळे त्या तरवारीचे आतां नांगर करण्याची वेळ आली. कारण शांततेच्या साम्राज्याच्या नांवाखाली लोकांचा हा लष्करी पेशा सरकारने साफ आटोपला होता. जो कोणी पेशव्यांचा पक्षपाती अगर स्वाभिमानी सरदार सरंजामदार, किंवा उंच वृक्ष होता तो इंग्रजाने कापून टाकला होता. आणि बाळाजी नातूसारखी जी फितुरी अगर खुषमस्करी प्रजा होती ती लोकांत पुढारीपण मिरवूं लागली होती. हेच अव्वल इंग्रजींतले पहिले पुढारी! इंग्रजांची व आपली गांठ ईश्वराने मुद्दाम आपल्या हिताकरितां घातली आहे असें यांनीच लोकांना पढविलें! जुन्या विद्येचा आश्रय जाऊन इंग्रजी शाळा, छापखाने, लायब्ररी, समाज यांची पुण्यांत स्थापना झाली आणि मिशनरी व्याख्यानें देऊं लागले. जुन्या पंचायती मोडल्या नव्या आदालती आल्या. पण यांतलें लोकांना काय कळत होतें? पेशवे कसेहि असले तरी पेशवाईंत आबादी आबाद होती यांत शंकाच नाहीं. "मनुष्यमात्रादिकांचें माहेर होती पेशवाई" हें शाहीरानें केलेलें वर्णन अक्षरशः खरेंच होतें. विजयानगरीच्या सप्तकोटांप्रमाणें, पेशव्यांनीं महाराष्ट्राभोंवतीं शेंकडों संस्थानें, मांडलिक्या व जहागिऱ्या उत्पन्न करून पुण्याची मध्यवर्ति राजधानी अजिंक्य करून ठेविली होती.

हिंदुस्थानांतल्या सर्व संपत्तीचे झरे पुण्याकडे वाहात असत. तें सारें वैभव लोपून जिकडेतिकडे परक्या फिरंगी सत्तेची छडी फिरूं लागली आणि लाखों लोकांना दुपारच्या वेळीं पोटाची भ्रांत पडूं लागली. मग त्यांना पेशवाईच्या जुन्या वैभवाची आठवण कां न होईल ? प्रळय करणारा पर्जन्य मुसळधारेने ओतूं लागला म्हणजे जो तो सांपडेल त्या वळचणीचा आश्रय घेतो त्याप्रमाणें, अनेकांनीं राहिलेलीं संस्थानें, सरंजामदार व जहागिरदार यांचेकडे धाव घेतली. त्यांना वाटे पुराचें पाणी फार तर उद्यां ओसरून जाईल. पण प्रळय करणाऱ्या या पावसाच्या वृष्टीमध्यें थोडाबहुत आश्रय देणारें हें झाड तरी टिकावें. वाहून जाऊं नये. पेशवाई गेल्यावर संस्थानांबद्दल लोकांना प्रेम कां वाटे याचें कारण हें आहे ! पण त्यावरहि पुढें गदा आली. पेशव्यांच्या मुख्य सत्तेचा वटवृक्ष नष्ट झाल्यावर, किरकोळ सरंजाम व इनामें यांसारख्या पाल्यापाचोळ्याला व रोपट्यांना कोण विचारतो ?

शिलेदार मंडळींचा लष्करीपेशा बुडाल्यावर रामोशीपणा, पेंढारीपणा असे सुचतील ते उद्योग पदरीं तीसचाळीस घोडीं बाळगून हे लोक करूं लागले. उघड उघड रामोशीपणाचा धंदा करणारे लोक नुसत्या पुणें व सातारा जिल्ह्यांत सुमारें १७००-१८०० होते असा उल्लेख आढळतो. उमाजी नाईक हा या वर्गाचा प्रतिनिधि म्हणतां येईल. अडपझडप सांपडेल तेथें वाटमारी व लूट करणारी ही मंडळी शंभूमहादेवाच्या डोंगरांत सह्याद्रीच्या आश्रयाला राहून आपली गुजराण करीत. त्यांचा बंदोबस्त करण्यांत इंग्रजांनाहि तीस चाळीस वर्षे मुळींच यश आलें नाहीं व यांतल्या प्रमुख नाइकांशीं इंग्रजांना प्रथम तरी तहच करावा लागला ! उमाजी नाइकाला पुढे जेव्हां कॅप्टन मॅकिन्टॉशने पकडलें तेव्हां त्याने अभिमानाने उत्तर दिलें कीं, 'माझा विश्वासघात केला गेला नसता तर मी तुमच्या हातीं कधींच लागलों नसतों. तुम्ही मला काय समजतां ? एखाद्या भटभिक्षुकाबरोबर माझी बरोबरी करूं नका ! बाजीराव पेशव्यास जसें त्याच्या गादीवरून इंग्रजांनीं हुसकून दिलें तसें ते मला पुरंदरच्या डोंगरांतून केव्हांच हुसकूं शकणार नाहींत ! त्यांनीं याबद्दल एकदां आपलें बुद्धिसर्वस्व आणि खटपट पुष्कळ करून पाहिली आहे, पण त्यांत त्यांना मुळींच यश आलें नाहीं.'' मॅकिन्टॉशनें लिहिलें आहे—" शिवाजीसारखें आपणहि राज्य स्थापावें अशी उमाजीची मोठी महत्त्वाकांक्षा होती. व शिवाजीचें चरित्र तंतोतंत डोळ्यांपुढे ठेवून आपल्या आयुष्याचा क्रम त्यानें चालविला होता. त्याच्या अंगीं बुद्धिमत्ता, चाणाक्षपणा, हुषारी, महत्त्वाकांक्षा इत्यादि गुण होते.

परंतु त्याला काळाची अनुकूलता नव्हती. शिवाजीच्या वेळचा काळ निराळा व आतांचा काळ निराळा ! यामुळें मराठी राज्यांत तो जो एखादा शूर सरदार झाला असता, तो मराठी राज्य लयास गेल्यावर, त्यानें असला धंदा पतकरल्यामुळें दरोडेखोर व बंडखोर ठरला ! ”

श्री. सरदेसाई लिहितात, “ हे परके राजे आम्हांस नकोत, त्यांचा येथें जम आम्ही बसूं देणार नाहीं, अशी या रामोशांची भावना कैक वर्षें कायम होती. हा प्रकार त्या वेळीं केवळ महाराष्ट्रांतच होता असें नाहीं, तर उत्तर हिंदुस्थानांतहि तसाच चालू होता. परके इंग्रज देशांत घुसले ते कोणासहि नको होते. १८३० त ठग आणि डाकू यांचा देशभर एवढा धुमाकूळ माजला, कीं त्यासाठीं इंग्रज सरकारास स्वतंत्र खातीं निर्माण करून या बंडखोरांचा बंदोबस्त करावा लागला ! ”

१८१८ नंतर दाहापंधरा वर्षें पुण्यांत कमिशनरचा अंमल होता. त्यानंतर सरकारनें अदालती स्थापून नवी न्यायपद्धति सुरू केली व कायदे करण्यास सुरुवात केली. राजसत्तेची जुनी घडी विसकटली होती आणि नवें राजिक अद्याप रूढ व्हावयाचें होतें; अशा स्थितींत इंग्रजी न्यायकल्पना लोकांच्या नीटशा लक्षांत येईनात व कायदे निर्माण झाल्यामुळें लोकांचा त्यामुळें बराच गोंधळ झाला. त्यापूर्वीं मराठी राज्यांत कायदा नसल्यामुळें जणुं कांहीं सर्वत्र झोटिंगपातशाही होती, व आतां मात्र नव्या कायद्यामुळें सगळीकडे न्याय आणि समता यांचा उजेड पडणार होता, असें थोडेंच होतें ? यापूर्वीं शेंकडों वर्षें दिवाणी कामें ग्रामपंचायती निकालांत काढीत. चोऱ्या वगैरे फौजदारी गुन्हे असले तरीहि गांवाबाहेर कसलेंच प्रकरण बहुधा जात नसे. कोणाच्या मताने मराठी राज्य कितीहि भिकार असो, परंतु चोरीचा माल न सांपडला तर गांवच्या पाटलाला तो भरून द्यावा लागत असे, अशी दानतीची व जिम्मेदारीची गोष्ट गेल्या शंभर वर्षांच्या इंग्रजी राज्यांत कोणी कधीं ऐकली आहे काय ? या कारणामुळें राज्यसत्तेनें लक्ष घालण्यारखें गुन्हे थोडे घडत. माळडोंगरावर गवत उगवावें त्याप्रमाणें, या ग्रामसंस्था अनादि कालापासून निर्माण होऊन हरएक प्रकारचा लोक व्यवहार आटपीत. व ही पद्धति लोकांच्या अंगवळणीं पडून किती लोकप्रिय झाली होती हें, ‘ पांचा मुखीं परमेश्वर ’ या एकाच म्हणीवरून दिसून येईल ! दक्षिणेंतील रीतीरिवाजासंबंधाने सन १८२७ सालीं

चापलीन याने जो रिपोर्ट केला त्यांत त्याहे ' जुनी न्यायपद्धति मोडूं नये ' असें म्हटलें होतें. व माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यानेहि आपलें मत असेंच दिलें होतें. लोकांचा व्यवहार बिनबोभाट व समाधानाने होत आहे तर, त्यांत इंग्रजाने हात घालण्याचें काय कारण होतें? पण तसें न करतील तर ते इंग्रज कसले! आणि त्याचा परिणाम इतकाच झाला कीं, सामान्य लोकांमध्यें कोर्टाची पायरी न चढतां जो व्यवहार आजवर शेंकडों वर्षे बिनबोभाट चालला होता त्याचें मात्र दिवाळें निघालें! इंग्रजांच्या गुणाचे अत्यंत चहाते सर दिनकरराव राजवाडे यांनीहि पुढे सरकाराला ज्या राज्यसुधारणेविषयीं सूचना केल्या त्यांत ' हल्लीं इंग्रजी राज्यांत कायदे फार झाले ' अशी तक्रार केली होती; यावरूनहि लोकांची ही अडचण किती खरी होती हें दिसून येईल!

इंग्रजी अंमल झाल्यावर सरकारने सरदार व इनामदारांच्या हक्क तपासणीस सुरुवात केली. " पेशवाईचें दप्तर नाना फडणीस असेपर्यंत अत्यंत उत्कृष्ट व नमुनेदार होतें; पण पुढें बाजीरावींत त्यांत अव्यवस्था झाली. इंग्रजांनी पेशवे दप्तराची जी अव्यवस्था केली त्यांत त्यांचे राजकीय हेतु होते हें उघडच आहे. पेशवाई दप्तर लावण्याच्या मिषानें अमुक मुदतींत सर्वांनी आपले जुने कागद आणून हजर करावेत असा हार्ट साहेबांनी जाहीरनामा लाविला, व कांहीं कागद येण्यास सुरुवातहि झाली; तों दुसरीकडे एका अधिकाऱ्याने त्यांतील कागद जाळण्यास सुरुवात केली! त्यामुळें लोक अग्नींच्या भयाने कागद हजर करीनात. तेव्हां लोकांचीं घरें जप्त करावीं, मुसलमान व मराठे लोक घरांत घालून दंगा मांडावा, दिवसा मशाली लाऊन घरांतून कागदांचा पुर्जानपुर्जा सरकार कचेरींत न्यावा, इमारतींत खणत्या लावाव्या असे सक्तीचे उपाय योजले जाऊन होळकरांच्या दंग्याची पुणेंकरांना आठवण झाली. कागद मागून न्यावे व ते परत देऊं नयेत अशीं उदाहरणें कित्येक घडलीं, यामुळें इनाम कमिटीच्या कारभारासंबंधाने लोकांत मोठा अविश्वास उत्पन्न झाला होता. " दुसरेंहि एक कारण असें दिसतें कीं, ज्यांनी फितुरी करून पेशवाई बुडविली ते बाळाजींपंत उर्फ दादा नातु कमिटीच्या अंमलदारांपैकीं सरपंच असून, त्यांनी आतां सरदारांच्या बाबतींत आपलें लक्ष बारकाइने घातलें होतें! लोकहितवादीहि इनाम कमिशनवर एक कमिशनर होते. सन १८६२ साली ( म्हणजे इनाम कमिशनचें काम पूर्ण होऊन, व नंतर बंद होऊन गेल्यावर ) त्यांनीं आपल्या लेखसंग्रहांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे—

" वडील पुत्राचा वंश नाहीं म्हणून इनाम कमिटीनें मुंबईलगतचें आंग्रे यांचें संस्थान बुडविलें. त्यावेळीं त्या बिचाऱ्याचें खासगी इनाम वतन, देशमुखी पाटिलकी सर्व घेतलें. खासगी मिळकत सरकारने घेण्याचें कारण नाही; पण तिचाहि चुराडा झाला, असें उदाहरण शेवटचे बाजीराव पेशवे यांची जी अगदीं वाईट कारकीर्द त्यांतहि आढळणार नाहीं. नानांचें इनाम घरदार बाजीरावाने जप्त केलें; पण त्याला कारण दोघांत राजकारणामुळें मोठा द्वेष पडला होता. पण आंग्रे हे सरकारचे दोस्त होते. सरकारचें कुत्रें जरी त्यांचे घरीं गेलें तरी त्याचा मान राहात होता; मग गव्हर्नरची गोष्ट काय विचारावी?...साताराचे राज्याबाबत अशीच गोष्ट. यावरून लोकांस असें वाटलें कीं, कोणत्याहि रीतीने सरकारशीं वागलें तरी आमचीं राज्यें खालसा करण्यावर दृष्ट. बऱ्यावर नाहीं...कांहीं तरी निमित्तानें संस्थान खालसा करावें व त्याजबरोबर खासगी मिळकत घशांत उतरावी असा क्रम चालला होता. मूळ पुरुषाच्या हयातीपर्यंत इनाम चालावें असे जेव्हां फैसले झाले त्याच्यापूर्वीच ते पुरुष मेले होते. सबब त्यांचे पुत्रापासून तीं इनामें हिसकावून घेतलीं त्या वेळीं त्यांची अकस्मात आकाश कोसळावें अशी स्थिति झाली. ज्या उत्पन्नावर शंभर वर्षे निर्वाह चालला होता व ज्याच्या जोरानें कितीएकाने कर्जें काढून लग्नें केलीं होतीं, घरें बांधलीं होतीं, तें सर्व नाहीसें झालें!" (पृ. ५६८)

इनाम कमिशनने बत्तीस हजार इनामांची चौकशी केली. आणि त्यांतहि **एकवीस हजार** वतनें मालकीचा पुरावा नाही म्हणून जप्त केलीं! म्हणजे इतके वतनदार चोर व उपरी होते असें ठरलें! पण वहिवाटीचा हक्क हा कायदेशीर रीतीनें मालकीचा पुरावा नाहींच की काय? वीस वर्षेइतका स्थावर मिळकतीचा ताबा दाखवितां आला तर कायदेशीर मालकी कोर्ट मानतें तर, ज्यांचीं वतनें व हक्क दोनदोनशें वर्षेइतके जुने होते, त्यांचे मालकी हक्क वहिवाटीच्या आधारावर मान्य करण्यास खरोखर काय हरकत होती? जुने लेख वर्षानुवर्षें सहसा अस्तित्वांत राहूं शकत नाहींत म्हणूनच वहिवाटीचा पुरावा ग्राह्य मानण्याची प्रथा व संकेत कायद्यांत रूढ झाला आहे. पण सरकारला या वेळेला लेखी पुरावाच पाहिजे होता! याचाच उघड अर्थ असा कीं, इंग्रजांच्या पोटांत पाप होतें व त्यांना हीं वतनें जप्त करावयाचीं होतीं. दिनकरराव राजवाडे यांच्या चरित्रांत श्री. ओक यांनीं म्हटलें आहे की, 'ज्यांचेवर अनेक आश्रित अवलंबून असून ज्यांचें आयुष्य आजवर सुखांत व ऐश्वर्यांत गेलें होतें, त्यांचेवर एकाएकीं खडकावर उन्हांत उभे

राहण्याची पाळी आली. हें दुःख लहानसहान आहे काय?" वतन आणि जमीन या दोन गोष्टी मराठ्यांना आजवर कशा प्राणाहून प्यार होत्या, हें इंग्रजांना कसें कळणार? हीं वतनें मिळविण्याकरितां रक्त सांडावें लागलें होतें; रक्षण करतांना देखील रक्तच सांडलें होतें! राज्यक्रांति झाली म्हणून जुन्या वहिवाटी, वतनें वगैरे बुडविण्याचें काय कारण? मोंगलांनीं देखील जी गोष्ट केली नाही, ती इंग्रजांनीं केली! लोकांना हा केवढा विश्वासघात वाटला असेल? पूर्वी इंग्रजाने दिलेला शब्द म्हणजे काळ्या दगडावरची रेघ मानीत. पण नंतर लबाड मनुष्याच्या शब्दापेक्षां त्याला किंमत उरली नाहीं! आणि त्यांनी सातारचें राज्य नाहक्क बुडविल्यावर तर इंग्रजाची जातच विश्वासघातकी आहे, ही गोष्ट लोकांच्या ढळढळीतपणें निदर्शनास आली!

पूर्वी बाजीरावाचा पाडाव करण्याकरिता कांहीं दिवस इंग्रजांनी सातारची गादी कायम ठेवली; पण छत्रपतीचा उपयोग केल्यानंतर एरवीं जो सलग ब्रिटिश मुलूख झाला असता, त्यांत या सातारच्या संस्थानाची अडचण वाटूं लागली! मुंबईस एल्फिन्स्टन व साताऱ्यास ग्रँट हे असतांना प्रतापसिंहाचे दिवस कांहीं बरे गेले. पण नंतर जे एकेक रेसिडेंट सातारला आले, त्यांच्या पोटांत पाप असल्यानें प्रतापसिंहाच्या छळास सुरुवात झाली. प्रथम छत्रपतीला इंग्रजांनीं दिलेल्या वचनांची मोठी आशा होती! त्याला सहजच वाटलें कीं, मूळ धनी आपण, त्या अर्थी बाजीरावाला काढल्यावर पेशव्यानें सर्व राज्य आपणांलाच मिळेल. इंग्रज तरी कायद्याबाहेर कोठून वागेल? पण कृष्णा, वारणा, नीरा व भीमा या नद्यांमधील केवळ तीनचार जिल्ह्यांचें राज्य त्याला बहाल करण्यांत आलें. हें म्हणे महाराष्ट्राच्या छत्रपतीचें राज्य!! आणि पुढें जेव्हां याच राज्याच्या सीमेबद्दल वाद निघून तहांतल्या मूळ अटी काय होत्या, याबद्दल प्रश्न निघाला तेव्हां, "एल्फिन्स्टन या अटींचा जो अर्थ करील तो मी मान्य करीन" अशी प्रतापसिंह हमी देत असतांहि, एल्फिन्स्टननें खुलाशादाखल तोंडांतून एक अक्षर बाहेर काढलें नाहीं!

उलट प्रतापसिंहानें विलायतेस अपील केलें याचाच मुंबई सरकारला राग आला. व हाच त्याच्या मनोमय बंडखोरीचा पुरावा मानला गेला. यानंतर ओव्हॅन्स व बाळाजीपंत नातू यांनीं प्रतापसिंहाविरुद्ध अनेक खोटे साक्षीपुरावे तयार करून

कारस्थानें केलीं व प्रतापसिंहानें इंग्रजांविरुद्ध बंड करण्याचा प्रयत्न केला असा त्याजवर आरोप आणला. पण गंमत ही कीं, पांचसहा वर्षे हीं सर्व कारस्थानें गुप्त रीतीनें शिजत असतां आणि साक्षीदारांचा पुरावा गुप्तरीतीनें कमिशनपुढें घेतला जात असतां, प्रतापसिंहावर आरोप काय आहे याची त्याला वार्ताहि दिली नाहीं, मग बचाव करण्याची सवड त्याला कोठून मिळणार? इतर पुराव्यानेंहि हे आरोप परस्पर शाबीत होईनात. सर्वच खोटें तर तें पुराव्यानें शाबीत कसें होणार? बरें, आरोप तर केले व आतां ते न शाबीत झाल्यामुळें परत घ्यावे यांत रेसिडेंटची फजिती होऊं लागली. म्हणून "माफी लिहून द्या म्हणजे सर्व पूर्ववत् होईल" असें म्हणून ओव्हॅन्स याला प्रतापसिंहाचा छळ करण्याची बुद्धि झाली. यांत कपट हें होतें कीं, या माफीपत्राचाच उपयोग पुढें प्रतापसिंहाच्या सरणाला करावयाचा होता. राजानेंच माफीपत्र लिहून दिलें मग त्याच्यावरील आरोप खोटे असले तरी ते लोक खरेच मानणार. आणि यांत इंग्रजांना असा पुकारा करण्याला मोकळीक मिळणार होती कीं, 'राजा मेला तो स्वतःच्या मरणानेंच मेला हें पहा त्याच्या दुष्कृत्याबद्दल त्याचें स्वतःचें माफीपत्र!' पण प्रतापसिंह खरा धीर मनुष्य होता. त्याच्या अंगीं बुद्धिचातुर्य अगर शौर्य नसलें तरी धैर्य खचित होतें. म्हणून असल्या खोट्या माफीपत्रावर त्यानें सही करण्याचें तर साफ नाकारलेंच; पण जाहीर कमिशनच्या समोर ते आरोप शाबीत करीपर्यंत आपणांस त्या राज्याचीहि जरूर नाही असें मुंबई सरकारला लिहून कळविलें! या बाणेदारपणाचा परिणाम इतकाच झाला कीं, इंग्रजांनीं प्रतापसिंहाला पदच्युत करून आप्पासाहेबाला गादीवर बसविलें व प्रतापसिंहाची काशीस रवानगी केली.

प्रतापसिंहावर बंडाचें वावटळ येतांच मुंबईसरकाराकडून न्याय मिळण्याची आशा नाहीं असें पाहून त्यानें रंगो बापूजीस विलायतेस पाठविलें. तेथें त्याने सर्व कागदपत्र छापवून पार्लमेंटच्या सभासदांस वाटले व कोर्ट ऑफ डायरेक्टरांच्या सभा भरवून मुंबईसरकार व त्यांचे बाळाजीपंत नातूसारखे साथीदार यांचीं कारस्थानें वेशीवर टांगलीं. गोव्याच्या पोर्तुगीज गव्हर्नरशीं प्रतापसिंहानें पत्रव्यवहार केला असा त्याचेवर एक आरोप होता. पण प्रतापसिंहाचा वकील जॉर्ज थॉमसन यानें हा आरोप खोडून काढण्याकरितां खुद्द पोर्तुगॉलच्या गव्हर्नरचेंच पत्र आणून डायरेक्टरांच्या सभेपुढें ठेवलें! त्यांत गव्हर्नरनें म्हटलें होतें की, प्रतापसिंहानें मला अगर मी प्रतापसिंहाला जन्मांत कधींहि कसलेंहि पत्र पाठविलें

नाहीं! यामुळें बंडाचा तर आरोप ढासळलाच पण मुंबई सरकारची खरी फजिती कृष्णाजी सदाशिव भिडे यांनीं पुण्याच्या कलेक्टरपुढें केलेल्या प्रतिज्ञापत्रकामुळें झाली. भिडे हे कारकुनी फडांतील कारकून. त्यांच्याकडून कांहीं बनावट पत्रें प्रथम करवून घेण्यांत आलीं होतीं. तथापि अंगीं पक्की कारकुनी असल्यामुळें बाळाजीपंत नातूची अनेक कृष्णकृत्यें व लचांडें भिडे यांना पत्त्यामुद्दयामुद्धां माहीत होतीं. प्रथम भिडे यांनीं कोणाचीही सही न करितां, बनावट पत्रांतला मजकूर त्यांना देण्यांत आलेल्या मसुद्याप्रमाणें स्वहस्तानें लिहून दिला. पण नंतर त्यांच्याच मनानें उलट खाली व सदरील पत्रें पूर्ण बनावट असून माझ्याकडून तीं लिहून घेतलीं, असें त्यांनीं प्रतिज्ञापत्रकावर लिहून दिलें तेव्हां ओव्हॅन्स व बाळाजीपंत नातू यांना समोर बाँब पडल्यासारखें झालें. नातूसारख्या दीर्घद्वेषी घातक सर्पाच्या एकदा वाटेला गेल्यावर भिडे यांना हा उद्योग मध्ये सोडून देणें शक्यच नव्हतें. अनेक ठिकाणीं अफरातफर करून नातू यांनीं पैसे खाल्ल्याचा लेखी पुरावा गोळा केला आणि मुंबई सरकारनें या प्रकरणाची चौकशी करावी असा अर्ज केला; इतकेंच नव्हे तर, आपण सांगितलेल्या माहितींतील प्रत्येक अक्षर खरे आहे असा पुण्याच्या कलेक्टरपुढें प्रतिज्ञालेख करून, आपण खोटें ठरल्यास एक हजार रुपयांचा जामीन व पांच हजार रुपयांचा जातमुचलका लिहून दिला. इतक्या थरावर गोष्टी आल्यावर एक प्रकारें हें मुंबई सरकारच्या अब्रूलाच आव्हान होतें; आणि विशेष हें कीं एका दरिद्री ब्राह्मणानें हें साहस पत्करिलें होतें! खोटे कागद लिहिल्याबद्दल पहिला वार यांत कदाचित् भिडे यांचेवरच होण्याचा संभव होता. तथापि, बाळाजीपंत नातू व मुंबई सरकार यांच्या अब्रूचीहि यांत आहुति पडल्याशिवाय राहणार नाहीं, असा दूरवर धोरणी कयास बांधून भिडे यांनीं धैर्यानें हा हल्ला केला होता याचें फारच् कौतुक वाटतें. सरकारला भिडे यांचेवर फिर्याद करण्याची छाती झाली नाहीं, याचा फायदा घेऊन जार्ज थॉम्सन यानें भिडे यांनी नातूवर केलेले सर्व चार्जशीट डायरेक्टरांच्या सभेंत वाचून दाखवून मुंबई सरकारचें तोंड फोडलें!

इतकें सर्व झालें पण प्रतापसिंहाला पदच्युत करून त्याचेवर जे आरोप आणलेले होते त्यांचा अधिकृत रितीने निर्णय कांहीच लागला नाही. सत्तेपुढे शहाणपण चालत नाही म्हणतात तें यालाच! रंगो बापूजी पांच सहा वर्षें विलायतेस राहिला. पण १८४७ मध्ये खुद्द प्रतापसिंहच काशीस वारल्यामुळे त्याच्या सर्व

प्रयत्नांची इतिश्री झाली व त्याला इकडे यावें लागलें. १८३९ सालीं प्रताप- सिंहास पदच्युत केल्यानंतर सरकारने अप्पासाहेब यांस गादीवर बसविलें तेहि १८४८ सालीं वारले. मृत्यूपूर्वी अप्पासाहेबाने दत्तक घेतला होता ही गोष्ट मृत्युपत्रावरून उघडकीस आली. पण डलहौसीने कोणत्याच दत्तकाला मान्यता दिली नाही व साताराची गादी खालसा केली !- तात्पर्य दुर्व्यवस्था, कपट, कट, बंड, अराजनिष्ठा यांपैकीं कोणत्याहि आरोपांत सातारकर महाराज जरी सांपडले नाहीत तरी अखेर निपुत्रिकत्वापुढे त्यांना हार खावीच लागली. पण यांत खरोखर इंग्रजी सरकारला भूषण वाटण्यासारखें काय होतें ? यापेक्षा जेत्याचा हक्क सांगून राजरोस त्यांनी तोफा डागून साताराचें राज्य बुडविलें असतें तर त्यांना कोण काय म्हणालें असतें ? त्यांतहि विशेष हळहळ वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे, बाजीरावावर जसा बंडाचा आरोप होता तोच आरोप त्यांनी राजनिष्ठेचा मूर्तिमंत पुतळा असलेल्या प्रतापसिंहावर ठेवला ! बाजीरावाचें राज्य खरेखुरे बंड केल्याने तरी गेलें; पण प्रतापसिंहाचें राज्य बंडाच्या खोट्या आळानेच गळून पडलें ! शत्रू मानलेल्या बाजीरावाचें शासन ज्या हातांनी इंग्रजांनी केलें त्याच हातांनी परममित्र म्हणून दोस्ती जोडलेल्या प्रतापसिंहाचा त्यांनी निःपात केला ! प्रतापसिंहाचा असा छळ होत असतां आणि पार्लमेंटरी कमिटीपुढे पांच सात वर्षे त्याच्या चौकशीचें प्रकरण गाजत असतां, प्रतापसिंहाचे बडे दोस्त म्हणून मिरवणारे ग्रँट् डफ व एल्फिन्स्टन, यांनी एक अक्षर देखील तोंडांतून बाहेर काढलें नाही ? याचेंच नांव इंग्रजी राजनीति ! या विषदिग्ध राजनीतीच्या डोळ्यांना मैत्री दिसत नाही व तिला माणुसकीचीहि चाड नाही !—

" An opinion is now very commonly entertained that the erection of Satara inro a separate principality was a mistaken proceeding. It is at least clear that this principality includes the finest part of the Deccan and by its position most awkwardly *breaks the continuity* of the British territory. There are those, Therefore, who will hail the present crisis as affording an excellent opportunity of repairing the error alluded to, by pulling down the inconvenient *pagent* we have erected."

Robert Grant

सातारा खालसा करण्यांत इंग्रज सरकारचें खरें मनोगत काय होतें हें रॉबर्ट ग्रँट याच्या वरील उद्‌गारांप्रमाणेंच पुढील दोन पत्रांवरून दिसून येईल. कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचे अध्यक्ष हॉबहाऊस हे गव्हर्नर जनरलला ता. २४ डिसेंबर १८४७ रोजीं लिहिलेल्या पत्रांत लिहितातः—

"प्रतापसिंहाचा मृत्यु योग्यवेळीं घडून आला! हल्लीच्या राजाची प्रकृति बरी नसते असें मी ऐकलें आहे. त्याला मूल बाळ न होतां तो मरण पावला म्हणजे सातारा खालसा करण्याला कोणतीच आडकाठी उरणार नाही. तो दत्तक घेऊं म्हणेल तर दत्तकाची परवानगी देण्यांत येऊं नये. माझ्या कारकीर्दीत ही गोष्ट घडून आली तर, ब्रिटिश राज्यांत सातारा सामील करण्याबाबत मी कोणताच उपाय योजावयाचा शिल्लक उरूं देणार नाही!"

तसेंच ता. ३० ऑगष्ट १८४८ रोजीं डलहौसीने जो खलिता लिहिला आहे त्यांत तो स्पष्टच म्हणतो—"१८१८ सालीं पेशवाईचा नुकताच लोप झाल्यामुळे इंग्रजी सत्तेला महाराष्ट्राचा पाठिंबा मिळावा म्हणून त्यावेळीं सातारचें राज्य अबाधित राखणें अत्यंत जरूर व शहाणपणाचें असेल, नव्हे होतेंहि, आणि त्याबद्दल त्यावेळचे अधिकारी प्रशंसेस पात्र आहेत; पण पेशवाई ताब्यांत घेऊन आता तीस वर्षें लोटलीं आणि प्रजाहि दंगाधोपा न करतां शांतपणें नांदत आहे; यामुळे सातारचें राज्य हें आता अबाधित राखण्याचें कोणतेंच कारण उरलें नाही. इंग्रज राज्य आता मजबूत झालें असून, शिंदे, होळकर हे निरुपद्रवी बनले आहेत. तेव्हां शिवाजीच्या वंशजाचें हें बुजगावणें यापुढे ठेवण्यांत कांहीच मतलब नाही!"

सातारची गादी अशा दांडगाईमुळे बुडाल्यामुळे एकंदर सारा देश हळहळला! कारण मराठी साम्राज्याचें तें आदिपीठ होतें. कित्येकांना त्यापूर्वी आशा होती की, विलायतेंत तरी न्याय मिळेल. यामुळे कायदेशीर व सनदशीर प्रयत्नाची कोणतीच बाकी उरली नव्हती. पण अखेर रोकडी निराशा अनुभवाला आल्यामुळें, लोकांना असें निश्चित वाटूं लागलें की विलायतचे काय अगर हिंदुस्थानचे काय, हें सारे इंग्रज सोदे आहेत! त्यांच्या स्वार्थापुढे ते बंडखोर शत्रू आणि परम राजनिष्ठ मित्र यांत देखील भेद करीत नाहीत. एरवी सातारचें राज्य बुडविण्याला काय कारण होतें? कर्नल लो याने मालकम याला लिहिलें 'प्रत्येक हिंदी इसम

मला विचारतो की, सातारच्या राजाने इंग्रजांचें असें काय घोडें मारलें होतें की त्यांनी त्याचें राज्य घ्यावें ? सरकारच्या या धोरणामुळे संस्थानिकांचा सरकार-वरील विश्वास पार ढासळून गेला आहे ! ' औरस मुलगा नसला म्हणून काय झालें ? दत्तक घेऊन निपुत्रिकत्वाचा परिहार करणें ही गोष्ट आज शेंकडों हजारों वर्षें हिंदू लोकांत चालत आलेली आहे. सर्वांनाच कांही पुत्रसंतती सदैव होऊं शकणार नाही; कधी तरी त्यांत खंड पडणारच. म्हणून कोणी कोणाचीं राज्यें खालसा करावयाचीं असें ठरविलें म्हणजे सर्वच कारभार संपला ! सातारच्या घराण्यांत पूर्वी दोनदां दत्तविधानें झालीं होतीं तथापि प्रतापसिंहाचा वारसा इंग्रजांना मान्यच होता ना ? मनुष्याला वाटेल तर तो दत्तक घेईल किंवा घेणार नाही. ती त्याच्या इच्छेची बाब आहे. मुलगा नसला तर मिळकत फार तर चुलत घराण्यांत जाईल; किंवा ती त्याचे शाखाबांधव घेतील. किंवा तिचें काय व्हवें तें होईल ! इंग्रजांनी त्यांत पडण्याचें काय कारण ? इंग्रज ही कांहीं मराठ्यांची अवलाद नाही; मग निपुत्रिक हिंदु लोकांच्या राज्याचा वारसा इंग्रज कसा घेऊं शकतो ?

कोणी म्हणत "मुलगाच वारस हवा हें शास्त्र कोठलें ? मुलगीहि वारस असूं शकेल. वारस पुत्रालाच जर राज्यावर बसण्याची पात्रता मानावयाची तर, विलायतेंत व्हिक्टोरिया राणीला तरी राज्यावर बसण्याचा काय अधिकार आहे ?" पण सत्तेपुढे शहाणपणाचा उपयोग काय ? पुढे दहा वर्षांनंतर जेव्हा डलहौसीने अयोध्येचें राज्य बुडविलें तेव्हा या राज्यकर्त्यांच्या शहाणपणाची मजल इतकी गेली होती की, अयोध्येच्या नबाबाशीं केलेल्या नव्या तहांत "या राज्याचा वारसा **फक्त औरस पुत्रसंततीकडेच** जाईल, इतर शाखाबांधवाकडे जाणार नाही," अशी डलहौसी याने अटच घातली !—' It will be seen that the succession was limited to children born of lawful wedlock and was not extended to collateral heirs ' ( Oudh papers 1858, p. 252. ) असल्या तर्कटाला साऱ्या हिंदु व मुसलमानी शास्त्रांत तरी आधार सांपडेल काय ? टॉरेन्स लिहितो—" इंग्रज या देशांत स्थायिक झाल्यावर अनेक देशी राजांशीं त्यांचे तहनामे उर्फ करार झाले. या तहनाम्यांत आम्ही तुमचें राज्य तुमचे घराण्यांत यावच्चंद्रदिवाकरौ वंशपरंपरा चालवूं, अशी अट अर्थातच होती. असल्या तहनाम्यांची भाषा ही नेहमीच सामान्यतः मोघम असते.

वारसाचा सर्व कायदा त्यांतले श्लेष व अपवाद यांसकट कांहीं कोणी तहनाम्यांत लिहीत नाही! त्यांतहि समजा, पुढे एखादा प्रश्न संदिग्ध राहिला तर, आंतरराष्ट्रीय कायद्याप्रमाणें कोणीहि त्रयस्थ त्या गोष्टींचा निकाल सहज करूं शकतो. हिंदु लोकांचा वारसा त्या लोकांत आजवर जशी रीत अगर वहिवाट असेल त्याप्रमाणें व त्या क्रमानें अंमलांत आणावयाचा, त्यांना कांहीं इंग्रजी कायदे लावावयाचे नाहीत, या सरळ गोष्टींत इतकें न समजण्यासारखें काय आहे? दत्तक वारस झाल्यावर कांहीं ठिकाणीं वाद उत्पन्न झालेलेहि आढळून येतात. पण त्यामुळे हिंदुस्थानांत वारसाचा कांहीं कायदाच शिल्लक नाही असें ठरत नाहीं! मग दत्तक अमान्य करून इतकीं राज्यें बुडविण्याला काय कारण? निपुत्रिकत्व ही कांहीं कोणाच्या हातची गोष्ट नाहीं. त्याकरिता संस्थानें आणि सरंजाम नष्ट होऊं लागले तर सर्व जमीनदारवर्गावरच गदा आली म्हणावयाची! आणि एक संस्थान म्हटलें म्हणजे नुसते संस्थानिकांचे नातेवाईकच नव्हेत तर त्यांचेवर अवलंबून असणाऱ्या शेंकडों हजारों आश्रितांचा नाश होणार! आणि एवढें कां तर केवळ औरस मुलगा नाहीं म्हणून!! आपणानंतर हें सर्व आता बुडणार, असें वाटून निपुत्रिक असलेल्या संस्थानिकांच्या मनाची केवढी तळमळ होत असेल याची कल्पनाहि इतरांना येणें अशक्य आहे!”




# देशी राज्यांवरील अरिष्ट!

सातारचें राज्य १८४८ सालीं बुडाल्यावर पुढे आठदहा वर्षांत राज्यें बुडण्याची जणु कांही सांथच उत्पन्न झाली. कोणाचा दत्तक नामंजूर होऊन, कोणाची कर्जाची बाकी थकली म्हणून, कोणी शत्रु म्हणून, तर कोठें शत्रुत्वाचें कांही कारण सांगतां येण्यासारखें नाही म्हणून, अशा अनेक कारणांनी राज्यें बुडालीं. कुंपणानेच शेत खावें त्याप्रमाणें, ज्यांचे अज्ञानपालक इंग्रज रेसिडेंट होते तींहि राज्यें बुडालीं. मग इतरांच्या बाबतींत इंग्रजांनी कसा नंगा नाच घातला असेल त्याची सातारच्या एका उदाहरणाने वाचकांनाहि कल्पना येण्यासारखी आहे; म्हणून पुष्कळ हकीगतींना संक्षेप देऊन व कांहीचा फक्त नामनिर्देश करूनच आम्ही पुढे जाणार आहों. इतकीं राज्यें बुडालीं याचा अर्थ हजारों लाखों लोक व विशेषतः सैनिक व शिपाई बेकार होऊन भिकेला लागले. आणि प्रजेच्या सत्त्वपरीक्षेचा अगदी अंत पाहिल्यानंतर, इंग्रजांच्या शेंकडो अन्यायांची शीग भरली म्हणूनच पुढे बंड झालें !!

साताऱ्याप्रमाणेंच तंजावर, नागपूर, झांशी, ओर्च्छा, जैतपूर, संबळपूर, बाघत,

उदेपूर हीं राज्यें वारस नाही म्हणून डलहौसीने बुडविलीं. तीं किरकोळ असलीं, तरी, त्यामुळे असंतोषाच्या ठिणग्या निर्माण झाल्या यांत शंका नाही. दत्तकाच्या शास्त्रांत इंग्रजांना कांही कळत होतें अशांतला भाग नाही. पण तोंडाला येईल तें कारण सांगून हवा तितका अन्याय करावयाचा, इतकेंच त्यांचें ( स्वार्थाला धरून ) सुसंगत धोरण होतें ! नागपुरास रेसिडेंटाच्या देखत दत्तविधान झालें असतां, दत्तविधान झालेंच नाही असा त्यांनी प्रथम बहाणा चालविला होता. अखेर दत्तक नामंजूर करून त्यांनी कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनाहि न विचारतां नागपूरचें राज्य बुडविलें ! झांशीस दत्तविधानाची गोष्ट घडली हें त्यांना मान्य होतें; फक्त दत्तक राज्याचा वारस नाही इतकेंच इंग्रजांचें म्हणणें होतें ! दत्तकाला मंजुरी द्यावयाची नाही असें त्यांचें सरसकट धोरण होतें म्हणावें तर, तेहेरी, दतिया, जालवण या संस्थानांत त्यांनी दत्तकाला मंजुरी दिली होती, व हीच गोष्ट मुद्याची म्हणून महाराणी लक्ष्मीबाईने आपल्या अर्जांत मुद्दाम नजरेस आणली होती. दतियाचा राजा परीक्षित याने रस्त्याच्या कडेला सांपडलेलें एक मूल दत्तक घेतलें होतें; म्हणजे रानांत सांपडलेल्या मुलाचा देखील राज्यावरील वारसा इंग्रजांना चालला ! त्यांत दान प्रतिग्रह करण्याला कोणी मातापितरें लागतात ही आवश्यक गोष्टहि आड आली नाही ! जालवणचें दत्तविधान भिन्न गोत्री होतें. आळगीचे खंडेराव जहागीरदार यांची मिळकत याच कारणास्तव प्रथम जप्त केली होती. पण स्लीमनने खटपट केल्यावरून घेतलेल्या दत्तकाला सरकारने मंजुरी दिली, व मध्यंतरीं चार-पांच वर्षें संस्थानचा जो सारा-वसूल सरकारनेच बिगरहक्काने घेतला होता तोहि जहागिरदारास परत केला ! तात्पर्य, सरकारची लहर हा मुख्य कायदा होता. त्यांना 'होय' वाटलें तर होय; आणि त्यांनी 'नाही' म्हटलें म्हणजे, ब्रह्मदेव खाली उतरला तरी, नाही ! नाही ! नाही !! येऊनजाऊन विशेष आडकाठी इंग्रजांचा शब्द गुंतलेल्या तहनाम्यांची. यास्तव डलहौसीने ठरावांत मुळी स्पष्टच लिहिलें कीं, " ब्रिटिश सरकारने एखाद्या प्रसंगीं स्नेहसंबंध किंवा राजधोरण म्हणून एखाद्या संस्थानास दत्तक घेण्याची मान्यता दिली, एवढ्यावरून त्या किंवा तदितर संस्थानिकांस दत्तक घेण्याचा हक्क आहे ही गोष्ट कबूल केली असें होत नाही ! " इंग्रजांशीं मित्रभाव नसलेलीं किंवा मूळचीं स्वतंत्र संस्थानें एक वेळ असोत; पण जीं संस्थानें इंग्रजांच्या मेहेरबानीनेच निर्माण झालीं त्यांचें काय ? त्यावरहि उत्तर तयार होतें की,

'ज्यांनी मूळ देणगी दिली, त्यांना ती काढून घेण्याचा किंवा तिचें स्वरूप मर्यादित करण्याचा अधिकार आहेच! व त्यांत बहुतेक औरस संततीलाच वारसा मिळावा व दत्तविधान चालूं नये असाच हेतु असतो!' डलहौसीने आपल्या ठरावांत असें लिहिलेंहि आहे. अशा कोटिक्रमापुढें कोणचा निभाव लागणार ?

दत्तकाच्या निमित्ताने जीं राज्यें बुडाल्याचें वर सांगितलें तीं किरकोळ होतीं पण पंजाब, अयोध्या, सिंध हीं मोठीं राज्यें डलहौसीच्या कारकीर्दीत बुडालीं. अयोध्येचें राज्य बुडालें तेव्हा एकट्या अयोध्याप्रांतांत ऐशी हजार लोक बेकार झाले, असें इतिहासांत लिहिलेलें आढळतें. गैरव्यवस्था व तैनाती फौजेच्या खर्चाकरिता हैद्राबाद खालसाच होणार होतें. पण वऱ्हाड प्रांत, अहमदनगरपासून सोलापूर-पर्यंतचे ७६ कसबे, नंदीदुर्ग, कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील रायचूर दुआब हा सर्व मुलूख केवळ ४५ लक्ष रुपयांच्या कर्जफेडीकरितां इंग्रजांनीं कायमचा घेतला. नागपूरचें राज्य बुडाल्यानें ८० हजार चौरस मैल प्रांत आणि अर्धा कोट रुपयांचा मुलूख इंग्रजांना मिळाला, आणि मध्यप्रांत व वऱ्हाड असा सलग सुसंपन्न मुलूख वापरावयास सापडला. मध्यप्रांतांत कापसाचें उत्पन्न मुबलक असल्यानें तो प्रांत म्हणजे जणु कांही सोन्याचा तुकडा मानला जात असे; आणि १८१६ सालच्या तेजीमध्ये खरोखरच त्याला सोन्याचा भाव आला! दत्तकाची सबब ही नागपूरचें राज्य बुडविण्याला नुसतें निमित्त मात्र होतें. पण व्यापारी फायदा आणि लष्करी अनुसंधान हींच खरीं कारणें होतीं; व तीं राजकर्त्यांच्या मनांत गुप्तपणें वावरत होतीं. होळकर व शिंदे हीं दोन मोठीं मराठी राज्यें डलहौसीच्या कारकीर्दीत सुदैवाने कशींबशीं तगून राहिलीं; ग्वालेरचे शिंदे निपुत्रिक असल्यामुळे त्यांना राज्याबद्दल मनांतून दुर्धर चिंता लागून राहिली होती. हें ग्वालेर सुदैवाने राहिलें म्हणून पुढे १८५७ सालच्या युद्धांत विजयाचें पारडें इंग्रजांच्या बाजूला फिरलें. आणि बंडानंतर "यापुढे दत्तक घेण्याचा शिंदे घराण्याचा हक्क निर्वेध व अबाधित मानला जाईल" असें जेव्हा लॉर्ड कॅनिंग याने शिंद्यांच्या भर दरबारांत जाहीर केलें, तेव्हा जसा कांही पुत्रजन्म व्हावा इतका आनंद व हर्ष राजधानींत सर्वत्रांना झाला असें सांगतात! पण डलहौसीच्या कारकीर्दीत मात्र शिंद्यांच्या राज्याची मरणघटका घातली होती इतकें खरें.

पंजाबचें मोठं राज्य बुडाल्याने इंग्रजांची हद्द खैबर घाटापर्यंत भिडली. रणजित-

सिंह असतांना उत्तरेस अफगाणिस्थान व रशिया यांच्याशीं रणजितसिंहाची मैत्री होऊन आपणाला शह मिळेल की काय अशी इंग्रजांना सदैव धास्ती असे. पण रणजितसिंह समयज्ञ व चतुर असल्याने, इंग्रजाशीं लढाईचा प्रसंग न आणतां त्याने आपलें सामर्थ्य जितकें वाढवितां येईल तितकें वाढविलें. इंग्रजांशीं लढण्याची सल्ला देणारांना तो म्हणे—'मराठ्यांचा तो दोन लाख भाला आज कोठे आहे?' राष्ट्रीयत्वाची भावना त्याच्या अंगीं फार उत्तम होती. रणजितसिंहानंतर त्याच्याइतका दूरदृष्टीचा पुढारी हिंदुस्थानास लाभला नाही, यांत शंका नाही. मरतेसमयीं त्याने चौदा कोट रुपये नगद शिल्लक गोविंदगडच्या भुयारांत ठेवले होते. त्याच्या राज्याचें सालिना उत्पन्न अडीच कोट रुपये असून पाश्चात्य पद्धतीने उत्तम कवाइत शिकविलेलें ८२ हजार उत्कृष्ट लष्कर व तीनशें शहात्तर तोफांचा जंगी कारखाना त्याने आपल्या पाठीमागे ठेवला. पण रणजितसिंहानंतर त्याचें राज्य इंग्रजांनी अवघें पंधरा वर्षेंहि धड टिकूं दिलें नाही. रणजितसिंहामागे त्याचा मुलगा अज्ञान असल्याने निर्नायकी उत्पन्न झाली व त्यांतच इंग्रजांनी आपला हात साधून घेतला! शीख फौज अनावर झाली कारण ज्याचें शस्त्र तोच सावरूं जाणे! तेव्हा कोणावर तरी हें शस्त्र आदळलेंच पाहिजे असें जाणून रणजितसिंहाची पत्नी जिन्दकुंवर हिने तें इंग्रजांवर सोडलें!

लॉर्ड हार्डिंजच्या कारकीर्दीत फिरोजपूर, सोब्राऊन, अलीवाल व चिलियनवाला येथे चार घनघोर संग्राम होऊन शीखांचा पुरा मोड झाला व शीख राष्ट्र परतंत्र होऊन पूर्णपणें रेसिडेंटाच्या हुकमतींत गेलें. नंतरच्या काळांत शीख विरुद्ध मुसलमान यांत भेदनीतीचेहि प्रयोग करून इंग्रजांनी आपलें आसन स्थिर केलें. रणजितसिंहाचा मुलगा दिलीपसिंह अज्ञान होता व अज्ञानपालक म्हणून एक रीजन्सी कौन्सिल नेमलें होतें. त्यांत जिन्दकुंवर हीहि एक असली तरी सर्व सत्ता रेसिडेंटाच्या हातीं होती. रेसिडेंटच्या हुकुमाशिवाय राज्यांतलें पानहि हालत नव्हतें असें म्हटलें तरी चालेल! शीखांचें सर्व लष्कर धुळीला मिळालें होतें आणि इंग्रजांची दहा हजार तैनाती फौज राज्यांत पाहुणचार घेत होती. अशा परतंत्र स्थितींत आपला अज्ञान मुलगा सज्ञान होईल व आजचा विपरीत काळ बदलून उद्या कदाचित बरे दिवस येतील अशा आशेवर, आज जिवंत राहणें हाच केवळ पुरुषार्थ किंवा परमधर्म, असें मानून रणजितसिंहाची पत्नी जिन्दकुंवर ही एकेक दिवस पुढे ढकलीत होती. पण इतकी तिला वाटच पहावी लागली नाहीं. कारण डलहौसी

येतांच पंजाबचें भवितव्य ठरलें होतें ! रीजन्सीचा कारभार कसाबसा चालू असतां राज्यांत कोठे तरी बंड झालें व त्याचें निमित्त अज्ञानाला बाधून त्याचें राज्य गेलें ! अज्ञानपालक म्हणून सर्व सत्ता व मुखत्यारी जबाबदार या नात्याने सर्वस्वी रेसिडेंटाची असतां शिक्षा मात्र अज्ञान मुलाला भोगावी लागली, हा फारच अन्याय झाला ! जेथें सर्व राज्याचीच हानी झाली तेथें व्यक्तिशः जिन्दकुंवर व दिलीपसिंह यांच्या हालअपेष्टेला किंवा मानहानीला त्याहून अधिक महत्त्व देतां येत नाहीं; पण सामान्य लोकांच्या अंतःकरणाला मोठ्या लोकांचें हें दुःख पाहून घरें पडत होतीं यांत शंका नाहीं. केवळ संशयाच्या सबबीवर मुलापासून दूर करून इंग्रजांनी जिन्दकुंवर हिला लाहोरपासून एक हजार मैल दूर बनारस येथे कैदेंत ठेविलें व तिला सालीना दीड लाख रुपये तनखा होता, तो महिना फक्त चार हजार रुपये केला. आणि दिलीपसिंहाला कायमचा विलायतेंत नेऊन त्याच्या अज्ञानदशेंतच त्याला ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली !! याहून अधिक विटंबना कोणती असेल ?

डलहौसीच्या कारकीर्दीत सिंधचे अमीरहि सिंध प्रांताला मुकले. हे अमीर आजपर्यंत राव्याप्रमाणें स्वतंत्र व स्वैर असत. त्यांनी दुसऱ्याच्या स्वातंत्र्याचा अपहार केला नव्हता व स्वतःचें स्वातंत्र्यहि कधीं गमावलें नव्हतें. इंग्रजांच्या कपटी बेइमानी वागणुकीबद्दल त्यांना नेहमीं संशय वाटत असे. यास्तव कोणत्याहि बंदरांत पाऊल घालण्याला किंवा कारणापेक्षां अधिक काळ तेथें राहण्याला ते त्यांना परवानगी देत नसत. पंजाबमध्यें जाण्याच्या निमित्ताने एकदा कॅप्टन बर्न्स मुद्दाम वांकडा रस्ता काढून सिंधु नदाची पाहणी करून गेला. तेव्हां तेथील एक सय्यद असें म्हणालाहि की " हा आमचा नद इंग्रजांच्या दृष्टीस पडला; आतां सिंध प्रांत त्यांच्या ताब्यांत गेलाच असें समजा ! " हे शब्द बरोबर दहा वर्षांतच खरे झाले ! आणि इंग्रजांनी कांहींएक कारण नसतां, अमिरांच्या इच्छेविरुद्ध सिंधमध्यें प्रथम अतिक्रमण करून, नंतर दोस्तीचे तह करून, नंतर ते तह मोडल्याचीं निमित्तें करून लढाया केल्या आणि अखेर सिंध खालसा केला ! " सिंधमध्यें इंग्रजांनी जें जें अतिक्रमण केलें, त्याचें कोणत्याहि आंतरराष्ट्रीय कायद्याच्या नियमानें समर्थन करतां येणार नाही " असें रेसिडेंट औट्रॅम यानें म्हटलें आहे. पूर्वी अफगाणिस्थानाच्या स्वारींत इंग्रजांचा भयंकर पराभव झाला व तेथें गेलेल्या पंधरा हजार लोकांची सरसकट कत्तल होऊन फक्त एकच मनुष्य ती हकीकत सांगण्याला जिवंत परत आला ! त्या पराभवाचा वचपा सिंधसारखा निरपराध देश

जिंकून इंग्रजांनी काढला! पण ही शेंदाड-शिपायांची करणी होय, मर्दाची नव्हे, असे उद्गार एलफिन्स्टन यानें सर चार्ल्स मेट्काफ याला लिहिलेल्या पत्रांत काढले आहेत :— " Coming after Afganisthan, it put one in mind of a bully who had been kicked in the streets and went home to beat his wife in revenge." ( Empire in Asia. P. 301 ).

ब्रह्मदेशाच्या लढाईचें कारण तर निवळ हास्यास्पद आहे! एका इंग्रज व्यापाऱ्याच्या हातून एका ब्रह्मी खलाशाचा खून झाला, म्हणून ब्रह्मदेशाच्या कोर्टानें त्याला फक्त ९९ पौंड दंड केला. पण नेटिव्हांनी इंग्रजांची चौकशी करून दंड करावयाचा याने जणुं कांही कंपनी सरकारची इभ्रत गेली! याकरितां इंग्रजांनी लगेच नुकसानभरपाई म्हणून ९९९ पौंडाची रक्कम व ब्रह्मदेशाच्या अधिकाऱ्यानें माफी मागावी असा हुकूम फर्माविला. त्याहि अटी मान्य होतील असा रंग दिसांतच इंग्रजांनी नुकसानभरपाईची रक्कम एकदम एक लाख पौंड केली! ब्रह्मदेशाच्या राजानें हीहि रक्कम कबूल करून सामोपचाराने हप्त्याने रक्कम घेण्याविषयी कलकत्त्यास गव्हर्नर जनरलला पत्र घातलें. पण पत्र मिळण्याची वाटहि न पाहतां एकदम युद्धास सुरुवात करून " युद्धाचा खर्च तुम्हांस द्यावा लागेल " अशी इंग्रजांनी ब्रह्मदेशाच्या राजास नोटीस दिली व अर्धा ब्रह्मदेश खालसा केला. ब्रह्मदेशांत युद्ध असें झालेंच नाही! फक्त दहशतीनें तें काम भागलें. ब्रह्मदेशाचें राज्य खालसा होऊं नये व आपलें स्वातंत्र्य टिकावें म्हणून, झालेला युद्धखर्चहि नजराणा म्हणून ब्रह्मी अधिकाऱ्यानें आणला होता. पण 'स्वातंत्र्य' ही वस्तु पैशानें विकत घेतां येत नाही, ती तरवारीनेच मिळवावी लागते हें त्यांना माहीत नव्हतें!

इंग्रज राजरोस लुटारूपणा कसा करीत याबद्दल नागपूरच्या राज्याचें उदाहरण सांगण्यासारखें आहे. नागपूरचें राज्य खालसा केल्यावर सातआठ महिन्यांनी, एक दिवस अचानक कंपनी सरकारने नागपूरच्या राजवाड्यावर डाका घातला व राजमंडळांतील स्त्रियांसुद्धा सर्वांना तेथें सक्त नजरकैदेत ठेवलें. भोंसल्यांनीं पूर्वदिग्विजय करून आजवर जी अपार संपत्ति मिळवून ठेविली होती तिची त्यांनीं राजरोस लूट केली. त्यांत अत्यंत मौल्यवान राजरत्नें असून त्या संपत्तीची किंमत सुमारे ऐशी लाख पौंडांवर असावी! त्यानंतर कलकत्त्याच्या मॉर्निंग क्रॉनिकलमध्यें

उघड जाहिरात देऊन भोंसल्यांच्या राजलक्ष्मीचा एकाद्या नादार इसमाच्या सामानाप्रमाणें जाहीर लिलांव करण्यांत आला. कंपनी सरकारनें लाजलज्जा, अब्रू, शरम, संभाविती सर्व गुंडाळून ठेविली होती. पण इंग्लंडच्या पार्लमेंटला जगांत कांहीतरी मान होता. त्यामुळे कॉबडेन प्रभृति अनेकांनी पार्लमेंटांत कंपनीच्या या बेशरम कृत्यावर सणसणीत टीका केली तेंव्हां कांहीशी उपरति होऊन कंपनी सरकारने ही रक्कम 'भोंसला फंड' या नांवाने वेगळी ठेऊन नागपूरच्या राजवंशीयांच्या चरितार्थाकडे लाविली जाईल असें जाहीर केलें. पण पांच सहा वर्षांनी सत्तावन सालच्या बंडानंतर सर्वत्र सामसूम झालें, तेंव्हा कंपनी सरकारची बुद्धि फिरली आणि सरकारने हा सर्व फंड एके दिवशीं राजरोस गडप केला आणि भोसलाफंडाचें खातें पुसून टाकलें ! इव्हॅन्स बेल् लिहितो— "The solemn mockery of a 'deposit' has disappeared, and the personal property of the dispossessed royal family is quietly absorbed as a 'set off' to the expense of their stipendiary expenses."

अर्काट येथेंहि इंग्रजांनी राजरोसपणें नबाबाचें सर्व खासगी सामानसुमान, जडजवाहीर भांडीकुंडीं लिलांवानें विकून टाकलीं ! त्या बिचाऱ्याचें राज्य गेलें म्हणून खासगी संपत्तीलाहि तो मुकावा काय ? कदाचित् सोन्याचांदीपेक्षा किंवा जडजवाहिरांत संपत्ति गुंतविण्यापेक्षां रोकड करून ती सरकारांत व्याजी ठेवणें चांगलें असेंहि सरकारला लोकांना शिकवावयाचें असेल ! सरकार परकें व कसेंहि असलें तरी अखेर सरकारवरच विश्वास टाकल्याखेरीज कशाने निभाव लागणार? पण त्यांतहि दगा मिळणारच नाही अशी खात्री नव्हती ! किरवीचे राव पेशवे यांच्या ठेवीच्या उदाहरणावरून तें दिसून आलें. १८२७ सालीं अमृतराव पेशवे यांनी कंपनी सरकारकडे सहा टक्के व्याजाच्या कराराने दोन लक्ष रुपये व्याजी ठेवले. हेतु हा कीं, काशी येथें त्यांनी बांधलेल्या देवळाचा व सदावर्तांचा खर्च चालावा. पुढें दहा वर्षांनीं अमृतराव यांच्या मृत्यूनंतर सरकारने एकदम व्याजाचा दर सहा टक्क्यावरून चार टक्के केला. तेव्हा त्यांचे चिरंजीव विनायकराव यांनीं पुनः आणखी तीन लक्ष रुपये सरकारला देऊन काशी येथील धार्मिक संस्थानांचा खर्च पूर्ववत् चालविण्याची व्यवस्था केली व अशा रीतीनें आपलें धर्मऋण आणि पितृऋण या दोहोंची फार चांगल्या रीतीने फेड केली. पण पुढे विनायकरावांच्या मृत्यूनंतर त्यांचा दत्तक मुलगा माधवराव अवघा चार वर्षांचा अज्ञान असतां,

सरकारने धार्मिक देवस्थानची नेमणूक अचानक बंद केली, आणि पांच लाख रुपये राजरोस गिळंकृत केले. राजानेंच लुबाडलें तर फिर्याद कोणाकडे न्यावयाची? अशा रीतीनें केवळ धर्मकार्याकरितां विश्वासानें ठेव म्हणून ठेवलेला पैसा मालकाच्या अज्ञानदशेंत इंग्रजांनी नाहींसा केला!!

डलहौसीच्या स्वाहाकाराच्या यज्ञांत शेवटची आहुति अयोध्येच्या राज्याची पडली. शंभर वर्षांच्या निस्सीम राजनिष्ठेचें फळ याहून अन्य मिळालें नाहीं यामुळे सर्वांचे डोळे साफ उघडले. जाणत्या इंग्रज लोकांनाहि यांतील अन्यायाचें समर्थन करतां येण्यासारखें नव्हतें. स्लीमन हा सहा वर्षे अयोध्येंत रेसिडेंट होता. त्याने लिहिलें आहे— "Lord Dalhousie and I have different views, I fear. If he wishes anything that I do not think right and honest, I resign, and leave it to be done by others. I desire a strict adherence to solemn engagements whether made with white faces or black. We have no right to annex or confiscate Oudh. We have a right under the treaty of 1837 to take the management of it, but not to appropriate its revenues. We can do this with honour to our Government and benefit to the people. To confiscate would be dishonest and dishonourable. To annex would be to give the people a Government as bad as their own, if we put our screw upon them."

'हुशार दिवाणांची अगर कल्पक माणसांची अयोध्येच्या राज्यांत वाण नव्हती,' असे सर हेनरी लॉरेन्स याने उद्गार काढले आहेत. ( Among her ministers have been able individuals as are usually to be found in the East." ) कर्तबगार माणसांचें पीकहि अयोध्येंत विपुल होतें. 'अयोध्येच्या राज्यांत जशी लढाऊ शिपायांची वाण नाही तशीच, दिवाणी, मुलकी कामांनाहि लायक माणसांची कमतरता नाही' असें स्लीमननेहि म्हटलें आहे. ("There is no want of an educated class for civil offices. On the contrary they abound almost as much as the class of soldiers." ) पण या सर्व गोष्टींचा काडीमात्र उपयोग नव्हता. मृत्यु जसा

आपला बळी ठरवितो त्याप्रमाणें, अयोध्येचें राज्य बुडविण्याचा डलहौसीनें निश्चयच केला होता !

डलहौसीचा कारभार अशा रीतीने एखाद्या धूमकेतूप्रमाणें सर्वांना अरिष्टदायक झाला होता ! त्याच्या कारकीर्दीत सिंध, पंजाब, अयोध्या, बर्मा हीं मोठीं राज्यें बुडालीं. तसेंच दक्षिणेंतील म्हैसूर, कर्नाटक, तंजावर, सातारा, नागपूर हीं जुनीं राज्यें खलास झाली. वऱ्हाड प्रांत गेला. झांशी, जैतपूर, संबळपूर, उदेपूर इत्यादि छोटीं संस्थानें, जीं केवळ राजनिष्ठेने रुमालाला हात बांधून इंग्रजांशीं स्नेहाच्या तहाने बद्धपरिकर होतीं व कशींबशीं जगत होतीं, तीहि नाहींशीं आलीं. अनेक तालुकदार, वतनदार, इनामदार वहिवाटीचा हक्क बुडून नामशेष झाले. धार्मिक ट्रस्ट म्हणून ठेवलेल्या मिळकती, किंवा स्त्रिया, अज्ञान अगर आश्रित यांची मिळकत सरकारकडे कराराने असली तरी, त्याची देखील शाश्वति राहिली नाही ! कोणी मोठा दिल्लीचा बादशाहा असला अगर मराठ्यांचा पेशवा असला, तरी त्याची सर्व खानदानी व मानमरातब इंग्रजांच्या सर्वभक्षक सत्तेपुढे संपुष्टांत आला. त्यांच्या आठदहा लक्षांच्या किरकोळ उत्पन्नाकरिताहि कंपनी सरकार खळखळ करीत होतें. सरकारला वाटे ‘आणखी किती दिवस हे लोक जगणार व पेनशन खाणार ?’ पण त्यांचीं राज्यें बुडालीं तरी आयुष्य संपल्याशिवाय ते मरणार कसे ? आणि त्यांचा निर्वंश तरी कसा व्हावा ? निदान परमेश्वराच्या घरीं तरी असें चिंतिणें न्यायाचें कसें होतें ? देशी राजांशीं जे तहनामे झाले ते व्यक्तिशः त्या त्या राजांशीं वेळोवेळीं झालेले असले तरी, त्यांचें स्वरूप केवळ ‘व्यक्तिगत’ नव्हतें; तसें असतें तर हीं उत्पन्नें ‘तहाहयात’ ठरून बुडावीं हें सरळ होतें. पण या राजांशी झालेले करार किंवा तहनामे याला ‘प्रातिनिधिक’ स्वरूप ( corporate character) होतें असेंच कायदेशीर रीतीने मानतां येतें.

दुर्बळ आणि बलिष्ट यांच्यामधील तहनाम्यांचा अर्थ राष्ट्राराष्ट्रांच्या सर्वमान्य संकेताप्रमाणें कसा करावयाचा असतो, तसेंच तहांतहि व्यक्तिगत तह ( Personal ) व प्रातिनिधिक तह ( Corporate ) असा कायदेशीर रीतीने कसा भेद केला पाहिजे, या बद्दल इव्हॅन्स बेल याने फार सुंदर चर्चा आपल्या पुस्तकांत केली आहे. त्यांतील एकदोन अवतरणें या मुद्द्यापुरतीं देतोंः—

( 1 ) " The notion that the treaties of 1799 are binding upon us only for the life of the prince with whom they

were contacted, because they do not contain the word 'heirs and successors' is one that can derive no support from the recognised standards of International Law, and which will never—it may be confidently predicted—be supported by any opinion from the law-advisers of the Crown " ( P. 312. )

( 2 ) " A reigning prince which is named in the treaty is the representive of the state, which is permanent, and of sovereignty, which is always hereditary. Grotius lays down the rule—" If a treaty is made with the king by name, without any mention of heirs and successors, it is not therefore presently to be reputed personal, for as it is well observed by Pedius and Ulpian, the person is often inserted in the contract, not to show that the contract is personal, but to show with whom the contract was made. " ( P. 313. )

( 3 ) " The chief authorities of the International law tell us that the provisions of a treaty must always be interpreted in the sense most favourable to the weaker party... " ( Evans Bell P. 316. )

पण या सर्व शहाणपणाचा डलहौसीपुढे काडीमात्र उपयोग नव्हता. त्याचे अंगीं न्यायबुद्धीच नव्हती. कायदेपंडित फारतर करून अर्थचिकित्सा करतील. पण शब्दांतून नसलेला अर्थ काढणें व शब्दांत असलेला अर्थ नाहीसा करणें, हा जो जोड पराक्रम डलहौसीमध्ये होता त्याला कसलीच उपमा देतां येणार नाही! 'शब्दांचा ईश्वर' ही पदवी त्यालाच शोभते. "Dalhousie was very fond of calling treaty a grant "—तहाला खुशाल तो ' देणगी ' हा शब्द लावी. कारण देणगी म्हणजे ' मोहबत '; मोहबत संपली म्हणजे सर्व संपलेंच! मुसलमानी सुलतानांची लहर याहून वेगळी काय होती!

आणि इतकी सगळी हाव कशाकरिता! तर इंग्रजांचें राज्य सर्वत्र हिंदुस्थानभर करून इंग्रजी संस्कृतीचा प्रसार करण्याकरिता. साऱ्या जगावर इंग्रजांनी राज्य

स्थापावें असें त्याला वाटे; जणु कांही इंग्रज हे परमेश्वराचे कोणी लाडके देवदूत अगर प्रेषित होते. जिंकलेल्या लोकांना कांही स्वतःची उच्च संस्कृति, विद्या, निदान मनोभावना असतील ही गोष्टहि त्याच्या चुकून देखील ध्यानींमनीं आली नाही. " Mr. Kaye has well expressed it that ' he had no imagination ' and thus he never came to understand the genius of the people with whom his lot was cast." ( Bell. P. 250) प्रत्येक गोष्टींत तोंड घालणें हा इंग्रजांचा द्वाड स्वभावच आहे. आपल्या सुधारणेच्या कल्पना अंमलांत न आल्या तर जणू कांहीं जग बुडेल असें त्यांना वाटतें ! मुसलमान लोक जसे धार्मिक गोष्टींत माथेफिरू असतात त्याप्रमाणें इंग्रज राजकीय गोष्टींत माथेफिरू असतात इतकाच फरक ? सर थॉमस मनरो याने म्हटलें आहे— " Englishmen are as great fanatics in politics as Mahomedans are in religion. They suppose that no country can be saved without English institutions."

डलहौसीच्या कारभाराचें हें असें अपूर्व व विचित्र स्वरूप पाहून मनांत संताप, उद्वेग, तिरस्कार इत्यादि अनेक भावना उत्पन्न होऊन लोक चकित होऊन गेले असतील यांत शंका नाही. यापूर्वी अनेक लहरी मिजासी बादशहा हिंदुस्थानांत होऊन गेले. पण डलहौसीची मिजास मोंगल बादशहापेक्षांहि और होती. पण नांदणूक मात्र कैकाड्याची होती. ' कायद्याचें राज्य ' या नांवाखालीं सर्व झोटिंगपातशाही कारभार चालला होता. आणि मौज ही कीं तसें कोणी म्हटलेलें मात्र खपत नव्हतें ! पूर्वी शेरिडन यानें वॉरन हेस्टिंग्जचे खटल्याचे वेळीं पार्लमेंटांत कंपनीसरकारच्या कामाचें फारच उत्तम वर्णन केलें तें डलहौसीने तंतोतंत खरें केलें.

" It had been said of the Company that there was something in their operations which combined the meanness of a pedlar with the profligacy of a pirate. Alike in the military and in the political line could be observed auctioneering amdassadors and trading generals and thus we saw a revolution brought about by affidavits, an army employed in executing an arrest, a town besieged on a note of hand, a prince dethroned for the balance of account ! Thus it was they who

united the mock majesty of a bloody sceptre and the little traffic of a merchant's counting house, wielding a trunchen with one hand and picking a pocket with the other ! ! "

या वर्णनांतलीं 'पायरेट' व 'पिक् पॉकेट' हीं विशेषणें खरीं होती की नाही याचीं कांही उदाहरणेंच या लेखांत वाचकांना आढळून येतील. आणि हेच इंग्रज ठग पेंढाऱ्यांच्या हातून आम्ही हिंदुस्थानची सुटका केली म्हणून फुशारकी मारणार !

डलहौसीने दोन लक्ष चौरस मैलांचा नवा प्रदेश खालसा करून, अडीच कोट नवी प्रजा ब्रिटिश राज्यांत सामील केली, त्याने अनेकांच्या मनांत विचारलहरी उठविल्या. 'स्पेक्टेटर', 'फ्रेंड ऑफ इंडिया' हीं ॲंग्लोइंडियन पत्रें एकछत्री ब्रिटिश साम्राज्याच्या कल्पनेनें हर्षानें नाचूं लागलीं. श्रीरामपूर येथील 'फ्रेंड ऑफ इंडिया' हें तर डलहौसीचें जवळजवळ मुखपत्रच होतें. ता. २४ जुलै १८५६ च्या अंकांत संपादकांनी संस्थानिकांना उद्देशून उघड लिहिलें की, "राजे लोकहो ! तुमच्या अंमलाची मरणघटका जवळ आली असें समजा. आज हयात असलेल्या लोकांना 'याच देहीं याच डोळां' आता सर्व हिंदुस्थानभर एकछत्री ब्रिटिश अंमल सुरू झालेला दिसेल !" (The knell of the Princes of India is sounded and that men now living may see the Empire one and indivisible.".)

पण याच्या अगदी उलट सल्ला देणारीं किंबहुना धोक्याची सूचना देणारीं कांही अनुभवी माणसेंहि कंपनीच्या अधिकारी वर्गांतच होतीं. व पुढे बंड होणार असें त्यांनी स्पष्टपणें भाकित केलें होतें, म्हणून तेहि दोन तीन उतारे देतों. सर थॉमस मनरो यांनी म्हटलें होतें की, आम्ही इंग्रज लोक कितीहि चांगले असलों तरी, संस्थानिकांशीं लढाईची वेळ आल्यावर बहुजन समाज आम्हांला मदत करील हा भ्रम आहे. "We delude ourselves if we believe that gratitude for the protection they have received. or attachment to our mild government, would induce any considerable body of the people to side with us, *in a struggle with the native army.*"

हैद्राबादचा रेसिडेंट हेनरी रसेल याने १८३२ सालीं लिहिलें होतें की, देशी शिपायांना बिघडवून जर प्रजेपैकीच कोणी एखाद्या बंडाची संघटना केली तर आमच्या सत्तेला धोका येण्याचा बराच संभव आहे. जो जो नवा प्रदेश खालसा होतो त्यामुळे बंड होण्याचा संभव अधिकच वाढत आहे. आमचें राज्य वाढलें म्हणून साहजिकच देशी सैनिकांच्या पलटणीहि वाढवाव्या लागल्या. नेटिव फौजेची आमच्या सैन्यांत झालेली भर याने आमचें बळ वाढलें असा मात्र तर्क करणें बरोबर नव्हे; उलट तेंच आमचें मर्मस्थान आहे असें समजलें पाहिजे !
" A well conducted rebellion of our native subjects or an extensive disaffection of our native troops is the event by which our power is likely to be shaken; and the sphere of this danger is necessarily enlarged by every enlargement of our territory. The increase of our subjects, and still more of our native troops, is an increase not of our strength but of our weakness. "

नुसत्या नेटिव शिपायांच्या फौजांवर विश्वास ठेवणें हें सुरक्षितपणाचें नाही असें सर चार्ल्स् मेट्काफ याने म्हटलें असून, जनरल ब्रिग्ज याने १८४९ सालीं सातारा बुडाल्यावर असें स्पष्ट बजावलें होतें की, नेटिव शिपाई झाले तरी तेहि कोणत्या खाणींतली माती हें विसरूं नका ! लोकांचा असंतोष सैन्यांत पसरणारच. आणि सैनिकांतला इंग्रज सरकारवरचा विश्वास नष्ट होऊन त्यांच्यांत एकदा बेदिली उत्पन्न झाली की, ब्रिटिशांचें राज्य नष्ट होण्यास मुळीच उशीर नाही ! "
" You have a native army of 250,000 men to support your power. But you may rely on it, if you infringe the institutions of the people of India, that army will sympathise with them, for they are a part of the population. In every infringement you make upon the rights of men, who are either themselves in the army or upon their sons, their fathers, or their relatives. Let the fidelity of the army be shaken and your power is gone."

नागपूर व झांशी खालसा होण्यापूर्वी, म्हणजे बंडाच्या अगोदर चारच वर्षें, जॉन डिकिनसन यानेहि आगामी अरिष्टाची पूर्वसूचना दिली होती. " नेटिव शिपाई

तुम्ही सांगता तसे वागतात असें वरकरणी तुम्हांला दिसतें. पण आंत त्यांच्या अंतःकरणांत केवढी आग पेटलेली आहे, याची तुम्हांला कल्पना तरी आहे? हा वणवा पेटला तर ब्रिटिश राज्याची राखरांगोळी होईल"

" There are many signs and warnings in India at this moment, and if the present system is allowed to go on, it will soon expose our Empire to a greater peril than it has never yet encountered. The natives seem what they know we expect them to appear. We do not see their real feelings. We know not how hot the stove may be under the polished surface. For the fire is not out; we are obliged to keep it up by our native army which may blaze into a conflagration and burn the Empire."

१८५३ सालीं स्लीमन याने कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांना इशारा म्हणून लिहिलें की, " राज्यें खालसा करण्याने आपणांला देशी फौजेच्या बळावरच अधिक अवलंबून राहावें लागणार. पण ही गोष्ट जर नेटिव्ह फौजांच्या लक्षांत आली तर एखाद्या वेळीं आपणांवरच डाव उलटण्याचा संभव आहे, ही गोष्ट विसरून उपयोगी नाही. कोणी त्यांना फितवून एखाद्या राजकीय कटांत नेटिव सैनिकांचा उपयोग करून घेणारच नाही हें काय सांगावें? देशी संस्थानें म्हणजे वास्तविक आपल्या संरक्षणाचे बुरूज आहेत. त्यांच्या इमानावर आपण खुशाल विश्वास ठेवावा. ते सुरक्षित असले तर लोकक्षोभाच्या लाटा खडकावर कितीहि आपटल्या तरी आपण वाहून जाण्याची भीति नाही."

"The Native States I consider to be breakwaters, and when they are all swept away, we shall be left to the mercy of our native army, which may not always be sufficiently under our control." ... ...

" The system of annexing and abosrbing Native States might some day render us so visibly dependent upon our native army, that they might see it, and accidents might

occur to unite them, or too great a portion of them in some desperate act."

धोक्याची अशी वारंवार सूचना देणाऱ्या या दूरदर्शी लोकांना हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य नको होतें अगर त्याचा अभिमान नव्हता असें नाही. त्यांना तारतम्य होतें. हा पक्ष म्हणे, "होय, हिंदुस्थानांत सर्वांना जिंकून तुम्ही मांडलीक केलेत, ठीक आहे. पण आता तरी थांबाल की नाही ? आता मांडलिकावरच हत्यार धरून त्यांना बुडवितां, मारलेल्यालाच मारतां हें बरोबर कसें आहे : सर्व हिंदुस्थान एकछत्री ब्रिटिश मुलूख करण्याच्या कल्पनेमागे लागण्यांत काय फायदा ? दोन लक्ष चौरस मैल प्रांत म्हणे कंपनीच्या राज्यांत सामील झाला. पण त्याने अजून पृथ्वी संपली काय ? इतकीं राज्यें बुडविलीं म्हणजे इतके लोक आपण शत्रू केले असेंच नव्हे काय ! एका संस्थानिकाला गादीवर ठेविलें म्हणजे त्याच्या सर्व प्रजेवर, सैन्या-वर, पैशावर सर्व आपलीच सत्ता असते, परस्पर वाईटपणा त्याला देऊन सर्व फायदे मात्र आपणाला लुबाडतां येतात ! हिंदुस्थानांत राजेपणाला विशेष आदर आहे. 'ना विष्णुः पृथिवीपतिः' या न्यायाने राजा कसाहि असला तरी राजाकडे आदराने पाहण्याची लोकांना सवयच असते. हा आदर कांहीं एखाद्या कलेक्टरला मिळणार नाही ! संस्थानिक हे प्रजेचे जन्मसिद्ध पुढारी आहेत. दोनशें राजांना ताब्यांत ठेवून त्यांच्या दोन कोट प्रजेवर सुखाने राज्य करतां येतें. हिंदुस्थान तरी काय लहान देश आहे ? तें एक मोठें खंडच आहे म्हणाना. प्रांतिक स्वराज्य किंवा अधिकारविभागणी शिवाय तेथे राज्यकारभार करणें दुरापास्त आहे. मग सर्व सत्ता एके ठिकाणीं केंद्रीभूत करण्यांत शहाणपणा कोठला ?"

"लोक अडाणी आहेत, त्याच्यांत भ्रामक समजुती आहेत." तसेंहि असेल. इटाली, ग्रीस, स्पेन, रशिया, यांत आजच्या काळींच पाहाना किती नाना प्रकारचे लोक, त्यांत अज्ञान लांचलुचपत किती, भ्रामकपणा कितीतरी. हें जर खरें तर, हिंदुस्थानाच्या लोकांची सुधारणा अधिक अशक्य कोटींतली कां मानावी ? तुलनाच करावयाची असेल तर, वाईट संस्थान व ब्रिटिश राज्याची कां करावयाची ? चांगलीं संस्थानें व ब्रिटिश राज्य अशी कां करूं नये ? अशा तुलनेला संस्थानें खात्रीने टिकतील. इतकेंच नव्हे तर, ही तुलना वेळीं ब्रिटिश राज्याच्याहि विरुद्ध जाऊं शकेल त्याची वाट काय ? इतकीं संस्थानें बुडवून म्हणे दरसाल कंपनीचें उत्पन्न चाळीस लाख पौंडांनी वाढलें ! पण आठ वर्षांच्या

कारकिर्दीत साडेआठ कोट पौंड कर्ज झालें त्याची वाट काय? आणि प्रजेंत मात्र असंतोषाची शीग भरली. अशा स्थिनींत संस्थानें ठेवणें हेंच शहाणपणाचें नव्हतें काय?"

"We want the native princes much more than they want us. We want them for the discipline and the education of two hunderd millions of Asiatics. We can instruct and manage the two hunderd princes, their families and followers; we cannot sway the millions without the good will of their natural leaders." (Bell P. 327.)

वरील युक्तिवाद पुढे मांडणाऱ्या इंग्रज मंडळींचा पक्ष हिंदुस्थानांत व विलायतेंत अगदी मूठभर होता. पण नंतर थोड्याच दिवसांत हिंदुस्थानांत एका अपूर्व राजकीय कटाची संघटना होऊन, जो न भूतो न भविष्यति असा प्रकार घडून आला त्यानें या मूठभर मंडळीचें म्हणणेंच कसें न्याय्य होतें हें अगदी एखाद्या भविष्य-वाणीप्रमाणें सिद्ध करून दिलें. त्या उत्पाताची हकीगत पुढें येणारच आहे.

५

# असंतोषाच्या दारूचें कोठार!

१८५६ च्या फेब्रुवारींत डलहौसीने अधिकारन्यास करून विलायतेस प्रयाण केलें. त्यावेळीं त्याने उद्‌गार काढले कीं "या जगांतल्या रंगभूमीवर मला नेमून दिलेलें काम संपलें. आता माझ्या आयुष्यावर पडदा पडेल तर बरें!" याच्या अगदीं उलट कॅनिंग हिंदुस्थानांत येण्यास निघाला तेव्हां एका मेजवानीच्या प्रसंगीं त्यानें म्हटले कीं "हिंदुस्थानचें आकाश सामान्यतः निरभ्र दिसतें. पण केव्हां असेंहि घडतें कीं, तळहाताएवढा ढग हां हां म्हणतां सर्व आकाश व्यापतो. आणि मग प्रळयाला सुरुवात होते!" त्या प्रळयाचीच हकिगत आता पुढें सांगावयाची आहे, पण ती अगदीं थोडक्यांत, मुद्याची गोष्ट न सोडतां, मात्र लढायांच्या हकिगतीनां पुष्कळसा संक्षेप देऊन आम्ही सांगणार आहो. कारण ती महशूर असून सामान्यतः सर्वांना माहीत आहे. ही हकिगत देतांनां पुराव्याकरिता आम्ही वाचकांना प्रत्येक प्रकरणाच्या परिशिष्टाचा हवाला देणार आहो.

डलहौसीनें आपल्या कारकिर्दींत राज्यें वहिवाटी इनामें जमीनदाऱ्या वगैरे अन्यायाने बुडविल्याकारणाने कोणालाहि शाश्वति वाटत नव्हती. इंग्रज 'विश्वास-

घातकी ' आहे असेंच सर्वांस वाटत होतें. हीं देशी राज्यें बुडाल्याकारणानें अनेक गरीबांचें व आश्रितांचें अन्न गेलें. बंडापूर्वी दहा वर्षांपासून मध्यम वर्गाला आर्थिक विपत्ति इतकी जाणवत असे कीं, " लक्षावधि लोक आहेत ते हल्लीं चोरासारखे मुकाटयानें बसले आहेत. त्यांनीं कोठे व कोणत्या कामांत प्रसिद्ध व्हावें ? " असें लोकहितवादी यांनीं १८४९ सालीं हृदयस्पर्शी वर्णन केलें होतें. व हीच स्थिति सगळीकडे होती. दुःखें संस्थानिकांनांच होतीं व मध्यम वर्गाला नव्हतीं असें नाहीं. सरकारने शाळा घातल्या होत्या, पण त्यांत मिशनाऱ्यांनां मुलें बाटविण्याला मुक्त-द्वार होतें. धर्मस्वातंत्र्याच्या आजच्या ' उदार ' कल्पनांमुळें शंभर वर्षांपूर्वीच्या लोकांच्या मनःस्थितीची आपणांस कल्पना येत नाहीं; पण त्याकाळीं धर्मभ्रष्ट होऊन बाटण्याच्या कल्पनेमुळें अंगावर कांटा उभा राहात असे. एकदां तर बायबलचा प्रवेश असलेल्या इंग्रजी शिक्षणपद्धती विरुद्ध सत्तर हजार लोकांनी सह्या करून सरकारकडे अर्ज केला होता.

" They resolved to exclude from caste any and all who sent their children to Mission schools. They were so excited by the Baptism of youth connected with the schools that they got up a petition to the British Government with *Seventy thousand signatures* praying for public school without a Bible "

Mission schools in India...P. 363
by Reverand R. G. Wilder...1857

१८५६ सालीं सरकारनें धर्मस्वातंत्र्याचा कायदा करून पतित व अहिंदु झालेल्या मनुष्याला हिंदु अविभक्त कुटुंबांत वारसा मिळण्याची सोय करून दिली होती, ती सामाजिक दृष्टया पुष्कळांना 'क्रांतिकारक' वाटली. मिशनऱ्यांना राजसत्तेचें बळ मागें होतें. भर चवाठ्यावर उभें राहून कुराण व पैगंबर यांची ते अभद्र निंदा करीत. या अनेक कारणामुळे सामान्य लोकांना असें वाटे कीं, इंग्रजाचें आक्रमण नुसतें राजकीय सत्तेपुरतेंच नाही; तर आपला धर्म देखील हे आपणाजवळ राहूं देत नाहीत !

त्याकाळीं वर्तमानपत्रें हल्लीइतकीं नसल्यामुळे राजकीय मतप्रचार आतांइतका होत नसेल अशी कल्पना होते. पण त्याकाळीहि ' गुप्त प्रचार ' होत असे. तो कसा

हें मात्र कळत नाहीं. पण ही गोष्ट मालकमनेच लिहून ठेवली आहे. त्यांत सैन्याला मिळवून घेऊन राज्यक्रांति करण्याच्या सूचना असत. आणि हे राज्यकर्ते खरोखर केवळ मूठभर आहेत ही गोष्ट परोपरीने सांगितलेली असे.

" More than thirty years since, Sir John Malcolm described a state of things in his day identical with that which, with larger influence and more decided energy, operated in 1857. Sir John then wrote, :– "My attention has been during the last twentyfive years paricularly directed to this dangerous species of secret war against our authority, which is always being carried on by numerous though unseen hands. The spirit is kept up by letters, by exaggerated reports, and by pretended prophecies. When the time appears favourable, from the occurrence of misfortune to our arms, from rebellion in our provinces, or from mutiny in our troops, circular letters and proclamations are dispersed over the country with a celerity almost incredible. Such documents are read with avidity. The contents are in most cases the same. The English are depicted as usurpers of low caste, and as tyrants who have sought India with no other view but that of degrading the inhabitants and of robbing them of their wealth, while they seek to subvert their usages and their religion. The native soldiery are always appealed to, and the advise to them is, in all instances I have met with, the same. – 'Your Europen tyrants are few in number. Kill them. "

Nolan—" History of the British-Empire P. 714

डलहौसीने राज्यें खालसा करून जी अफाट बेकारी निर्माण केली ती इतकी भयप्रद होती कीं पुढें बंड न होतें तरच आश्चर्य म्हणावयाचें ! या सारख्या सरकारच्या कृत्यांनीच राजकीय असंतोष वणव्यासारखा पसरत होता. त्याला मुद्दाम प्रचार कशाला हवा ? पांढरपेशी माणसें स्वस्थ बसलीं तरी शिपाई पेशांतील लोक किंवा, शरीराने काटक मजबूत असलेलीं माणसें खुशाल हजार पांचशे अनुयायी जमा करून

वाटमारीवर आपला उदरनिर्वाह करीत. खानदेशांतील खाज्या नाईकासारख्या भिल्ल जाति, बुंदेलखंडांतील रजपूत, दिल्लीकडील मेवाती, रोहिलखंड व अयोध्या येथील गोंड व गुजर जाति, या सर्व दरवडेखोर होत्या. अयोध्येंत जमीनदारीवर गदा आणून अनेक तालुकदार सरकारने नागविले होते. पण अशा कागदोपत्री हुकुमनाम्यांनी जमिनीचा ताबा मिळत नसतो! शेंकडो शिपाई व हत्यारबंद रयत नोकरीवर ठेवून या जमीनदारांनी सरकारचे हुकूम खुशाल धाब्यावर बसविले होते. "अयोध्येंत तर एका शिपायाची नोकरी काढून घेणें म्हणजे त्याला दरवडेखोर करण्यासारखे होते" असें एका सरकारी प्रतिवृत्तांतच वर्णन केलें आहे.

"In these circumstances to discharge a soldier is often to make him a bandit—" Lord Stanley's dispatch

कारण अयोध्येच्या राज्यांत शस्त्रें वापरण्याचें इतकें वेड होतें कीं शस्त्र चालवितां येत नाहीं असा तेथें मनुष्य नव्हता. शस्त्रें आणि शिपाईगिरी हा तेथें वंशपरंपरा धंदाच होता. अयोध्येचें राज्य खालसा झाल्यामुळें ऐशीं हजार शिपाई बेकार होऊन प्रांतभर पसरले होते. या कडव्या निर्भय शिपायांना शिकलेल्या पांढरपेशा माणसांप्रमाणें कायद्याची किंवा सरकारची भीति वाटण्याचें कारण काय? हीं माणसें वेळीं खुशाल सरकारी अधिकाऱ्यावरहि हात टाकीत असत!

बंड मुख्यतः बंगालच्या फौजेंत झालें. त्यांपैकीं अनेकांचीं घरदारें, आप्त सोयरे, इष्टमित्र, जमीन जुमले अयोध्या प्रांतांतच होते. अयोध्येचें राज्य कसेंहि असलें तरी आपलेपणामुळें लोकांना त्याचा अभिमान होता. तें एक दिवस साफ बुडविलेलें पाहून लोकांना बरें कसें वाटेल? यामुळें जुन्या शिपायांना सरकार नव्या इंग्रजी फौजेंत नोकरीवर घेण्यास तयार असतां, हजारों माणसें अशीं होतीं कीं त्यांनीं तीं नोकरी नाकारली. आणि खुशाल बेकारपणानें ते भटकूं लागले.

"In all India, on the 10th of May, when the sepoys rose in arms at Meerut, there were soldiers, 238,002 in the service of the Company, of whom 18,001 were Europeans, and 200,001 natives; i. e. 19 Europeans to 100 natives. Such were the military elements amidst which the great struggle began." Nolan—P. 742.

त्यावेळची सैन्याची परिस्थिति सांगितली पाहिजे. तारीख १० मे १८५७ रोजीं सर्व हिंदुस्थानांत कंपनीसरकारची एकंदर फौज दोन लक्ष अडतीस हजार असून, त्यांत युरोपियन फक्त ३८ हजार होते. देशी फौज गोऱ्यापेक्षां पांचपट होती. म्हणजे शंभर नेटिवांना फक्त एकोणीस गोरे असें हें प्रमाण पडलें! जातवारीनें पाहिलें तर तीन शिपायांत एक ब्राम्हण असे, असें रेव्हरंड मॅकेंझी यानें लिहिलें आहे. यावरून त्या सैन्यांत ब्राह्मणांचें वर्चस्व कां होतें, याचा खुलासा होतो. ही सर्व शिपायांची भरती कंपनीसरकारच्या मुलखांतून होत नसे, तर अयोध्येसारख्या मुलुखांतूनच हे लोक कंपनीला मिळत. अयोध्येचें राज्य बुडविल्यामुळे शिपायांचें मनच कंपनीसरकारविरुद्ध बदललें. इतकें नव्हे तर इंग्रज आमच्या बळावर राज्य करतो ही गोष्ट त्यांना कळून चुकली होती. पूर्वी क्लाइव्ह साहेबाचे वेळेस या देशी शिपायांनींच नुसती भाताची पेज पिऊन इंग्रजांच्या हाताखाली काम केलें होतें. पण शिपायाचें मन ओळखणारे त्यावेळीं अधिकारीहि सज्जन होते! रणांगणावर सामान्य शिपायांत मिळून मिसळून भलेपणाने ते वागत. पण डलहौसीच्या वेळचे लष्करी अधिकारी नुसते मिजासी, ऐदी, बडे बापके बेटे होते. शिपायांच्या बराकीपासून ते अगदी वेगळे राहात. नेटिवाबद्दल त्यांची मगरूरी व बेपर्वाई इतकी असे की ‘ काळा निगर ’ हा शब्द नुसत्या शिपायांनाच नव्हे तर उत्तम इंग्रजी येणाऱ्या सुशिक्षित विद्वानांसहि ते लावीत! भत्याबद्दल शिपायांच्या पुष्कळ तक्रारी होत्या, तशाच परदेशगमनाबद्दलहि होत्या. “ समुद्र ओलांडून परदेशांत नोकरीवर तुम्हास पाठविणार नाही ” अशा स्पष्ट शर्तीवरच ही सैन्यभरती होत असे. हा करार डलहौसी व कॅनिंग यांनीं मोडला म्हणूनच त्याबद्दल तक्रारी सुरू झाल्या. या तक्रारी शांतपणानें मिटविण्याचा अधिकाऱ्यांनी प्रयत्नच केला नाहीं. उलट, येथें आल्याबरोबर कॅनिंग यानें १८५६ च्या जुलैमध्यें असा हुकूम काढला कीं, हिंदुस्थानाबाहेर किंवा कोठेहि जाण्याचा हुकूम झाल्यास लष्करानें बिनतक्रार गेलेंच पाहिजे. नाहींतर कडक शिक्षा होईल! या हुकुमामुळें सैन्यांत अत्यंत असंतोष निर्माण झाला. परदेशगमनाबद्दल आज कांही वाटत नाहीं. पण त्याकाळीं धर्म समजुती निराळ्या होत्या. ‘ काळें पाणी ’ ओलांडावयाचें म्हणजे प्रत्येकाला मनांत कांहीएक अतर्क्य भीति वाटत असे! शिपायांच्या गाऱ्हाण्यांत कायदेशीर दृष्टीनें कांही चूक नव्हतें. सरकारचेंच वागणें सैन्याशीं केलेल्या कराराला सोडून होतें. या शिपायांना नोकरींतून काढून टाकून

नव्या अटींवर दुसरे शिपाई जर सरकारला मिळण्यासारखे होते तर, सरकारनें तरी इतका अडाणीपणा करण्याचें काय कारण? पण तुम्ही नोकरीवर राहिलेच पाहिजे; आणि स्वतः सरकारनें करार मोडला तरी तोहि सहन केला पाहिजे, असा सरकारचा दुहेरी हटवाद होता! या जुलमाविरुद्ध शिपाई फार जळफळत. या तक्रारी दूर झाल्या नाहींतच पण १८५७ चे जानेवारींत चरबीचीं काडतुसें निघाल्यामुळें हें प्रकरण फारच विकोपाला गेलें!! पण त्याचा उल्लेख पुढें येणारच आहे.

# ६

## कांहीं प्रमुख असंतुष्ट व्यक्ति

इंग्रजाविरुद्ध जळफळणारी, इंग्रज बुडावा असें चिंतणारीं माणसें त्याकाळीं शेकडो होतीं. कारण ज्याला झळ पोंचली नव्हती असा एकहि वर्ग त्यावेळीं नव्हता. तथापि कांही व्यक्तींचा बंडाच्या हकिगतींत पुढें प्रमुखपणें संबंध येणार असल्याने येथेंच त्यांचेसंबंधी थोडी माहिती सांगणें अवश्य आहे. या व्यक्ति म्हणजे बाजीरावाचे दत्तक पुत्र धोंडोपंत नाना ऊर्फ नानासाहेब पेशवे, दिल्लीचा बादशहा वृद्ध बहादुरशहा, लखनौचा नबाब वाजीद अली, व झांशीची राणी लक्ष्मीबाई या होत. या व्यक्तींना कंपनी सरकारने अत्यंत अन्याय केला होता. बंड झालें तेव्हां सहजच त्यांचेकडे पुढारीपण आलें, आणि बंडास सामील होण्याचें त्यांचे मनांत असो वा नसो, सरकारी क्रोधाच्या होमकुंडांत त्यांची आहुति पडावी असें त्यांचें नशीब होतें इतकें खरें !

कंपनी सरकारविरुद्ध नानासाहेबांचा दावा बाजीरावाच्या पेनशनाबाबत होता. कंपनी म्हणे बाजीरावांचे पेनशन ‘ तहाहयात ’ होतें. ती ‘ नेमणूक ’ नव्हे तर

'पेनशन' आहे. नानासाहेबांचे म्हणणें असें होतें कीं, मालकम याने बाजीरावाशीं केलेला तह काढून पाहा. त्यांत हें पेनशन "बाजीरावाकरितां व त्याचे कुटुंबाकरितां" आहे असें लिहिलें आहे. दत्तक मुलाचा अंतर्भाव 'कुटुंब' या शब्दांत आला नाहीं काय ? मग हें पेनशन 'तहाहयात' कसें म्हणतां येईल ? कंपनी म्हणे, बाजीराव कल्पनेपेक्षां जास्त जगून त्यानें ३३ वर्षें पेनशन खाल्लें. दरसाल आठ लक्ष रुपयांतून त्यानें पुष्कळ शिल्लक टाकली असली पाहिजे ! नानासाहेब म्हणत पेनशनांतून कोणी किती शिल्लक टाकली किंवा ते पैसे त्यानें समुद्रांत ओतले याची चांभार-चौकशी करण्याचा कंपनी सरकारला अधिकार काय ? 'बाजीराव आणि त्याचें कुटुंब' यांतील 'कुटुंब' याचा अर्थहि व्यापक केला पाहिजे. पेनशन बंद झालें तर परिवारांतील शेंकडों आश्रितांनी काय करावयाचें ? त्यांचाहि समावेश कुटुंबांतच नाही काय ? राज्य गेलें म्हणून काय झालें ? दिल्लीच्या बादशहाची नेमणूक, तसेंच टिपूच्या पुत्रांची नेमणूक जर चालू आहे तर बाजीरावाची 'नेमणूक' मात्र तहाहयात ठरून कां बुडावी ? तें पेनशन नव्हतें, नेमणूक होती.

नानासाहेबांनी वरील पुष्कळ कारणें अर्जांत दिलीं होतीं, पण कंपनीच्या डायरेक्टरांनी १८५४ सालीं नानासाहेबांना कायमचा व स्पष्ट नकार दिला. नानासाहेब हे फार सज्जन, अगत्यवान व सत्वशील असल्यामुळे, एवढया परिवाराला रजा देणे, त्यांच्या अत्यंत जिवावर आलें. नेमणूकीच्या आशेमुळे अनेक गोऱ्या अधिकाऱ्यांना मेजवान्या देऊन त्यांनी तृप्त करण्याचा परिपाठ ठेवला. पण नानासाहेबांचा पाहुणचार झोडणाऱ्या या शेंकडों गोऱ्या लोकांपैकीं एकानें त्यांच्या कामासंबंधीं मदत केली असेल तर शपथ ! नानासाहेबांजवळ अजीमुल्लाखान या नांवाचा एक हुशार इसम होता. त्याला व बरेलीच्या उमराव घराण्यांतील महंमदअल्ली यास त्यांनीं १८५३ सालीं विलायतेंत आपल्या नेमणुकीबद्दल खटपट करण्याकरिता पाठविलें. बडया लोकांत ओळखी करून व मेजवान्या नजराणे देऊन त्यांनीं पांच लक्ष रुपये खर्च केले. पण पेनशनाच्या कामांत यश आलें नाही ! याच वेळेला साताऱ्च्या प्रतापसिंहाच्या प्रकरणांत गाजलेला रंगो बापूजी याची व अजीमुल्लाची लंडनच्या एका निवासांत गांठ पडली. इंग्रजाबद्दल दोघांनाहि निराशेचा सारखाच अनुभव आला होता. त्या दोघांत काय भाषण झालें किंवा ठरलें हें सांगता येत नाही. पण ही दोन्ही माणसें राजकारणांत फार हुशार असून, जेव्हां पदरीं निराशा घेऊन

हिंदुस्थानास परत यावयाला निघालीं तेव्हां त्यांच्या तोंडावर सूडाची भावना स्पष्ट दिसत होती इतकें खरे! सनदशीर चळवळीची मर्यादा थेट सशस्त्र प्रतिकारापर्यंत नेऊन भिडवावी असे विचार त्यांचे मनांत घोळत असतील काय?

रंगो बापूजी हिंदुस्थानांत निघून आल्यावर अजीमुल्लानें आणखी कांहीं दिवस तेथें काढले. यानंतर लखनौच्या राजघराण्यांतील राजपुत्र व स्त्रीमंडळी वकिलातीकरितां इंग्लंडला आली. त्यांना भेटून परत हिंदुस्थानांत जातांना अजीमुल्ला मुद्दाम कानस्तांतिनोपल येथें गेला. कारण यावेळीं इंग्लंड व रशिया यांत युद्ध जुंपलें होतें; व क्रीमियांत सेबेस्तेपूल येथील वेढ्यांत इंग्रजांचा पराभव झाला होता. म्हणून रणक्षेत्रावर जाऊन तेथील परिस्थिति प्रत्यक्ष पाहून तो आला. परराष्ट्रीय राजकारणाचें ज्ञान त्याला उत्तम होतें. त्याला इंग्रजी, फ्रेंच, उर्दू वगैरे अनेक भाषा सफाईदार बोलतां येत असल्यामुळे, त्यानें हां हां म्हणतां रशियाच्या कांहीं जबाबदार व्यक्तींची ओळख करून घेतली व कांहींतरी योजना मनांत नक्की ठरवून तो हिंदुस्थानास परत आला!

दिल्लीच्या बादशहाचें गाऱ्हाणें बिठूरच्या नानासाहेबांप्रमाणेंच, पण फार जुनें होतें. व अकबरशहाच्या वेळेपासून सतत तीस वर्षें, केव्हां विलायतेस वकील पाठवून, तर केव्हां व्हाइसरायकडे अर्ज पाठवून, तक्रारी चाललेल्या होत्या. बादशहाचें उत्पन्न होतें सारें सालीना बारा लाख. पण त्याचे 'सलातीन' म्हणजे जवळचे दूरचे नातेवाईकच यादीप्रमाणें हजार बाराशें होते. बारा लाखांची नेमणूक इतक्यांना पुरावी कशी? कांहीं गांवांचा वसूल व नजराणा त्याला मिळत असे. पण तोहि जिकीरीनें. डलहौसीनें त्याच्या पाठीमागें भुणभुण लावली होती कीं, बादशहा ही पदवी त्यानें 'स्वखुशीनें' सोडून द्यावी व राजवाडा सोडून कुतुबमिनारच्या बागेंत जाऊन राहावें. पण बादशहा स्वाभिमानी असल्यानें त्यानें ही आत्मघातकी अपमानास्पद गोष्ट कधींच कबूल केली नाहीं. इतकेंच नव्हे तर, विलायतेस वकील वगैरे पाठविण्याकरितां गेल्या ४० वर्षांत त्यानें लाखों रुपये खर्च केले होते. कॅनिंग यानें आल्यावर असा ठरावच केला कीं, बादशहाचे मृत्यूनंतर 'बादशहा' ही पदवीच अजीबात नष्ट करावयाची व बादशहाचे वारसांची तैनात दरमहा फक्त पंधरा हजारावर आणावयाची! ही गोष्ट ऐकून बेगम झिन्नतमहाल व दिल्लीचे शहाजादे यांना काय वाटलें असेल? बादशहा वयाने ऐशी वर्षांचे वर

होता, स्वतः बंड करण्याची इच्छा असती तरी त्याचें वय नव्हतें. पण तरुण रक्ताच्या शहाजाद्यांचें सगळे आयुष्य पुढेंच जावयाचें होतें त्यांनीं काय करावयाचें ?

लखनौच्या नबाबाला इंग्रजांनीं जो अन्याय केला होता त्याला खरोखरच सीमा नव्हती. लखनौचे नबाब विलासप्रिय असतील, राज्यकारभारांत त्यांचें लक्ष नसेल, पण इंग्रजांना ते सर्वस्वी धार्जिणे होते ना ? इंग्रजांविरुद्ध त्यांनी कधीं आजवर कट केले नाहींत, बंड केलें नाहीं, रेसिडेंटच्या मध्यस्तीखेरीज इतर कोणा राजेरजवाड्यांशीं संबंध ठेवले नाहींत. अडीअडचणीला धान्य, पैसा, जनावरें, सामानसुमान सर्व पुरवून इंग्रजांना मदत केली. आजपर्यंत अयोध्येच्या नबाबांनीं असे इंग्रजांना तीन कोट रुपये दिले होते ! ब्रह्मदेश व नेपाळ विरुद्ध १८४२ सालीं युद्ध निघालें तेव्हां वाजीद अलीच्या आजानें इंग्रजांना एका रकमेनें चौदा लाख रुपये दिले. आणि अफगाणिस्तानांत इंग्रजांचा भयंकर पराभव कतल झाली त्या अडचणीच्या प्रसंगीं अयोध्येच्या मयत नबाबानें ( वाजीदअलीचा बाप ) इंग्रजांना पुनः ३५ लक्ष रुपये दिले. १८५५ सालीं डलहौसीच्या कौन्सिलांतील जनरल लो यानें अयोध्येचें राज्य खालसा करूं नये म्हणून भिन्न मतपत्रिका लिहितांना या गोष्टी नमूद केल्या आहेत. पण याचा कांहींएक उपयोग न होऊन स्लीमन व आऊटरॅम यांनीं खोटे रिपोर्ट करून वाजीदअली यास पदच्युत केलें व नंतर इंग्रजांनीं त्याला अयोध्येंतून उचलून कलकत्त्यासच नेऊन ठेवलें. अयोध्येचें राज्य खालसा करितांना राजघराण्यांतील अनेक परिवारांना जीं पेनशनें ठरलेलीं होतीं तींहि बारा महिनेपर्यंत देखील मिळालीं नाहींत ! मग त्यांनीं खावयाचें काय ? इंग्रज किती कपटी, विश्वासघातकी आहे असें वाटून त्यांचा किती जळफळाट होत असेल ? या राजघराण्यांतील कित्येक लोकांचे वाडे अयोध्येंत होते. सरकारी कामाकरितां हे वाडे ताब्यांत घेऊन त्यांना कलकत्यास हुसकून देण्यांत आलें. या नबाबाचा भाऊ शिकंदर हशमत बहादुर, आई अवलिया बेगम, शहाजादा, वगैरे कित्येक मंडळी १८५६ सालीं विलायतेस जाऊन तेथें खटपट करून आली. ज्यांनीं पूर्वी राज्यें केलीं त्यांनीं परत येतांना परराष्ट्रीय परिस्थिति अगदींच पाहिली नसेल असें नाहीं !

झांशीवाली लक्ष्मीबाई ही व्यक्ति मात्र अशी होती कीं कटांत तिचा दुरूनहि

संबंध नव्हता. पण इंग्रजांनीं निर्वाणपदावर उभे राहण्याची तिच्यावर पाळी आणल्यानंतर तिने आपली कर्तबगारी प्रत्ययाला आणली. एका इंग्रज ग्रंथकाराने म्हटलें आहे कीं, रणांत सैन्याचें आधिपत्य घेऊन जिने इंग्रज सेनापतीशी दोन हात केले ती एक छोटें संस्थान चालविण्याला अपात्र आहे असें म्हणणें ही मोठी अजब गोष्ट म्हटली पाहिजे ! झाशीचें राज्य खालसा केल्याबद्दल तिच्या मनांत इंग्रजाबद्दल अत्यंत द्वेष धुमसत होता यांत शंका नाहीं. वरील सर्व व्यक्तींनीं बंडांत केव्हां व कसा भाग घेतला ही गोष्ट तूर्त सोडून पुढें जाऊं. पण या सर्व व्यक्ति अत्यंत कर्तबगार होत्या यांत शंकाच नाहीं. बंडांत एकदां पडल्यानंतर त्यांनीं जें अखेरपर्यंत धीरोदात्त वर्तन केलें व हाल सोसले त्यामुळें अद्यापि लोक हळहळतात. १८५७ सालीं भोंवतालीं जी नाजुक राजकीय परिस्थिति जमा होत होती ती त्यांना खात्रीनें कळत होती. बंडासारख्या गोष्टींत कोणी हौसेनें सामील होतो असें नाहीं. कारण तो सर्वनाशाचा खेळ आहे. अपरिहार्य झाल्यावरच जो तो त्यांत पाऊल घालतो. सुखासुखीं सर्वनाशाला कोण तयार होईल ?



## परराष्ट्रीय राजकारणाची मदत

याच सुमाराला परराष्ट्रीय राजकारणांत फार महत्त्वाचे फेरबदल घडून येत होते. युरोप व आशिया या दोन्ही खंडांत युद्ध सुरू होऊन त्यांत इंग्लंड सांपडलें. त्यांत हळूंहळूं चीन, पर्शिया, जपान, रशिया इतक्यांचे संबंध इंग्लंडला विरोधी उत्पन्न झाले. १८५५–५६ ही दोन वर्षे रशियाशीं इंग्लंडचें युद्ध सुरू होतेंच, त्यांतच चीन व पर्शिया याचेंशीं नवीन भांडण उद्‌भवलें. १८५६ च्या मार्चमध्यें इंग्लंड व रशिया यांमधील युद्धाचा शेवट झाला, पण सेबॅस्टेपूलच्या वेढयांत इंग्रजांनीं जो मार खाल्ला होता त्याबद्दल हिंदुस्थानांत सगळीकडे अनेक तर्कवितर्क व वार्ता पसरलेल्या होत्या. हें युद्ध संपतें न संपतें तोंच पर्शिया व चीन याविरुद्ध इंग्लंडच्या लढाईस सुरवात झाली ! ता. २६ ऑक्टोबरला पर्शियानें हिरात घेतल्याबरोबर ता. १ नोव्हेंबर १८५६ रोजीं इंग्लंडच्या प्रधान मंडळानें पर्शिया विरुद्ध युद्धाची घोषणा केली. ता. ६ नोव्हेंबर रोजीं कॅंटन बंदरावर इंग्रजांनीं चढाई केली व ११ डिसेंबर रोजीं नागासाकी येथें जपानशीहि कुरबुर सुरू झाली. हिंदुस्थानांत अन्याय व दडपशाही हवी तशी एकवेळ चालेल. पण साऱ्या जगांत इतर राष्ट्रें तीं काय म्हणून

मानणार ? प्रधानमंडळाची ही अनधिकृत हुकूमशाही पार्लमेंटांत देखील पुष्कळांना इतकी नापसंत होती कीं चर्चा होऊन मंत्रिमंडळाचा निषेध करण्याचा ठरावहि आला होता. पण प्रधानमंडळानें पार्लमेंटच बरखास्त करून आपली अब्रू बचावली. पर्शिया व चीन विरुद्ध लढाईस सुरवात होतांच हिंदुस्थानांतील सुमारें ४५ हजार गोऱ्या लष्करापैकी वीस हजार लष्कर परदेशांत रवाना झाले. आणि हिंदुस्थानांत १८५७ च्या सुरवातीस गोरे सैन्य बावीस तेवीस हजारहि असेल नसेल ! याचे उलट, देशी फौज मात्र येथें दोन लक्ष होती. अफगाणिस्तानचा दोस्त महंमद हा जरी वरकरणी इंग्रजांचा ' दोस्त ' असला तरी पेशावर प्रांत इंग्रजांनीं आपल्या हातीं ठेवला होता ही गोष्ट त्याला डांचत होती. राजकारणांतलें शत्रु-मित्रत्व हें केवळ तात्कालिक असतें. तें केव्हां बदलेल किंवा बिनसेल हें सांगतां येत नाहीं. राजकारणांत कोणीहि कोणाचा कायमचा मित्र नाहीं. कोणीहि कायमचा शत्रू नाही. हे सर्व शत्रुमित्र प्रसंगानुसार बदलत असतात. राजकारणांत लहानालाच मोठ्याची मदत लागते असें नाहीं; तर वेळों मोठ्यांनाहि लहानांच्या मदतीची जरुरी लागते म्हणून लहानांनी मिळेल तेथून मदत घेणें याचेंच नांव परराष्ट्रीय राजकारण. नुकत्याच निघालेल्या पर्शियन युद्धांत एकीकडे रशिया व पर्शिया व दुसरीकडे इंग्रज व अफगाणिस्तान होते. पर्शियाने हिरात घेतलें हें नुसतें निमित्त होतें. पण पर्शियाच्या मदतीनें रशिया हिंदुस्थानला शह देईल ही खरी भीति इंग्रजांच्या पोटांत असून, सरहद्द प्रांताचें रक्षण कसें होईल हीच इंग्रजांचे पोटांत मोठी काळजी होती. हिंदुस्थानच्या पश्चिमेस अफगाणिस्तान व पलीकडे पर्शिया, उत्तरेस तुर्कोमन राज्य, यांची पाठ रशियाच्या साम्राज्याला लागलेली, म्हणून रशियाचा शह मोठा होता ! हिंदुस्थानांतून ज्या वकिलाती यावेळीं विलायतेस गेल्या त्या सर्वांचा परामर्श रशियानें व पर्शियाच्या राजकारणी लोकांनीं घेऊन त्यांचा उपयोग केला. हिंदुस्थानांत बंड झालें तर पर्शियाला व रशियाला स्वतःच्या स्वार्थाकरतां तें हवेंच होतें ! आणि इंग्रज सामोपचारानें ऐकत नाहीं तर त्याच्या शत्रूशी संधान बांधून, नाक दाबून तोंड उघडण्याचा प्रयत्न करणें हा मार्ग हिंदी लोकांपुढें ओघानेच आला. अशी

सुवर्णसंधी शंभर वर्षांनी एखादीच येणार; अर्थात् तिचा फायदा करून घेतला तर काय होऊं शकेल याची कांहीं राजकारणी व्यक्तींना उत्तम कल्पना होती. याच वेळीं दुर्दैवानें सरकारच्या हातून नुसती चूकच नव्हे तर, घोडचूक होऊन १८५७ च्या जानेवारींत डमडम येथें काडतुसांचें प्रकरण उद्भवलें व त्यानें साऱ्या देशभर हिंदु व मुसलमानांची मनें बिथरून गेलीं. याच गोष्टीचा फायदा घेऊन कांहीं धीट धाडशी लोकांनीं राज्यक्रांतीच्या कटाची उभारणी केली.

८

# राज्यक्रांतीचा कट

अशा रीतीनें असंतोषाच्या दारूचें कोठार अगदीं शिगेपर्यंत भरलें असतांना, त्यांत कोठून तरी ठिणगी पडण्याचा अवकाश होता. काडतुसांच्या प्रकरणामुळें दुर्दैवाने ती ठिणगी सरकारच्याच हातून पडली व या ज्वालाग्राही परिस्थितीने एकदम पेट घेतला !

कलकत्त्याजवळ डमडम येथे सरकारने नवीं काडतुसें करण्याचा कारखाना काढला होता. यापूर्वी सैन्यांत ब्राऊनबेस बंदुक होती त्याऐवजीं नव्या एनफील्ड रायफली सरकारने आणविल्या होत्या. त्यांची काडतुसें हातांनी किंवा दातांनी सोलल्याशिवाय बंदुकांचा उपयोग करितां येत नसे. एक दिवस सैन्यांतला एक पूर्बिया ब्राह्मण बिहिरीवरून पाणी भरून नेत असतां कारखान्यांतील एक लास्कर शिपाई तेथें येऊन त्याचा लोटा मागूं लागला. तेव्हां त्या ब्राह्मण शिपायानें त्याला झिडकारून म्हटलें, "तुला लोटा दिला तर माझी जात बुडणार नाहीं का?' त्यावर तो लास्कर म्हणाला, "तुम्ही ब्राह्मण फार शेंफारून गेले आहांत. जात जात अशी

तुम्ही फार प्रौढी मारूं नका. सरकारने आतां नवी काडतुसें करण्याचा कारखाना काढला आहे. त्याला गाईची आणि डुकरांची चरबी चोपडून लावली आहे. हीं काडतुसें दातांनीं सोलावीं लागतील तेव्हांच त्यांचा उपयोग करितां येईल ! मग तुमचा धर्म आणि जात अशीच कायम राहणार आहे का ?"

हे शब्द ऐकतांच त्या ब्राह्मणाच्या उरांत धसका बसून त्यानें ही बातमी धांवत जाऊन इतर शिपायांना सांगितली. तेव्हां त्यांच्यांत मोठीच चळवळ उडून गेली. गाय व डुक्कर यांची पवित्रता किंवा विधिनिषेध हिंदु मुसलमानांना. पण परकी सरकारला तो वाटण्याचें कारण नव्हतें. यामुळें खरोखरीच गाईची डुकराची, किंवा मिळेल त्या जनावरांची चरबी उपयोगांत आणून हीं काडतुसें तयार करण्यांत येत.

"Recent researches of Mr. Forrest in the records of the Government of India prove that the lubricating mixture used in preparing the cartridges was actually composed of the objectionable ingridients, cow's fat and lard, and that incredible disregard of the soldiers religious prejudices was displayed in the manufacture of these cartridges.'

Roberts –Fortyone years in India Page –431.

ही बातमी बाहेर फुटली आणि हां हां म्हणतां जिकडे तिकडे पसरली. तोंडांत कोणी सक्तीने गोमांस कोंबणें काय आणि दातांनी चरबीचें काडतूस सोलावें लागणें काय दोन्ही सारखेंच. यामुळे सगळीकडे असंतोष माजून मोठा गवगवा झाला आणि देशी शिपायांना फार वाईट वाटलें. शिपायांची तक्रार अगदी खरी व रास्त होती, पण हुकुमांत फेरबदल न करितां गवगवा करणारांना शिक्षा करून सरकारनें ती चळवळ सक्तीने दडपून टाकली. यामुळे शिपायांच्या असंतोषांत भर पडली. त्यावेळी उत्तर हिंदुस्थानांत बनारस, अलाहाबाद, संयुक्त प्रांत, पंजाब, वायव्य प्रांत इत्यादि ठिकाणी पूर्विये शिपायांची संख्या फार. लष्करी कामांत ते जितके रांगडे तितकेच कर्मठपणांत कडवे धर्मनिष्ठ ! त्यांच्यांत सोंवळे ओवळे, शिवाशीव जातिभेद यांच्या कल्पना फार तीव्र. सैपाकाला बसले तरी ' आठ चुले आणि नऊ पुरभय्ये ' असा प्रकार ! अशांना चरबीच्या काडतुसाची कल्पना तरी कशी सहन व्हावी ? आजवर त्यांना नोकरींत आपला हिंदुधर्म कसा तरी सांभाळतां आला; पण नोकरी संपल्यावर उद्यां आपण आपल्या घरीं गेलों तर अशा जातिभ्रष्ट

स्थितींत आपणांला घरांत कोण घेणार? बरें, या अन्यायाविरुद्ध तक्रार किंवा सत्याग्रह करावा तर, दाद लागणें राहोच पण तुरुंग आणि दहा दहा वर्षें सक्त-मजुरीच्या शिक्षा होऊं लागल्या. कोणता संभावित मनुष्य ही गोष्ट पत्करील? तुरुंगांत जाणें ही गोष्ट आजच्या काळीं मोठ्या देशभक्तीची झाली आहे, पण त्या जुन्या काळीं ती भूषणास्पद नसून सामाजिक दृष्टीनें ती फार हीनतेची मानीत.

या काडतुसांच्या प्रकरणांत जात व धर्म यांच्या नांवामुळे भावना जितकी लक्षांत येते तितकी शिपायांची कायदेशीर बाजू लक्षांत येत नाहीं. पण डॉ. नोलन, लेकी या ग्रंथकारानी ही बाजू कायदेशीर दृष्टीनें अगदी शंभर टक्के समर्थनीय होती असें आपलें मत दिलें आहे.—शिपायांना नोकरीवर घेण्यापूर्वी "तुमच्या जातीला किंवा धर्माला अपायकारक असें कांहींहि काम सरकार तुम्हाला सांगणार नाहीं, अशी स्पष्ट हमी नोकरीच्या करारांत होती कीं नाहीं? त्यांना परप्रांतांत पाठविलें तर जादा भत्ता देण्यांत येईल, अशी अटहि त्या करारांत होती कीं नाहीं? मग या दोन्ही बाबतींत शिपायांनीं करार मोडला कीं सरकारनें मोडला? शिपायांना आपल्या धार्मिक भावनेचें महत्त्व फार वाटत होतें. पण सरकारला तें मुळींच वाटत नव्हतें तर, अशा शिपायांनां सरकारने प्रथम नोकरीवरच घ्यावयाचें नव्हतें. किंवा या अटी नोकरीच्या कामाला विरोधी आहेत असें जर सरकारचें मत होतें तर, पूर्वीच्या शिपायांचे राजीनामे घेऊन नव्या अटीवर पुनः लष्करभरती सरकारला करता आली असती. पण तें सोडून सरकारनें शिपायांवरच जुलूम चालविला होता. पण याहि पुढें जाऊन गोमांसांतले काडतुस त्यांनां दातांनीं सोलावयास लावणें हा त्यांचेवर धडधडीत अत्याचारच नव्हता काय? लेकी याने म्हटलें आहे—

"If ever there was a case of a justifiable rebellion in the world, it was the rebellion of the Hindu and Mahomedan soldiers of India against the abomination of greased cartridges with the fat of the cow and pig. The blunder was made by the British administrators, but India paid the cost!"

गोरे अधिकारी शिपायांच्या बराकीकडे रात्रीं फिरकत नसल्यामुळें शिपायांची स्वस्थपणें चर्चा व खल चाले. रात्रीं भजन होई तेव्हां गोसावी बहुरुपी फकीर मौलवी अशी नित्य नवी मंडळीं बराकींत येत. कारण या लोकांना कोठेंच मज्जाव नसे

अयोध्या खालसा झाल्यामुळें सुमारें ८० हजार लोक बेकार झाले होते; त्यांतले कित्येक शिपाई फकीर बैरागी यांचा वेष घेऊन खुशाल भीक मागत व शिपाई लोकहि या लोकांना सहानुभूतीने व आग्रहाने बोलावून आटा धान्य देत व त्यांच्याशीं सुख-दुःखाच्या गोष्टी बोलत. त्यांत विषय हाच असे कीं, कंपनी सरकारला इमान म्हणून कसें तें राहिलें नाहीं. आम्हीच आमचीं राज्यें जिंकून कंपनीसरकारला दिलीं, पण त्याचें चीज काय झालें ? तर आमचा भत्ता बंद झाला आणि त्याबद्दल तक्रार करणारांना तुरुंगाच्या शिक्षा मिळाल्या. परमेश्वराखालोखाल धर्म व स्वामिभक्ति हींच फक्त आम्ही प्रमाण मानलीं. त्याचें फळ काय तर सरकार आता आम्हाला सक्तीने बाटवणार आणि जगांतून कायमचे उठविणार ! अशी विटंबना करून घेऊन जगण्यापेक्षां धर्माच्या नांवाने युद्ध पुकारून मेलेलें काय वाईट ?

या विचारांची सांथ करणारीं किंबहुना त्यांना मनःपूर्वक भर देऊन त्याचा राजकारणाकडे उपयोग करून घेणारीं कित्येक चतुर माणसें त्यावेळीं सैन्यांत, बाजार-पेठेंत, सराफ कट्ट्यांत, चावडीवर, देवळांत, मशिदींत, धर्मशाळांत सर्वत्र वावरत होतीं. तों याच सुमारास पर्शिया विरुद्ध युद्धाला सुरवात झाली ! ही गोष्ट चळ-वळ्या लोकांच्या अर्थातच फार पथ्यावर पडली. त्यांनी शिपायांच्या सत्याग्रहाला मनःपूर्वक भर दिली. शिपायांनी बंड केलें म्हणजे त्यांना पुरें होतें. मग ते सत्याकरितां बंड करोत, धर्माकरितां करोत किंवा कशाकरितांहि करोत !

याच सुमारास लखनौच्या बेगमेचा प्रसिद्ध सल्लागार फैजाबादचा मौलवी लियाकत हुसेन याने कलकत्त्यापासून लखनौपर्यंत प्रत्येक शहराला भेट दिली असून, अहमद-शहासारखे कडवे मौलवी अत्यंत जळजळीत शब्दांत मशिदींतून इंग्रजाविरुद्ध ‘जिहाद’ पुकारण्याचा उपदेश करीत असत. अफगाणिस्तानचा अमीर व इराणचा शहा बादशहाला मदत करण्याकरितां हिंदुस्थानवर स्वारी करणार आहे म्हणून लोकांनीहि त्याला सहाय्य केलें पाहिजे, असा बंडाचे अगोदर सहा महिने मशिदींतून सतत प्रचार चाललेला होता. पर्शियांतील युद्धामुळें हिंदी मुसलमान चिडले होते. आणि काडतुसांतील गोमांसाच्या चरबीमुळे हिंदु व मुसलमान दोघेहि चिथरल्या-मुळें, कटवाल्यांना जोर आला होता. या कटाची मुख्य प्रेरणा अर्थातच मुसल-मानांची असून लखनौ व दिल्लीची बादशाही पुनः स्थापण्याचा त्यांचा हेतु होता. बंगाली फौजेच्या धर्मभावनेचा उपयोग करून घेऊन कटवाल्यांनी जो दिल्लीवरच

पहिला हल्ला चढविला यावरून ही गोष्ट स्पष्ट दिसते. सर ऑलफ्रेड लायल, के, मॅक्लिऑड इन्नेस वगैरे ग्रंथकारांनीं असेंच मत दिलें असून, या बंडानंतर पुष्कळ दिवसपर्यंत हिंदूंपेक्षांहि मुसलमानांवरच सरकारचा राग अधिक होता !

" The reasonable inference from the course of events seems to be that the leading spirits of the rebellion lay in the Moghul faction, and that the Sepoy army was used as a cat's paw through the operation of the cartridge-incident. Moreover this inference is corroborated by the seditious correspondence that was being watched and detected. At first it was mainly Mahomedan, very cautious and in cipher. Afterwards when it spread among the sepoys, it was more diffuse and readily detected, being in ordinary language and crudely veiled allusions. "

Lucknow and Oudh in mutiny—Page 13
By Macleod Innes, V. C.

( तसेंच, सर ऑलफ्रेड लायल यांचें Asiatic stories पुस्तक, पृ. २३९ यांतील Islam in India लेख पाहा. )

कित्येक हिंदु व मुसलमान ज्योतिषांनी असें भविष्य वर्तविलें होतें कीं इंग्रजांचें राज्य फक्त शंभर वर्षें टिकणार. १७५७ च्या प्लासीच्या लढाईपासून १८५७ सालीं जर हीं शंभर वर्षें पुरीं होतात तर त्यापुढें एक क्षणभर तरी तें कसें टिकेल ? या भविष्यावर सामान्य लोकांचा फार विश्वास होता. दर पंचांगांत तें छापलें जाई. कोणी म्हणत इंग्रजांच्या पापांचीं शंभर वर्षें आणि त्यांच्या राज्याची शंभर वर्षें एकदमच भरणार ! हें भविष्य इंग्रजांच्या कानावरहि गेलें होतें. लोकांच्या मनावर या भविष्याचा परिणाम किती झाला होता याबद्दल मेडोज टेलर याने म्हटलें आहे कीं " यांत काडीचीहि अतिशयोक्ति मानण्याचें कारण नाहीं. मी ही गोष्ट स्वतः डोळ्यांनी पाहिलेली आहे !"

अशा रीतीनें एक प्रचंड कट हळूं हळूं नांवारूपाला येऊं लागला होता. शिपायांच्या बराकींत फकीर मौलवी नित्य येत त्यांनीं एका बराकींतल्या बातम्या

दुसरीकडे पोंचवून पांचपन्नास पलटणी बंडाला प्रवृत्त केल्या. या कटाची शपथ घ्यावयाची ती अन्नाला साक्ष ठेऊन हातांत भाकरी घेऊन घेत. त्याला 'चपाती' म्हणत. अशा या सांकेतिक चपात्या हातोहात व गांवोगांव इतक्या गुप्त रीतीनें व इतक्या जलद फिरत कीं त्या कोठून व कशा येत याचा पुढें कधीहि सरकारला सुगावा लागला नाहीं! कोठें अटक पेशावर, आणि कोठें गंगेच्या मुखाजवळचें कलकत्ता चंद्रनगर! तसेंच कोठें दिल्ली अंबाला, तर कोठें दक्षिणेंतील धारवाड विजापूर. पण इतक्या विस्तीर्ण टापूंत धागे पसरवून कटवाल्यांनीं जो बंडाचा बार उडविला त्याचें खरोखरच आश्चर्य वाटतें. आजच्या इतकीं दळणवळणाचीं साधनें त्याकाळीं सुलभ नव्हतीं!

# १

## चलो दिल्ली !

बंडाच्या सार्वत्रिक उठावणीची तारीख ३१ मे ठरली होती. इंग्रजांनी शिपायांच्या मागण्यांचा कांहीं सहानुभूतीनें विचार केला असता तर या गुप्त कटापर्यंत मजल गेली नसती. कारण त्यापूर्वी सहा महिने अगोदर, म्हणजे जानेवारीपासून शिपायांनीं आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याचे सर्व प्रयत्न सनदशीरपणानें व जाहीर रीतीनें चालविले होते. हेतु हा त्यांचे मागण्यांबद्दल सरकारला किंवा कोणालाहि विपर्यास करितां येऊं नये. पण अधिकाऱ्यांनीं त्याकडे दुर्लक्ष केले, तेव्हा मार्च महिन्यांत सत्याग्रहाचें पहिलें उदाहरण घडलें. कलकत्त्याजवळ बराकपूर येथें मंगलपांडे यानें धर्मयुद्धाच्या नांवानें पहिली गोळी उडविली व तो आनंदानें फांशी गेला ! मंगलपांडे हा सत्वशील व चारित्र्यवान् मनुष्य होता असें एकच वाक्य मॅलेसन यानें लिहिलें आहे ! बराकपूर नंतर बेहेरामपूर येथें शिपायांनीं सत्याग्रह करून काडतुसें घेण्याचें नाकारलें. बेहेरामपूर येथें मुर्शिदाबादचा पदच्युत नबाब राहात असे. एप्रिल महिन्यांत दिल्लीपासून वर अंबाला येथें थोडी गडबड होऊन कांहीं आगी लागल्या. पण अधिकाऱ्यांनीं त्याकडे दुर्लक्ष केलें. ता. ३ मे ला लखनौमध्यें पलटणींनी काडतुसें घेण्याचें नाकारलें. पण सर हेनरी लॉरेन्सने कडकपणें शिक्षा करून ती ठिणगी तात्पुरती दबविली. पुढें

पांचवें उदाहरण मीरतला घडलें व शिपायांनीं प्रत्यक्ष दिल्लीच ताब्यांत घेतली. यावरून या कटांतील मुख्य हालचाली मुसलमानांच्या होत्या आणि मुख्य कल्पना दिल्लीस बादशाही स्थापन करण्याची होती हें दिसून येईल. ता. १० मे रोजीं मीरत येथें ३४ व्या पलटणीनें काडतुसें घेण्याचें नाकारलें म्हणून अधिकाऱ्यांनीं ८५ लोकांना दहा वर्षें सक्तमजुरीची शिक्षा देऊन तुरुंगांत घातलें. त्यामुळें त्यांचे इतर सोबती इतके खवळून गेले कीं रात्रीं त्यांनीं बेधडक तुरुंग फोडले, आपल्या सोबत्यांची मुक्तता केली आणि तुरुंगांतील सर्व कैदी सोडून दिले. बाजारांतील लोकहि शिपायांस सामील झाले. मीरत येथें यावेळीं मॅगझीन व तोफखाना होता. पण हे लोक आश्चर्यमूढ झाल्यामुळे त्यांनीं बंडवाल्यांच्या अंगावर हात टाकला नाहीं. मीरतहून दिल्ली अवघी एक दिवसाच्या वाटेवर आहे, यामुळें रातोरात चालून यमुनेचा पूल ओलांडून शिपाई दिल्ली शहरांत शिरले. आणि एका दिवसांत त्यांनीं दिल्ली ताब्यांत घेतली. इंग्रजांचा दिल्लींत लष्करी बंदोबस्त फारसा नव्हताच. मॅगेझीन व खजिना शहरांत होना तेथें सारें एक पलटण होतें. एक राजवाड्यांत संरक्षणाकरितां होतें, आणि तिसरें शहरापासून दोन मैल लांब टेकडीवर कँटोन्मेंट येथें होतें. एवढीशी फौज दिल्ली शहराचें रक्षण कसें करणार! बंडवाले गांवांत येतांच इतर तमासगीर त्यांना मिळाले. मग त्यांनीं सरकारी खजिना व बँक लुटली, चर्च जाळलें, छापखान्याला आग लावली आणि इंग्रजांनां शोधून काढून त्यांच्या कत्तलीला प्रारंभ केला. इंग्रजांच्या तीन पलटणींत दोन नेटिव शिपायांच्या होत्या; त्या बंडवाल्यांनांच फितूर झाल्या. राहिलेल्या एका पलटणीचे हातून मॅगेझीनचें संरक्षण होणें अगदीं अशक्य होतें. या मॅगेझीनमध्यें तीनशें तोफा, वीस हजार लहान मोठीं हत्यारें, दोन लक्ष काडतुसें व तोफेचे गोळे इतके असून इतरहि युद्धोपयोगी सामान व मालमसाला पुष्कळ होता. एवढें मोठें मॅगेझीन शत्रूच्या हातीं जाणार असें पाहून कॅप्टन विलोबी यानें मोठ्या धैर्यानें स्वतः आपल्या हातानें त्या कोठारास बत्ती दिली. तेव्हां धरणीकंप व्हावा त्याप्रमाणें सारें दिल्ली शहर हादरून गेलें.

"The Magazine was situated between Selimghur fort and the Cashmere gate, so that the explosion shook the earth under the feet of Major Abbot's party. The Magazine contained three hundred guns and morters, 20,000

stand of small arms, 200,000 shot and shell and large stores of material of war corresponding with such munitions" ( Dr. Nolan's British Empire, P. 722 )

मीरतपासून दिल्ली सारी एका दिवसाच्या वाटेवर आहे. म्हणून कटवाल्यांनी केवळ यदृच्छेनें दिल्ली ताब्यांत घेतली असा अर्थ नाहीं. दिल्लीचें लष्करी व राजकीय महत्व कटाच्या पुढाऱ्यांना पूर्ण माहीत होते, म्हणून त्यांनीं जाणून बुजून, व आधीं पूर्ण योजना आंखूनच ही गोष्ट केली होती. दिल्ली ताब्यांत घेऊन बादशहाला गादीवर बसवावयाचें ही गोष्ट त्यांनी ठरवलीच होती. मग बादशहा 'होय' म्हणो किंवा 'नाही' म्हणो ! दिल्लीच्या शेवटच्या बादशहांमध्यें बाबर किंवा अकबराप्रमाणें स्वतःचा पराक्रम होता कोठे? शहाआलमप्रमाणें आज तो महादजी शिंद्याच्या हातून गादीवर बसणार; उद्या इंग्रजांच्या हातून बसणार मग परवां एक दिवस त्याला बंडवाल्या शिपायांनीं तख्तावर बसविलें तर हरकत कोणती ? बंडवाल्यांच्या राजकारणाच्या दृष्टीनें जर ती गोष्ट आवश्यक इतकेच नव्हे तर अपरिहार्य ठरते, तर ते ती सक्तीनें करणारच !

बंडवाल्यांनी दिल्ली घेतली हें कळतांच हिंदुस्थान सरकार खडबडून जागें झालें व सारें हिंदुस्थान चकित होऊन गेलें ! बंडवाल्यांची उगाच कांहींतरी निरर्थक स्तुति करावी असा आमचा हेतु नाहीं व तसें करण्याचें आम्हांस कारणहि नाहीं. पण तत्कालीन लष्करी महत्वाच्या दृष्टीनें कलकत्ता, अलाहाबाद, दिल्ली, आग्रा, कानपूर, लखनौ, अंबाला, फिरोजपूर ही नाक्याचीं ठिकाणें होतीं, असें इंग्रजांच्या लष्करी अधिकाऱ्यांनीच लिहून ठेविलेलें आहे. आणि हें सर्व लक्षांत घेऊन कटवाल्यांनी प्रथम दिल्ली हस्तगत केली या गोष्टीला ले. जनरल इन्नेस यानें—'Masterly Move' असें विशेषण लाविलें आहे. दिल्ली, अलाहाबाद, कानपूर इत्यादि कोणत्याहि ठिकाणीं इंग्रजांचा लष्करी बंदोबस्त नाहीं, कोठें शिपाई आहेत तर त्यांना लष्करी सामानसुमान किंवा बंदुका नाहींत, कोठें बंदुका आहेत तर वाहतुकीचीं साधनें नाहींत, अशा स्थितींत केवळ हिंदी लष्करावर विसंबणें घातक आहे ही गोष्ट सर हेनरी लॉरेन्स यानें बंडापूर्वी कंठशोष करून सांगितली होती. खुद्द दिल्लीबद्दल त्यानें १८४३ सालीं लिहिलें आहे कीं "अशा अव्यवस्थेच्या स्थितींत हुल्लड करून अवघ्या तीनशें लोकांनी दिल्लीचा कबजा घेतला तर, एका रात्रींत त्या तीनशेंचे तीन हजार होतील ! आणि हीच

स्थिती एक आठवडाभर टिकेल तर, दिल्लीतील प्रत्येक इसम हातांत तरवार घेऊनच बाहेर पडेल. आमच्या निष्काळजीपणामुळें दुर्दैवाने खरोखरच असें घडलें तर, प्लासी किंवा आसई या लढायांपेक्षांहि दिल्ली जिंकणे महा कठिण कर्म होऊन बसेल. आणि शंभर वर्षांत मिळविलेली सर्व कमाई नष्ट होऊन ब्रिटिश राज्याकरितां पुनः लढण्याची आमचेवर पाळी येईल!" लॉरेन्सचें हें भविष्य केवळ शब्दशःच नव्हे, तर अक्षरशः खरें झालें हें केवढें नवल? हिंदुस्थान सरकारजवळ असलेली फौज सर्व पंजाबांत आहे पण अंबाल्यापासून कलकत्यापर्यंत हजार मैलाच्या टापूंत बहुतेक रान मोकळे आहे हें लक्षांत घेऊनच बंडवाल्यांनीं हें धाडस केलें होतें. अंबाल्यापासून दिल्ली येथे मोठ्या मुष्किलीनें ३५०० लढाऊ माणसें पाठविण्याला कमांडर इन चीफ ॲनसन् याला तीन आठवडे लागले, यावरून इंग्रजांच्या शोचनीय लष्करी तयारीची कल्पना येईल!

शिपाई दिल्ली शहरांत शिरले तेव्हां रशियन किंवा पर्शियन लोक आले अशीच कांहींची कल्पना झाली. कारण कोणीतरी परकीय राष्ट्र हिंदुस्थानावर स्वारी करणार अशा शहरांत पुष्कळ दिवसपर्यंत वार्ता होत्या. (पण पुष्कळ जाणत्यांना तह झाल्याची माहिती होती.) दोन दिवसांनीं शिपाई राजवाड्यांत शिरले आणि त्यांनीं बादशहास आपला मनोदय कळविला तेव्हां, स्वतः न बोलतां, हकीम अहशमउल्लातर्फे बादशहानें त्यांना सांगितलें "तुम्हांला नोकरीवर ठेवायचें म्हणतां. पण तुम्हाला पगार द्यावयाला बादशहाच्या खजिन्यांत पैसे नाहींत!" यावर बंडवाल्यांनीं उत्तर केलें "हुजूर! शिर सलामत तो पगडी पचास. पैशाबद्दल बादशहाना एवढी फिकीर कसली? साऱ्या हिंदुस्थानचा वसूल तुमचे पायाशीं आणून दाखवितो. त्यांतूनच आमचा पगार नंतर आम्ही घेऊं म्हणजे झालें!" तेव्हां बादशहाला समजून चुकलें कीं हें आतां अवघड जागीं दुखणें आलें!

ता. ११ रोजीं बंडवाले दिल्लींत आले तेथपासून तीन आठवडे दिल्लीत नुसती बजबजपुरी माजून राहिली होती. शिपाई लुटालूट करीत म्हणून दुकानें बंद होत. यामुळें नित्याचा व्यापार उदीम चालण्यालाहि पंचाईत झाली. कित्येकांनीं स्वतःच्या रक्षणाकरितां खाजगी पोलीस नेमले. कित्येक अब्रूदार माणसांना राजवाड्यांत नेऊन शिपाई त्यांचे पैशाकरितां हाल करीत. ता. १६ मे रोजीं कांहीं इंग्रज स्त्रिया व अर्भकें राजवाड्यांत प्राणरक्षणाकरितां येऊन लपलीं होती.

बादशहाचे देखत त्या सर्वांची बंडवाल्यांनीं कत्तल केली, ती पाहून बादशहास फारच वाईट वाटलें. अनेक लोक रोज बंड पुकारून दिल्लीस येत. याप्रमाणें राजपूर, नसिराबाद, झांशी, फिरोजपूर, अंबाला, बरेली येथून शिपाई आले त्यांची संख्या जून अखेर साडेआठ हजार होती. इतक्या लोकांत शिस्त एकदम निर्माण करणें कठीण होतें. त्यांना खावयास मिळालें नाहीं कीं ते खुशाल शहरांत लूट करीत. बादशहाची सगळ्या वर्षाची तैनात सारी बारा लाख होती. ती इतक्यांना किती पुरी पडणार ? आणि सावकार लोक त्याला कर्ज तरी किती देणार ? यामुळें दररोज कटकटी होत. शहरांत धारण महाग झाली. व पैसे देऊनहि आटा मिळेना. गिरीधारी लाल व गिरधिरसिंग या सावकारांनीं गिनतवारीनें अडीच लक्ष रुपये खजिन्यांत आणून भरले. रामजीमल्ल आणि जितमल्ल या सावकारांना पांच लाख रुपये कर्ज म्हणून देण्याचा हुकूम झाला. तेव्हां रामजीमल्ल यानें आपलें पागोटें काढून बादशहापुढें ठेवलें आणि 'आतां आपणाजवळ कपर्दिकाहि शिल्लक नाहीं' असें सांगितलें! पण सैन्याचा दररोजचा खर्च चाललाच पाहिजे. इंग्रजांशीं युद्ध करावयाचें त्याच्या तयारीकरितां खर्च होई तो वेगळाच. पुढें तर हा खर्च दरमहा पांच लाखांवर गेला! एके दिवशीं लष्कराच्या तलबेकरितां शिपायांनीं दिल्ली शहर लुटण्याची धमकी घातली. तेव्हां बादशहाने स्वतःचे व झिनत महाल बेगम हिच्या अंगावरचे दागिने उतरून दिले!

बादशहाचीहि अशी चमत्कारिक स्थिति झाली होती कीं, ज्या 'बादशहा' या पदवीकरितां त्यानें आजवर निग्रहानें कंपनीसरकारशीं हजारों लाखों रुपये खर्च करून भांडण चालविलें होतें, तो राजयोग त्याच्या ८२ व्या वर्षी फळाला आला! आणि तोहि असा की त्यांत 'नाहीं' किंवा 'होय' कांहींच म्हणण्याची सोय नव्हती! 'मी बादशहा नाहीं, मला हें पद नको' असें त्याला म्हणतां येत नव्हतें! कारण बादशहाच्या कुळांत तो जन्मालाच आला होता; कंपनीसरकार विरुद्ध 'बादशहा' या पदवीच्या अभिमानाकरितां त्याने आजवर निग्रहाने भांडण चालविलें होतें. कंपनीसरकार जें देत नव्हतें तें हे शिपाई लोक त्याला तत्काळ देत होते; नव्हे सक्तीने त्याच्यावर लादीत होते! मग त्याच्या 'नाहीं' म्हणण्याचा उपयोग काय ? पण 'होय' म्हणून तरी शेवट काय लागणार ? शेवट इतकाच कीं, या बंडखोरांबरोबर किंबहुना त्यांचा पुढारी म्हणून चार दिवस त्यांच्या आधींच, दिल्लीच्या रस्त्यांत इंग्रज सरकार आपणांला फांशी देणार! बंडवाल्यांना आपण सामील होतो किंवा

नव्हतो या दोन्ही म्हणण्याचा आता कांहीं एक उपयोग नाहीं. कोण ही आपत्ति? शांततेच्या काळींहि जर इंग्रजांना बादशाही बुडवावयाची होती, तर दिल्लींत बंड झालें या गोष्टीचा आपणाविरुद्ध उपयोग करण्याला इंग्रज कसे चुकतील? बादशाही बुडविल्याखेरीज इंग्रज आतां रहात नाहींत. तात्पर्य, आपल्या मनात असो वा नसो, बंडवाल्यांच्या पक्षाला आता आपणाला मदत केलीच पाहिजे. मग त्याबरोबर युद्धकर्ज काढणें, युद्धसाहित्य जमा करून दारूगोळ्याचे कारखाने घालणें, दररोज दरबार भरविणें, राजेरजवाड्यांना फर्माने काढणें, इंग्रजांशीं लढाई करणें, आणि सरतेशेवटी फांशी जाणें, या सर्व गोष्टी आल्या!! आपले तरी या जगांत दिवस असे उरले किती? सर्व उपाधी व बंधनें यांच्या पलीकडे असलेला मनुष्याचा आत्मा म्हणजे 'बादशहा' च नव्हे काय? मग बंडवाल्यांनीहि मला बादशहा म्हटलें तर त्यांत इतकें गैर काय? तात्पर्य, ज्या गोष्टी आपल्या हातांत नाहींत त्याबद्दल व्यर्थ चिंता न करितां, आतां जें जें होईल तें होऊं द्यावयाचें; मग त्यांत आपण तरी बुडो अगर फांशी जावो, असा विचार त्या दुर्दैवी बादशहाने मनाशीं केला!

# १०

## पेशावरच्या रक्षणाची विवंचना

मे महिना अखेर बंडाला तीन आठवडे होऊन गेले तरी इंग्रजसरकारला दिल्ली परत घेतां आली नाही. यामुळे साऱ्या हिंदुस्थानांत इंग्रजांची इभ्रत धुळीला मिळाली आणि बंडवाल्यांना चेव येऊन ठिकठिकाणीं सुरूंग उडूं लागले. ३१ मे ही तर सार्वत्रिक बंडाची तारीख ठरली होती. पाऊल टाकावें तेथें सुरूंग आहे असें इंग्रजांना वाटूं लागलें, आणि कोठल्याहि देशी फौजेची त्यांना हमखास खात्री किंवा विश्वास वाटेना. जी पलटण पाहावी ती फितूर होऊं लागली हें पाहून या साऱ्या सैन्याचें होणार तरी काय? असें भय व चिंता त्यांना उत्पन्न झाली. फ्रेंड रॉबर्टस् यानें घरीं पाठविलेलीं पुढील दोन पत्रें मासल्याकरितां पाहा:–

26th May 1857, Jhelum.

"Up till the present time, the following corps have mutinied more or less;–5th, 9th, 11th, 16th, 19th, 20th, 24th, 26th, 27th, 34th, 36th, 38th, 45th, 51st, 54th, 55th, 57th, 60th, 61st, 64th, and Cavalry 3rd, 5th, 8th. Disbanding most of these when the work is over will be a good

thing, and forming European regiment in their places. I am glad no Artillery have behaved badly as yet. although almost all the Sappers have."

11th June 1857, —Camp Amritsar,

"You would scarcely believe how paralysing every thing is. A letter from Calcutta is considered an extraordinary affair, and every day we hear fresh regiments mutinying. I think 35 are gone altogether, besides some 30 more who have been disarmed and are ready to go. Perfectly ridiculous, an Army going to pieces in this way! ..."

हेन्री लॉरेन्स याचा भाऊ जॉन लॉरेन्स त्यावेळीं पंजाबांत होता. पंजाबचीच खात्री वाटेना, तेव्हां त्यानें कॅनिंगला तत्काळ लिहिलें कीं, पेशावर प्रांत आपण सोडून देऊन दोस्त महंमद याचा त्याला परत द्यावा! आणि सिंधुनद हीच सरहद्द समजावी. यामुळें परचक्राची तरी भीति नाहीशी होईल! इंग्रजांचें सुदैव म्हणून या सूचनेचा उपयोग करण्याचें कारण पडलें नाहीं. पण पेशावर प्रांताबाबत बंडवाल्यांनीहि आपलें एक सूत्र दोस्त महंमदाकडे ठेवून इंग्रजसरकारचें वर्म बरोबर हेरलें होतें यांत शंका नाहीं. पेशावर प्रांत दोस्त महंमदाला सोडून द्यावा कीं देऊं नये याबद्दल जॉन लॉरेन्स व त्याचे सहकारी कर्नल एडवर्ड्स, निकलसन् व जनरल कॉटन यांच्यामध्यें अगदीं वर्दळीवर येण्याइतका मतभेद झाला! इंग्लंडहून कलकत्त्यास गोरी फौज ऑक्टोबरपर्यंत येत नाहीं, आणि दिल्लीला मदत पोंचण्यास डिसेंबर उजाडणार यापेक्षां, यावेळीं पेशावर प्रांत अडकावून ठेवण्याकरितां गुंतलेली फौज मोकळी केली तर दिल्ली एका महिन्यांत हस्तगत करिता येईल. दिल्ली पुढें सरहद्दी पलीकडच्या पेशावरची मातब्बरी काय? यापेक्षां पेशावर दोस्त महंमदाला दिलें तर तो खूष होऊन यावेळीं आपणांशीं खरी दोस्ती करील!'

पण याविरुद्ध एडवर्ड्स व निकलसन् यांचें मत असें होतें कीं, पेशावर प्रांतच काय पण एक तसूभर देखील जागा यावेळीं आपण अफगाण लोकांनां परत देऊं नये. दिल्लीच्या बादशाहीची वार्ता काबूलला पोंचल्याशिवाय थोडीच राहिली असेल? पेशावर प्रांत परत देतांनां आपण मैत्रीचा व साळसूदपणाचा कितीहि आव

आणला तरी, आपला मनांतून धीर खचून गेला आहे हें दोस्त महंमदाच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. जो प्रांत मिळविण्या करितां खैबर घाटांत हजारों इंग्रजांचें रक्त सांडलें, तो आपण सुखासुखी सोडणार यावर विश्वास कोण ठेवणार ? काबूलच्या कत्तलीची आठवण ठेऊन, पेशावर सोडून आपण खैबर घाटांतून परत येतांना, हे आफ्रिडी बलुची व अफगाण लोक आपणांवर शस्त्र धरून उलटल्याशिवाय राहणार नाहींत. आपणाला मिळण्यापेक्षां शत्रूला मिळण्यांत दोस्त महंमदाचा केव्हांहि अधिक फायदा आहे. गंगासागरा जवळचें कलकत्ता बंदर आणि खैबर घाटाच्या तोंडावरचें पेशावर हीं जोंपर्यंत आपल्या मुठींत आपण बळकट धरून ठेवलीं आहेत, तोपर्यंत आपल्या इभ्रतीला किंवा साम्राज्यसत्तेला काडीमात्र धोका नाहीं. मग मध्य हिंदुस्थानांतला बंडावा कितीहि काळ चालला तरी तो घरांतील तंटा आहे ! केव्हां तरी तोहि आपण सवडीनें मिटवूं शकूं.

लॉरेन्सला हें पटत नसे. तो म्हणे, दिल्ली हें आपलें नाक आहे. तेंच शत्रूनें चिरलें असता जर आपण सहासहा महिने स्वस्थ राहिलों, तर त्याचा साऱ्या हिंदुस्थानांत काय परिणाम होईल ? दिल्ली सर करितां येत नाहीं असें समजून जर नामुष्कीनें जनरल बर्नार्ड दिल्लीचा वेढा उठवून उद्यां चालता झाला, तर पंजाब तरी आपल्या हातीं कसा राहील ? आणि हिंदुस्थान तरी मग कसचा राहणार ? पंजाबची फौज आणि लोकहि आपणांविरुद्ध उठतील. आणि मग हेंहि जाईल आणि तेंहि जाईल."

एकीकडे अटक पेशावर आणि दुसरीकडे नेपाळ येथपर्यंत बंडवाल्यांनीं कारस्थानाचे हात कसे पोचविले होते हें दर्शविण्याकरितां डिग्वी यांच्या पुस्तकांतील उत्तारा देतो. न जाणों ' कदाचित ' जंगबहादुर यानें कटवाल्यांची बाजू घेतलीहि असती. कारण नेपाळचें युद्ध झाल्याला फार दिवस लोटले नव्हते ! पण इंग्रजांचें नशीब म्हणून तसें घडलें नाहीं.

" Colonel Ramsey, Resident of Nepal, in a letter to Sir John Login, expresses a belief that Jung Bahadur would have taken part against the Indian Government, if it had not been for what the Resident calls ' the providential visit of his to England and his experiences here. '

" Strong pressure was brought to bear upon Jung Bahadur to side with the rebels. ' One of his brothers

told me ' says Colonel Ramsay 'that every attempt was being made by influential men to induce him to join them in driving us out of the country, but that no persuasion would induce him to commit such an act of suicidal folly.' These attempts were renewed when the Nepalese General was in British India fighting Briton's battles. Against all such solicitation he stood firm."

( P. 41. 'Friendship forgotten'-By William Digby)

पंजाब प्रांताबद्दल जितकी भीति वाटत होती तितकी पुढें खरी ठरली नाहीं; आणि लाहोर, अमृतसर, पेशावर येथले दंगे लवकर आवरले. पण फिरोजपूर व जालंदर या पंजाबच्या दक्षिण सरहद्दीवरील फौजा मात्र दिल्लीला बंड पुकारून चालल्या झाल्या. फिलोर येथे इंग्रजांचे फार मोठे मॅगेझीन व शस्त्रास्त्रांचा सांठा होता. बंडवाल्यांच्या तोहि हातीं पडता म्हणजे पंजाबची सर्व मदत आटोपलीच होती! पंजाबहून दिल्लीकडे होणाऱ्या वाहतुकीचे मार्गावरील अंबाला हें नाकें मात्र इंग्रजांच्या हाती होतें व तेथून एकीकडे दिल्लीला शह देण्यासारखा होता व दुसरीकडे पंजाबशी दळणवळण ठेवून सैन्य आणतां येत होतें. भोपाळ, पतियाळा, झिंद, काश्मीर यांची मदत प्रथमपासून इंग्रजांना होती. पण दिल्लीजवळच्या ग्वालेर व इंदूरची खात्री नव्हती. इंदूर व ग्वालेर हे संस्थानिक नांवाला इंग्रजांकडे होते, पण त्यांची फौज बंडवाल्यांचे बाजूस होती. इंदूर येथें बंड झालें, तसेंच ता. १४ जून रोजीं ग्वालेर येथेंहि होऊन तेथील सर्व इंग्रज आग्र्याला पळून गेले. ग्वालेर मध्यें वीस हजार कंटिजंट फौज उत्तम कवाईत शिकलेली होती. "आम्हाला आग्र्यावर इंग्रजांशीं लढण्याकरितां घेऊन चला" असें त्यांनी जयाजीराव शिंदे यांचें मागें टुमणें लावलें होतें. पण जयाजीराव व त्यांचे दिवाण दिनकरराव यांनीं नाना युक्त्यांनीं व चातुर्यानें त्यांना वागवून, फुसलावून, पैसा बक्षीस देऊन, तुम्हाला आजच इंग्रजांवर नेण्यांत अडचणी आहेत अशा कांहींतरी वेळीं सुचतील त्या सबबी सांगून, कसेंतरी त्यांना ग्वालेरासच राहतें केलें. महू व होळकराच्या मुलखांतली बंडवाली फौज ग्वालेरच्या राज्यांतून जाऊं लागली तेव्हांहि त्यांनीं या फौजेला त्याच्यांत सामील होऊं दिलें नाहीं, "शिपायांच्या विनवणीला जर शिंदा त्यावेळीं मान्यता देता तर इंग्रजी सत्ता बुडण्याचा मोठाच धोका उत्पन्न झाला होता" असें कर्नल मॅलेसन यानें 'नेटिव्ह स्टेट्स' या पुस्तकांत म्हटलें आहे.

लखनौचा बंडावा बरोबर ता. ३१ मे ला सुरू झाला, तो सर्व अयोध्या व रोहिलखंडांत पसरला. लखनौनंतर चारच दिवसांत कानपूरला बंड सुरू झालें. आणि या दोन्ही ठिकाणच्या इंग्रजी फौजा वेढा घालून बंडवाल्यांनीं अडकावून ठेवल्या, इतकेंच नव्हे तर, कलकत्ता अलाहाबाद येथून वर दिल्लीकडे जी इंग्रजी फौज जाऊं शकणार होती तिचाहि मार्ग रोखून धरला. इंग्रजांच्या वाटा अडवून धरण्यांत जर त्यांनीं यावेळीं कामगिरी बजावली नसती तर, दिल्लीचा टिकाव पुढें चार महिने लागणें केवळ दुरापास्त होतें !

# ११

## नानासाहेब बंडास कसे मिळाले ?

कानपूरला सर्व मे महिना अस्वस्थतेचा गेला आणि जूनमध्यें बंड सुरू झालें. कानपूरचा कलेक्टर हिलर्डसन् याचा व नानासाहेब यांचा चांगला स्नेह होता, म्हणून कलेक्टरनें खजिना व मॅगेझीन यांचें संरक्षण करण्याकरितां शिपाई घेऊन नानासाहेब यांस बोलावलें. पण याच वेळेला सर हेनरी लॉरेन्स व गुबीन्स या दोघांनीं लखनौहून कानपुरास जनरल व्हीलर यास पत्र पाठविलें होतें कीं, " नानासाहेब बिथरलेले दिसतात; त्यांचेवर विश्वास ठेवूं नका. " पण हें पत्र व्हीलरला मिळण्यापूर्वीच नानासाहेब शहरांत येऊन खजिन्यावर त्यांनीं स्वतःचे संत्रीहि संरक्षणाकरितां नेमलेले होते !

इंग्रजावर असें कांहींतरी अरिष्ट ओढवणार याची नानासाहेबांस पूर्ण कल्पना होती असें दिसतें. कारण १८५६ सालीं अयोध्येचें राज्य खालसा झालें तेव्हां नानासाहेबांचेजवळ ५० लक्ष रुपयांच्या सरकारी प्रॉमिसरी नोटा होत्या; १८५६ ते ५७ दरम्यान त्यांनीं ४७ लक्ष रुपयांच्या नोटा विकून टाकून आपले

पैसे दुसरीकडे गुंतविले. व प्रत्यक्ष बंडाच्या वेळीं फक्त त्यांचे हातीं तीन लक्ष रुपयेच सरकारी रोख्यांत गुंतलेले होते. बंडाच्या वेळीं किंवा युद्धाच्या काळीं कोणी कितीहि राजनिष्ठ असला तरी, स्वतःच्या पैशाबद्दल सावधगिरीनेंच वागतो !

" Nana saheb at the date of the annexation of Oudh, had £ 500000 in the Company's funds. He had from that time been selling out gradually until but £ 30,000 stood in his name when he attacked the entrenchment at Cawnpore "

Topics for Indian Statesmen, P. 34–Norton,

ता. ४ जून रोजीं घोडदळ पलटणीचे शिपाई बंड करण्यास अधीर झाले व त्यांनीं बंड पुकारलें. पण पैसा व दारुगोळा यांशिवाय बंडवाले तरी काय करणार ? व त्यावर तर कलेक्टरनें खुद्द नानासाहेबांचीच योजना केली होती. नानासाहेब हे त्यावेळेपूर्वी इंग्रजांचे ' मित्र ' असले तरी, ती मैत्री आता खरोखर किती राहिली होती हें अजीमुल्लातर्फे कटवाल्या पुढाऱ्यांस पूर्ण कळलें होतें. यामुळे बंड पुकारल्या-नंतर टिकासिंग वगैरे पुढारी यांनी नवाबगंजांत येऊन नानासाहेबांची मुलाखत घेतली. त्यांनीं नानांना सांगितलें कीं " आता आम्हाला उघडपणें मिळण्यावाचून तुम्हाला गत्यंतर नाहीं. खजिना व दारुगोळा याशिवाय आम्ही काय करणार ? आम्हाला मिळत असाल तर पेशवेपद व पुढारीपण तुमचें आहे. पण खजिन्याचें व मॅगेझीनचें रक्षण करून तुम्ही इंग्रजांचे वतीनें आमच्याशीं लढणार असाल, तर आतांच ही तलवार तुमच्या मानेवर ठेवली आहे असें समजा ! " यानंतर बरीच वाटाघाट होऊन पुनः एकदां गुप्त रीतीने गंगेच्या घाटांवर नावेमध्यें कटवाल्यांची व नानासाहेबांची मुलाखत झाली. अखेर नानासाहेबांनी त्यांना स्पष्ट अभिवचन दिलें की " मी शिपायांचे म्हणण्याबाहेर नाहीं. जर इतके लोक धर्माकरितां मरून जाण्यास तयार आहेत, तर मीहि आपल्या बायकामुलांवर पाणी सोडतो ! यास गंगा मातुश्री साक्ष आहे. !!

At length, Teeka Singh had the honour of an interview with the Nana himself, during which, according to the story current among his comrades, the

Subhedar spoke to this effect " You have come to take charge of the Magazine and the treasury of the English ; We all Hindus and Mahomedans, have united for our religions, and the whole Bengal army has become one in purpose. What do you say to this ?" The Nana replied, " I also am at the disposal of the army. "

Cawnpore–By Trevelyan–P. 83

When the Mutineers had arrived in the Nabubgunje they were given to undetstand that the Nana was in the neighbourhood. Accordingly he was waited on by a deputation of the native officers and the troopers who addressed him in these words : ' Maharaja, a kingdom awaits you if you join our enterprise, but death if you side with our enemies." The ready reply was, " What have I to do with the British ? I am altogether yours."

Cawnpore -- P. 97.By Sir George Trevelyan

वरसईकरांचे मतें हा प्रसंग ब्रह्मावर्ताचे घाटावर घडला. कारण हजर असलेल्य मंडळींत रामचंद्रशास्त्री साठे यांचेंहि नांव त्यानें घेतलें आहे. (वरसईकराची बखर पृ. २६ पाहा ) पण तपशिलाचा हा किरकोळ फरक सोडला तरी तात्पर्य बदलत नाहीं. असो.

यानंतर कानपुरांत दिवसभर लुटालूट व जाळपोळ करून ता. ६ रोजीं शिपाई रात्रीं दिल्लीस जाण्याकरितां निघाले. तेव्हां व्हीलर साहेबाला अरिष्ट टळलें असें वाटलें ! कारण सर्व इंग्रज बायकामुलांनां घेऊन त्यानें कँटोनमेंट मधील छावणीचा आश्रय केला होता. इकडे बंडवाल्यांचा दिल्लीस जाण्याचा बेत कल्याणपुरच्या पहिल्याच मुक्कामावर बदलला, कारण नानासाहेबांनी दिल्लीस जाण्याचें नाकारलें ! तेव्हा त्या सर्व सैन्याने परत येऊन सकाळीं व्हीलरच्या छावणीला वेढा घातला.

कानपुरास परत फिरण्याची सल्ला अजीमुल्लाची होती ती फार शहाणपणाची होती. सर्वांनीच दिल्लीस जाऊन करावयाचें काय ? आणि तेथें नानासाहेबांस विचारणार

कोण ? इंग्रज जळीं स्थळीं दिल्लींत तसाच कानपुरांतहि आहेच. उलट कानपुर हें प्रमुख नाकें आहे; तें अडविलें तर कलकत्ता अलाहाबादेकडून वर दिल्लीस जाणाऱ्या इंग्रजी फौजेला वाटेंत अटकाव करितां येईल, आणि पुढारीपण आपणांकडे राहून दिल्लीच्या मुसलमानांवरहि छाप राहील. नानासाहेबांना ही सल्ला मानवली, आणि ता. ७ जूनला सकाळीं त्यांनीं व्हीलर साहेबाला पत्र पाठवून आपण छावणीवर हल्ला करणार असल्याचें कळविलें. याचा उघड अर्थ असा कीं, पूर्वीची मैत्री किंवा विश्वास संपला याचीच ती उघड नोटीस होती !

हें पत्र व्हीलरच्या हातांत पडलें तेव्हां समोर बॉंबगोळा येऊन पडावा इतकें त्याला आश्चर्य वाटलें. संकटांत नानांवर विश्वास टाकून त्यांनीं सर्व खजिना व व दारूगोळा रक्षणाकरितां त्याचे हवाली केला होता. तोच नाना आतां शत्रूला जाऊन मिळाला ! केवढा हा विश्वासघात ! म्हणून या अपराधाबद्दल इंग्रजांनी नानांना पुढें कधींहि क्षमा केली नाही. इंग्रजांचे एकवेळ असो, पण कोणीहि कोणावर विश्वास टाकला व तो त्याने पत्करला तर, नंतर तो मोडणें हें सौजन्य किंवा पुढारीपण यांना तरी कसें शोभतें ? असा साहजिक विचार कोणाला सुचेल. पण त्यावर असें म्हणता येते कीं, दोन लाख फौजेने बंड केलें त्यापेक्षां नानासाहेबांचा गुन्हा अधिक नव्हता. पक्ष बदलण्याचा कोणासहि हक्कच आहे. इंग्रजांनीं तरी नानावर असा काय उपकार केला होता ? नानासाहेबांचे बद्दल इंग्रजांची अपेक्षा होती ती फसली, व त्यामुळें त्यांची फार निराशा झाली हें खरें; पण व्यवहारांत कोणालाहि दुसऱ्यास नोटीस देऊन पूर्वीचे व्यवहार बाद करतां येतात व हें करण्याचें नानासाहेबांचे मनांत नसतें तर, त्यांना ता. ७ रोजीं 'नोटीस' देण्याचें काय कारण होतें ? आणि तशी लेखी नोटीस इंग्रजांना दिल्यावर, नानांनीं 'विश्वासघात' केला असें म्हणण्याला इंग्रजांना तरी काय हक्क होता ?

दुसरीहि एक अगदीं अप्रसिद्ध अशी माहिती आम्ही सांगतों त्यावरून नानासाहेबांच्या वागणुकीवर पुष्कळ प्रकाश पडण्यासारखा आहे. नानासाहेबांनी विश्वासघात केला इतकेंच इंग्रज बोलतात; पण बंडाचे पूर्वी अवघ्या दोन महिन्यांत तुम्ही त्याची काय कुरापत काढली होती हें मात्र इंग्रज सांगत नाहींत ! टाळी कधीं तरी एकाच हाताने वाजते काय ? एरवी तुम्हाला मेजवान्या व खाने देणारा हा नाना

एकाच दिवसांत फितूर किंवा विश्वासघातकी झाला हें संभवतें तरी कसें ? यांत कांहींतरी लपविलेल्या माहितीचा उघडच संशय येतो. व ही माहिती अशी कीं सन १८५७ च्या एप्रिल महिन्यांत बाजीरावाच्या कोणा चिमणाआप्पा नामक एका भाच्याने नानासाहेबावर, दत्तकाचे सबबीवर मिळकतीच्या अर्ध्या वांटणीचा ताबा मिळण्याकरितां दावा आणला होता. चिमणा अज्ञान १८ वर्षांचे आंतील होता व त्याचें पालक अर्थात् सरकार होतें. म्हणून सरकारनेंच स्वतः हा दावा नानासाहेबांवर लावला होता ! एरवीं दिवाणी दाव्यांत अज्ञानांतर्फे पक्षकार होण्यास कोणीहि लांबचा नातेवाईक मित्र किंवा वाटेचा वाटसरूहि चालतो. म्हणून सरकारनेच मुद्दाम स्वतः पक्षकार म्हणून उभें राहण्याची उठाठेव करण्याचें खरोखर कांहीं कारण नव्हतें. अज्ञान पक्षकार वयांत आल्यानंतर त्यानें कायतें बघून घेतलें असतें. पण पालकत्वाचे नांवाखालीं सरकारची अपहार बुद्धि होती म्हणून दाव्याचें हें सर्व सोंग होतें. सरकारनें भोंसला फंड पूर्वी गडप केला, काशीस अमृतराव पेशव्यांनीं देवळास दिलेल्या वर्षासन रकमेबद्दल असेंच वर्तन केलें तर सरकारचा हेतु शहाजोग आहे असें नानासाहेबांना कसें वाटावें ? बाजीरावाचें पेनशन सरकारनें बुडविलेंच होतें व शिलकी मिळकतीवर कसातरी कष्टानें त्यांचा योगक्षेम चालला होता. त्यांतच हा वांटणीचा दावा सरकारने आणला. याचा अर्थ, नानासाहेबांची मान साफ चिरण्याचें सरकारनें ठरविलें होतें असा त्यानें कां करूं नये ? सरकारनें हा जो निष्कारण 'धंदा' केला त्यामुळे नानासाहेबांच्या मनांत सूडबुद्धि जागृत झाली असावी; आणि त्यांना विशेष चीड येण्याचें कारण म्हणजे, ज्या पेशवे घराण्यांतील स्त्रियांनी इंग्रजी कोर्टांत कधीं पाऊल घातलें नव्हतें, त्यांना सरकारने समन्सें काढून दाव्यांत हजर राहण्यास फर्माविलें होतें ! !

या दिवाणी दाव्याचा फक्त मार्टिनने आपल्या इतिहासांत नुसता उल्लेख केला आहे. आणि सरकारने हा पुरावा प्रसिद्ध न करिता दाबून ठेवला अशी तक्रार केली आहे. या दाव्यासंबंधी कच्ची तोंडी माहिती नानासाहेबांचे वारसांकडून मिळाली. पण सरकारी दप्तरांत या दाव्याचे कागद जर अद्यापि कोठें उपलब्ध होतील तर या विषयावर पुष्कळ प्रकाश पडेल.

" The Nana had been involved in several unsuccessful law-suits; For the younger **adopted son** of the Peshwa, Nana's nephew being a minor, the English law-courts had stepped in as trustees for his interests. A

full and authentic statement of the case of the Peshwa family ought ere now to have been published by the Govt."

Martin's History of India P. 249

बंडांतील सर्व व्यक्तीमध्यें प्रमुख नायक अशा नानासाहेबाच्या हेतूबद्दलच अत्यंत वाद असल्यामुळें, मुद्याच्या कांहीं उलटसुलट गोष्टी आम्ही सांगितल्या. त्यावरून वाचकांनी स्वतःचें हवें तें मत बनवावें. आणि दुसरें असें कीं हॅम्लेटशिवाय हें 'विकार–विकसित' उलगडावयाचें तरी कसें ? असो.

नानासाहेब बंडास मिळाल्यामुळे सरकारीं खजिन्यांतील अडीच लक्ष रुपये व सर्व दारुगोळा बंडवाल्यांना मिळाला. व्हीलर साहेबाने मोठ्या शर्थीने व शौर्याने बावीस दिवस वेढा लढविला, पण स्त्रिया व अर्भकें यांची अवघड जबाबदारी असल्यामुळे मोठ्या नाईलाजाने त्याने तहाचें निशाण उभारलें, व नानासाहेबांना एक लक्ष रुपये देऊं केले. तेव्हां नानासाहेबांनीं त्यांना प्रयागास नावेंत बसून जाण्याची परवानगी दिली. पण काय असेल तें असो, हॅवेलॉक रेनॉड व नील यांनीं फत्तेपुर व अलाहाबाद येथें केलेल्या अनन्वित अत्याचारामुळें शिपाई अतिशय चिडले होते असें दिसतें. त्यानी नानासाहेबांचा शब्द मोडून नावांना आगी लावल्या व पुष्कळांची कत्तल केली.

सर जॉर्ज कॅंबेल यांचे पुस्तकांतील पुढील उतारा मनन करण्यासारखा आहे. कॅंबेल हे लॉर्ड कॅनिंगच्या वरिष्ठ कार्यकारी मंडळांतील जबाबदार अधिकारी होतेः—

"It is difficult to say anything in extenuation of the Cawnpur massacre and the terrible scene at the well, and yet we must remember two things., First, that it was done not in cold blood, but *in a moment of rage and dispair* when Havelock had beaten the rebels and was coming in; and secondly that we had done much to provoke these things by the severities of which our people were guilty as they advanced. At the later time a careful investigation was made into the circumstances of the massacre and we failed to discover that there was any premeditation or direction in the matter. It was doubt-

ful whether, if the Nana had been captured, the guilt of directing the massacre could have been brought home to him." ( Sir George Cambell's Memoirs ) Page 281.

इंग्रजांचे जवळ नावेंतून जातांना साडेतीन लाख रुपये होते असें नील यानें कॅनिंग याला लिहिलेल्या पत्रांत आहे. हे रुपये गमवावे असेंहि बंडवाल्यांना कदाचित् वाटत नसावें. घाटावर कत्तल सुरू झाली हें कळताच नानासाहेबांनी हुकूम पाठवून ती थांबविली आणि राहिलेल्या कैद्यांना परत आणून बिबीघरांत कोंडून ठेवले. पुढें कानपूर जाण्याचा प्रसंग येऊन बिचाऱ्या याहि कैद्यांची कत्तल झाली. पण ती हकीगत पुढें सांगू.

## १२

# वणवा पसरत चालला

लखनौस इंग्रजांना पडलेला वेढा कानपूरपेक्षा फार मोठा होता. कारण तेथें तीन हजार इंग्रजांना तीस हजार लोकांनी वेढा दिला असून, सतत चार महिने त्यांची अगदी नाकेबंदी करून टाकली होती. कोठूनहि त्यांना मदत येण्याची आशा नव्हती. मच्छीभवन व रेसीडेन्सी यांत इंग्रजांचा दोन लक्ष पौंड खजिना सर हेनरी लॉरेन्स याने बंदोबस्ताने ठेवलेला असल्यामुळे पहिल्या दिवसापासूनच वेढयाला जोर होता. या वेढयांत लखनौची बेगम जातीने शिपायांना प्रोत्साहन देत होती. कानपूरनंतर दोनच दिवसांनी झांशी येथे बंड झालें तेव्हा महाराणी लक्ष्मीबाईने फार शहाणपणाचें वर्तन केलें; बंडाचे आदले दिवशीं गार्डन साहेबाने येऊन राज्याचें दप्तर स्वाधीन केलें व इंग्रज स्त्रीपुरुषांचें संरक्षण करण्याची विनंति केली. तेव्हा ही जबाबदारी तिने घेतलीच नाहीं. ती म्हणाली, मी बायकोमनुष्य, मी तुमचें संरक्षण कसें करणार? ज्याचा त्यानेच संरक्षणाचा मार्ग पहावा. पूर्वी मी राज्य मागत असतां तुम्ही दिलें नाही, आतां तुमच्या जवळ तें राहणार नाही म्हणून मला देतां काय?" यावर निरुत्तर होऊन गॉर्डन साहेब निघून गेला. दुसरे दिवशीं बंड होऊन सर्व

इंग्रजांची कत्तल झाली. बंडवाल्यांनी लक्ष्मीबाईस मुजरा करून तिच्याकडून दोन लक्ष रुपये घेऊन दिल्लीस प्रयाण केलें. तेव्हां आयतें हातीं आलेलें राज्य घेऊन तिनें तें खुशाल दहा महिने निर्वेधपणानें चालविलें. कत्तलीशीं तिचा संबंध नव्हता. त्यांत मुसलमान प्रमुख असून ती कत्तल जेल दरोग्याने केली. तिने बंडवाल्यांशी संबंध ठेवला नाही; तसेंच नानासाहेबाप्रमाणें इंग्रजांचे रक्षण करण्यास जाण्याची जबाबदारीहि पत्करली नाही !! राज्य ताब्यांत येतांच 'खुलुक खुदाका, मुलुख बादशहाका, अंमल लक्ष्मीबाईका' अशी द्वाही तिने फिरविलीं. पण सावधगिरीची एक गोष्ट मात्र तिने केली. झांशीला बंड झाल्याची सर्व हकीगत मार्टिन याचेतर्फे जबलपूरचे कमिशनर अर्स्किन यांना कळविली आणि पूर्व वहिवाटीप्रमाणेंच राजवाड्यावर भगव्या झेंड्याप्रमाणें युनियन जॅकहि लावून ठेवलें. राज्य तिचेंच होतें, बंडवाल्यांनीं तें कांही तिला नव्याने दिलें नव्हतें. पण बंडांत कोणत्याहि पक्षाचा जय झाला तरी झांशीच्या राज्याला अपाय होऊं नये, एवढी मात्र तिने चातुर्याने दक्षता घेतली होती.

नर्मदेच्या उत्तरेस या बंडाचा फैलावा फार झपाट्याने होत होता. मुंबई-आग्रा रस्त्यावर महू येथें फारच मोठी लष्करी छावणी होती, ती सर्वच्या सर्व बंडवाल्यांनी पेटवून दिल्या कारणाने दीड दोन मैलपर्यंत त्याच्या ज्वाळा पसरलेल्या दिसत होत्या, असें वरसईकर गोडसे यानें त्या प्रसंगीं समक्ष पाहिलेलें वर्णन लिहिलें आहे. मध्य प्रांतांत हत्रास, निमच, नसिराबाद, येथें बंडें झालीं, हैद्राबादच्या राज्यांत मौलवींच्या प्रचारा मुळें फार अस्वस्थता उत्पन्न झाली होती. तेथें एक दिवस चार हजार मुसलमान दीन दीन करीत रेसीडेन्सीवर चालून गेले. पण इंग्रजांनी व सालेरजंग यांनी तें प्रकरण आवरले व नबाबास बंडांत पडूं दिलें नाही; लखनौचा बंडावा सर्व अयोध्या प्रांतांत पसरला व सितापूर सलोनी, गोंड, सिकरोरा बराइच येथें बंड झालें. बरेलीस खान बहादुर खान हे बंडाचे प्रमुख होते, पूर्व बंगाल्यांत पाटणा, आरा, जगदीशपूर येथें बंड होऊन कुंवरसिंह व अमरसिंह या प्रख्यात जमीनदारांनीं बंडाचें नेतृत्व घेतलें होतें. कुंवरसिंहाचें वय त्यावेळीं ७५ वर्षांचे वर असून त्याच्या रणशौर्याबद्दल आजहि लोक पोवाडे गातात. पंजाब प्रांत, काश्मीर, व संस्थानी मुलूख हीं वगळून सर्व उत्तर हिंदुस्थानांत हें बंड पसरलें होतें व राज्यकारभार किंवा मुलकी व दिवाणी अंमल साफ नाहींसा झाला होता. वरसईकर गोडसे यानें लिहिलें आहे, "झांशी शहर हस्तगत झाल्यापासून सुमारें अकरा महिने उत्तर हिंदुस्थानांत इंग्रज बिलकुल नव्हता, असें म्हटलें

तरी चालेल. कालपीखालचा छपन्न लक्षांचा मुलूख तात्या टोपी याचे ताब्यांत असून, तहशीलदार वगैरे नेमून दिवाणी मुलकी वगैरे सर्व कामें सुरळीत चालली होती.'' ( बखर पृ. ६३ )

बंडाचा हा प्रकार पाहून इंग्रजांना जीव घेऊन पळतांना पुरेवाट झाली. या प्रसंगीं कोणी हत्तीवर, कोणी लमाणवर, कोणीं रानांत, कोणी वनांत, कोणी नेटिवांचा वेष घेऊन, तर कोणी स्त्रियांचा लहंगा व बुरखाहि वापरून आपले जीव कसे बचावले याच्या नवलकथा पुष्कळ आहेत. पण त्या सर्व सोडून देऊं. हें सर्व अकस्मात झालें कसें, याचा प्रत्येक इंग्रजास अचंबा व विस्मय वाटत होता. यामुळें स्वसंरक्षणाकरितां त्यांनी कांहींच योजना केलेली नव्हती. आणि सामान्य मनुष्यांना तर साऱ्या उत्तर हिंदुस्थानांत बंडाची रांगच रांग या टोकापासून त्या टोकापर्यंत पेटलेली पाहून अत्यंत विस्मय वाटत होता. डोंगरावर प्रचंड वणवा लागला म्हणजे त्यांत वाळलें ओलें सर्व जळून नष्ट होत असतें. मनुष्यच काय पण पशुपक्षीहि सृष्टीचें तें संहारक भीषण स्वरूप पाहून भयचकित झालेले असतात. बंडाचें हें विश्वरूप पाहून कोणी म्हणाले असतील, " ही पहा इंग्रजांचीं शेकडों पापें जळत आहेत. या अफाट ज्वाळांचा उपशम झाल्यावर त्या इंग्रजी राज्याची चिमूटभर देखील राख जाग्यावर दिसणार नाहीं!' कांहीं धूर्त माणसेंहि त्यावेळीं होतींच. तीं म्हणालीं असतील, " डोंगरावरचा वणवा फार तर गवत जाळतो. त्यामुळें कांहीं तो डोंगरच जळून नाहीसा होत नाही खास!" या बंडामुळें तरी विशेष जास्त काय होणार? यांत केवळ दडपशाहीची साथ आणि गरीबांचा नाश याहून जास्त काय लाभणार? पण कांहीं झालें तरी, इंग्रजांचें राज्य बुडत नाही हें खचित!" दुर्दैवानें हेच शब्द शेवटीं खरे ठरावयाचे होते!

# १३

## इंग्रजांची प्रतिकाराला सुरवात

दीड महिना बंडवाल्यांनीं दिल्ली ताब्यांत ठेवली असतां सरकारने कांहींएक केलें नाहीं हें पाहून टाईम्स, फ्रेंड ऑफ इंडिया व सारे अँग्लो इंडियन लोक लॉर्ड कॅनिंगवर जळफळून कमांडर इन चीफ ॲनसन याला शिव्या देऊं लागले. त्यांना वाटले हा सर सेनापति झोपला आहे, कीं शिकारीला गेला आहे? कीं करतो आहे तरी काय? पण ती गोष्ट खरीच होती. कारण एप्रिल व मे या दोन महिन्यांत तो करमणुकीखातर हिमालयांत शिकारीला गेला होता! तो एक सामान्य मनुष्य होता. एकहि लढाई त्याने पाहिली नव्हती. आणि केवळ वशिल्याने वर्णी लागून कंपनीने दोन लाख सैन्याचा त्याला कमांडर नेमलें होतें! कसे बसे तीन हजार लोक जमा करून दिल्लीवर पाठविण्यास त्याला तीन आठवडे लागले! त्यानंतर कर्नाळला येऊन तो मरण पावला. मीरतला जनरल हेविट होता तो असाच वृद्ध मनुष्य होता. पूर्व वयांत त्यानें शिपाईगिरी केली होती पण वृद्धपणांत ती तडफ नाहींशी होऊन रक्त थंड झालें होतें. मीरतला छावणी होती व तोफखाना होता त्याच्या सहाय्याने बंडखोरांचा पराजय करणें अशक्य

नव्हतें. निदान दिल्लीच्या रस्त्यांवर त्यांचा खास पाठलाग करिता आला असता. पण इंग्रजी फौज बाजारांत जाऊन, कांहीं घरांना आगी लागल्या होत्या तिकडे फेरफटका करून आली, आणि रात्रीं छावणीचें रक्षण केलें पाहिजे असें ठरवून झोंपी गेली. बंडवाले सकाळपर्यंत दिल्लीला पोंचलेहि होते. बैल गेल्यावर झोंपा करण्यांतलाच हा प्रकार !

कानपूरचा जनरल व्हीलर हाही असाच. त्याला विनाशकाळीं विपरीत बुद्धि आठवली. मॅगेझीनची जागा उत्कृष्ट तटबंदी केलेली, व तोफखान्यानें संरक्षित असतां, त्यानें ती सोडून नानासाहेबांचे ताब्यांत दिली. आणि कलेक्टर हिलर्डसन व सर्व इंग्रज बायकांमुळें यांना घेऊन उघडया मैदानांतील बराकीवजा छावणींत जाऊन तो राहिला ! नंतर बंडाची गडबड सुरू झाली, तेव्हां वाळूची तटबंदी छावणीभोंवती बांधावयास त्यांनी सुरुवात केली. ही भिंत चार फूट देखील उंच नव्हती. एका पावसाने ती वाहून गेली असती. अजीमुल्ला रोज जाऊन त्या इंग्रजांची थट्टा करी. एक दिवस टॉड साहेबाला त्याने विचारले ' ही भिंत कसली बांधता ? ' त्यानें उत्तर केलें छावणीच्या संरक्षणाकरिता. छावणी हा आमचा किल्ला आहे. " अजीमुल्ला मोठमोठयानें हंसत खोंचदारपणानें म्हणाला, मला तर हा निवळ ' निराशेचा किल्ला ' दिसतो ! यावर टॉड म्हणाला, " तसें काय म्हणून ? आम्ही याला ' विजयदुर्ग ' म्हणूं. "

कॅनिंगहि असलाच अगदी थंड धिम्या प्रकृतीचा मनुष्य होता. विलायतेहून कामाचा चार्ज घेण्याकरिता तो इकडे निघाला तेव्हां केलेल्या भाषणांत, आपली कारकीर्द शांततेची जाईल अशी अपेक्षा त्यानें दर्शविली होती. तथापि पुढचेंच वाक्य भवितव्यतेनें त्याच्या तोंडी अतिशय सूचक घातलें होतें. ' हिंदुस्थानांतील वातावरण असें चमत्कारिक आहे कीं, स्वच्छ निळसर आकाशांत एखादे वेळीं अगदीं तळहाता इतका लहान ढग दिसत असतो. पण वाढतां वाढतां तो सर्व आकाश व्यापतो आणि नंतर वादळ आणि विजा यांच्या कडकडाटाला सुरवात होते ! ' त्याचे शब्द दुर्दैवानें अक्षरशः खरे झाले. पण तो बिचारा दिवाणी मुलकी कामांतला थंड मनुष्य. बंडें, लढाया यांना तोंड देण्याचा त्याला सराव नव्हता. अशांततेची परिस्थिति ओळखून झटकन कसें वागावें याचा पोंच त्याला नव्हता. खुद्द त्याच्या राजधानींत कट चालले होते. काडतुसांचा प्रकार जानेवारींत झाला,

अंबाला येथें आगी लागल्या तरी त्याला शंका आली नाहीं. बराकपूरचा प्रकार झाल्यानंतर जनरल हियरसे यानें त्याला स्पष्ट लिहिलें कीं, ज्वालामुखीच्या तोंडावर आपण झोंपलों आहों असें समजा. तीन मेला लखनौ येथें बंड झालें तेव्हां सर हेनरी-लॉरेन्स यानें परिस्थिति बिघडत चालल्याचें त्याला कळवून म्हटलें ' काय करावयाचें तें तांबडतोब करा. प्रत्येक क्षण लाखाचा आहे.' अखेर मीरत येथें बंड होऊन दिल्ली गेली, अत्याचार सुरू झाले तरीहि कॅनिंग याला वाटत होतें कीं धिमेपणाने व शांततेनेच वागलें पाहिजे. परिस्थिति कांहीं आटोक्याबाहेरची नाहीं. दिल्ली गेल्यावर त्याने एक आठवड्यांत जें पत्र विलायतेस लिहिलें त्यांत, सामान्यपणें मीरतची हकीगत कळविली होती, पण "तावडतोब फौज पाठवा" हा कांहीं शब्द त्यांत नव्हता ! मग काय परमेश्वर स्वर्गांतून उतरून इंग्रजांचे रक्षण करणार होता ?

१७ मे रोजीं त्यानें सर्व हिंदुस्थानास उद्देशून जाहीरनामा काढला त्यांत, अनेक कपटी कारस्थानी माणसें, सरकारला लोकांचा धर्म बुडवावयाचा आहे असें सांगून बंडाव्याचा प्रयत्न करीत आहेत. पण सरकारने लोकांच्या धर्मांत आजवर हात घातला नाही व पुढेंहि घालण्याची त्यांची यत्किंचित देखील इच्छा नाही ' असें त्यानें कंठशोष करून सांगितलें. पण दिल्ली गेल्यावर असले जाहीरनामे पाहून, लोकांनीं तो नालायख आहे असें ठरविलें ! ' हे आले दयेचे देवदूत ' अशी त्याची इंग्रज लोक हेटाळणी करू लागले. आणि जंगबहादुर तर कोणाजवळ उघड असें म्हणालाहि, कीं असेच अधिकारी पाठवून तुम्ही हिंदुस्थानचें रक्षण करणार आहांत वाटतें ?

पण या विचारांना फारसा वेळ नव्हता. कारण प्रतिकाराचेंहि चक्र आतां सुरू झालें. उत्तर हिंदुस्थानची बातमी कळतांच मुंबईचा गव्हर्नर एल्फिन्स्टन यानें रंगून ब्रह्मदेशाकडे जाणारी फौज तारेनें अर्ध्या वाटेंतच थांबवून, इराणच्या स्वारी-वरून परत आलेली फौज तावडतोब उत्तर हिंदुस्थानांत रवाना केली. आणि बंडाच्या ज्वाळा दक्षिणेंत येऊं नयेत म्हणून महूचा मार्ग रोखून धरला. हैद्राबाद महूची पलटण ता. ८ जून रोजीं पुण्याहून महू सागर मार्गें माळवा मध्य हिंदु-स्थानची वाट चालूं लागली. व दुसरी मद्रासची पलटण नील साहेबाच्या नेतृत्वाखालीं प्रथम कलकत्त्यास जाऊन, नंतर प्रयाग कानपूरकडे वळली. गव्हर्नरच्या सल्ल्यानें इंग्लंडहूनहि त्यानें मदत मागविली. हॅवलॉक व औटरॅम पर्शियाच्या स्वारींत होते. जूनमध्यें ते मुंबई बंदरांत दाखल होतांच, त्याच पावलीं एलफिन्स्टननें त्यांना कोलंबोचे मार्गें कलकत्त्यास रवाना केलें.

जनरल नील कलकत्यास पोंचला तेव्हां राणीगंजला निघणारी आगगाडी स्टेशनांत उभी होती. गार्डानें त्याला सांगितलें ‘ फक्त पांच मिनिटें अवकाश आहे. आतांच गाडींत बसत असाल तर जाता येईल; नाहींतर गाडी निघून जाईल.’ नील यानें एक अक्षर न बोलतां त्या रेलवे अधिकाऱ्यास कैद केलें आणि सर्व सैन्यास डब्यांत बसवून ‘आगे चलो’ असा इंजिनवाल्यास त्यानें हुकूम केला. यावरून कॅ. नील याचा वागण्याचा खाक्या कसा होता तें दिसून येईल. त्याच्या मदतीस कॅप्टन रेनॉड व मॉड हे होते व कॅनिंगनें यावेळीं मार्शल लॉ पुकारून सैन्यास पूर्ण सत्ता दिली होती. कारण सामान्य कायदेशीर चौकशांना विलंब लागे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, निरपराधी लोक देखील बकऱ्यांप्रमाणें चरचर कापून बळी द्यावे. कलकत्याहून कानपूरपर्यंत येतांना नील, रेनॉड व मॉड या त्रयांनी अपराधी निरपराधी कांहींएक न पाहतां, जो दिसेल त्या नेटिवावर गोळी घालण्याचा क्रम ठेवला. आणि सरसकट कित्येक गावांना आगी लावल्या. त्यांत म्हातारीं कोतारीं माणसें, स्त्रिया व लहान अर्भकें देखील पाहिलीं नाहींत. झाडाला फांस तर कायमचाच लावून ठेवला होता. त्यावर कित्येक माणसांना फांशी देऊन, लांबून एखादी आकृति किंवा आंकडा दिसेल अशी त्या प्रेतांची रचना करीत. कोण ही अघोरी वासना! तोफेच्या तोंडी देणें हा तर नित्यक्रम होता. दहा पांच माणसें तोफेला बांधून उडविलीं नाहींत असा सुना दिवस कांहीं जात नसे. इंग्रज सैनिक सूडाच्या भावनेने इतके वेडावले होते कीं, नुसतें मरण ही शिक्षा त्यांना फार थोडी वाटे. तोफेच्या तोंडी नेटिवास देऊन क्षणांत त्याला जीवन्मुक्त करणें ही केवळ दया आहे, हा कांहीं खरा सूड नव्हे असें त्यांना वाटे. मुसलमान मौलवींच्या अंगीं जसें धर्माचें वारें शिरलेलें असतें तसा नीलचा प्रकार होता. त्यानें खिस्ती देशबांधवांच्या रक्ताचा सूड घेण्याचें ठरविलें होतें. रुधिराभिषेकाचे हे प्रकार इतके मनमुराद चालले होते कीं, हत्या करून स्वतः इंग्रजानांच त्याचा कंटाळा आला तेव्हां ते थांबले, दयाबुद्धीनें नव्हेत! या अत्याचारांच्या हकिगती वाचण्यालाहि मनाला शीण वाटतो, म्हणून केवळ एक दोन उतारे देऊन त्या सर्व हकिगतींना आम्ही संक्षेप देणार आहों. लंडन टाईम्सचा बातमीदार रसेल यानें लिहिलें आहे कीं कानपूरच्या ‘नंतर’ घडलेल्या हकिगतीनें या ‘आधीं’ घडलेल्या अत्याचारांचें कसें समर्थन करितां येईल?’ असो.

"Soldiers and civilians alike were holding Bloody assizes or slaying natives without any assize at all, regardless of sex or age. Afterwards, the thirst for blood grew stronger still. It is on the records of our British Parliament, in papers sent home by the Governer general of India in council, that 'the aged women and children are sacrificed, as well as those guilty of rebellion. They were not deliberately hanged but burnt to death in their villages, perhaps now and then accidentally shot. Englishmen did not hesitate to boast or to record their boasting in writing, that they had 'spared no one', and that 'peppering at niggers' was a very pleasant past-time, 'enjoyed amazingly."

"It has been stated in a book patronised by high official athorities that 'for three months eight dead carts daily went their rounds from sunrise to sunset, to take down the corpses which hung at the cross roads and market places, and that, six thousand beings were summarily disposed off and launched into eternity"

Kaye's History of the Sepoy war – Vol. 5-2.

ता. ४ जुलै रोजीं बनारसचें बंड मोडून ता. ११ रोजीं नीलनें अलाहाबादचा किल्ला हस्तगत केला. १२ जुलै रोजीं हॅवेलॉक त्यास फत्तेपूर येथें मिळाला व त्यांनीं तें शहर घेतल्यावर अगदी जाळून बेचिराख केलें. "रायफलचा मारा साध्या बंदुकीपेक्षां किती दूर अंतरावरून होऊ शकतो हें या वेळीं बंडवाल्याच्या ध्यानांत आलें" असें हॅवेलॉक यानें लिहिलें आहे. फत्तेपूर नंतर १५ जुलै रोजीं पांडु नदीच्या लढाईंत बाळासाहेब पेशव्यांचा पराभव झाला. तेव्हां निर्वाणीची वेळ येऊन सर्वांच्या मुखश्रीवरील आनंद मावळला व पुढें काय करावयाचें याची पेशव्यांचे परिवारांत चर्चा सुरू झाली. नानासाहेबांनी दुसरेच दिवशीं सैन्य घेऊन हॅवेलॉक याला तोंड देण्यास निघण्याचें ठरविलें. यावेळीं नानासाहेबां-कडे असलेल्या इंग्रज कैद्यांचे तोंडावर मात्र सुटकेच्या आशेमुळें टवटवी दिसूं लागली. कारण त्यांतील स्त्रियांपैकीं एक दोघांनीं फितुर करून हॅवलॉक याला पत्र पाठविलें

होतें. स्वारीचा बेत मुक्रर झाल्यावर इंग्रज कैद्यांचें काय करावयाचें याची चर्चा गंभीरपणें सुरू झाली. दोनतीन दरबाऱ्यांचे म्हणणें पडलें कीं त्यांचा 'निकाल' करून युद्धास जावें. तेव्हां फितुरीला सामील असलेले पांचसहा पुरुष कैदी होते त्यांना गोळ्या घालून मारण्यांत आलें. स्त्रियांनाहि मारावे ही गोष्ट नानासाहेबांनी मान्य केली नाहीं. तात्या टोपे यांनी त्या कल्पनेस कसून विरोध केला व कोणीहि पहारे-करी ही गोष्ट करण्यास कबूल नव्हता. पण दुर्दैवानें या इंग्रज स्त्रियांना स्त्रीजातींतच एक शत्रू होता. त्यांत अझीझन बेगम होती. या अझीझन बेगमेने बाहेरचे मारे-करी आणवून त्यांची कत्तल केली. पुरुषांच्या हातून असलीं नीच कामें होत नाहींत. स्त्रियांची हत्या बायकाच करूं शकतात ! ही कत्तल कोणी करविली याबद्दल पुढें अनेक दिवस तर्कवितर्क व तपास चालू होते. कर्नल वुइलियम्स यांच्या कमिशनलाहि या गोष्टीचा छडा लागला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं बरेलीचा एक सरदार महंमद अली खान अधिकारी मिचेल यास सांपडून फांशी गेला त्याचे जबानींत ही गोष्ट अवचित उघड कीस आली. मरणापूर्वी दिलेली जबानी सामान्यतः खरी मानतात. आणि त्यांतहि 'तात्या टोपे यांनीं मला ही हकिगत सांगितली' असें नांव घेऊन त्यानें सांगितलें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

"This information I have from General Tantia Topee who quarreled with the Nana on this same affair. What I tell you is true. The murder of the European women and children at Cawnpore was a woman's crime. For there is no fiend equal to a female fiend. But what cause she had for enemity against the unfortunate ladies, I don't know. I never inquired."

( मिचेल याच्या आठवणी पृ. १९१ )

ता. १६ जुलै रोजीं सैन्य घेऊन नानासाहेब अहीखा गांवापाशीं सज्ज झालें. हॅवेलॉकचें सैन्य येतांच नानासाहेबांचें सैन्य तयारीनें कानपूर व कँटोनूमेंट या दोन रस्त्यांच्या फांटयावर अर्धचंद्राकृति व्यूह रचून लढाईकरितां उभें असलेलें दिसलें. हॅवेलॉक कसलेला योद्धा होता. त्याचा सारा जन्म लढाया करण्यांतच गेलेला होता. पण पेशव्यांचा तो सैन्यव्यूह पाहून हॅवलोकहि क्षणभर चकितच झाला.

" It was plain that there was some military skill in the rebel Camp in whose soever brain it may reside, for the troops of Nanasaheb were disposed off in a manner which taxed all the power of the British Commander who had been studying the art of war all his life."

( Kaye, 2. 375. )

नंतर आपलें सर्व युद्धशास्त्र नीट आठवून लष्करी हालचाली कशा जपून करावयाच्या तें दुय्यम अधिकाऱ्यांना नीट समजावून देऊन मग हॅवेलॉकनें युद्धाला सुरुवात केली. या युद्धांत नानासाहेब पेशवे हे स्वतः जातीने फार मेहनत घेत होते. लढाईची शिकस्त झाली. तथापि दैवबळ अनुकूल नसल्यामुळे या लढाईत पेशव्यांचा अखेर पराभव झाला. " पेशव्यांचे सैन्यांत यावेळीं युद्धशास्त्र कोणाला तरी उत्तम अवगत असलें पाहिजे " असे भूषणास्पद उद्गार कर्नेल मॅलेसन यानें इतिहासांत काढले आहेत. परत येतांना नानासाहेबांनीं एक गोष्ट मात्र आठवणीनें केली. कानपूरचे दारुगोळ्याचे सर्व मेघजीन त्यांनीं उडवून दिले आणि खिन्न मनानें त्याच दिवशीं ब्रम्हावर्ताचा रस्ता धरला.

ब्रम्हावर्तास जाऊन नानासाहेबांनीं आपलीं सर्व बायका माणसें नावेत बसवून फत्तेपुरास बेगमेच्या मुलुखांत प्रवेश केला. ती सर्व हकीगत गोडसे यांचे बखरींत फार मनोवेधक रीतीनें वर्णन केली आहे. गंगेवर सर्व ब्रह्मवृंदांचा मोठ्या दुःखानें व कृतज्ञ अंतःकरणानें निरोप घेऊन ते नावेवर चढले आणि नाव सुमारें मैलभर पात्रांत मध्यभागीं गेल्यावर मेणबत्या मालवून अंधार केला. नंतर शेल्यांत बरोबर घेतलेलीं अनेक अमूल्य राजरत्ने त्यांनीं गंगामातेस अर्पण करून मोठ्या दुःखानें निश्वास सोडून उद्गार काढले कीं " परमेश्वरा ! आज दीडशे वर्षांनंतर पेशवाईचा आज लय झाला ! " इकडे ब्रह्मावर्त घाटावरील लोकांस वाटलें कीं, नानासाहेबानीं सर्व बायकामुलांसह गंगेंत जलसमाधी घेतली व फार आक्रांत केला. पण पेशवेबंधूनीं स्वतः हुशारीने नाव हाकारून सुमारें चाळीस मैल खाली ती फत्तेपुरास लावली.

कानपूरच्या पराजयानें नानासाहेब नामोहरम झाले नाहींत. पुनः त्यांनीं बेचाळीसाव्या पलटणीची मदत मिळवून आगस्टमध्ये विठूर येथें हॅवेलॉकशी लढाई दिली. पण यश न आल्यामुळे, त्यांनीं तात्या टोपे यांच्या सहायाने काल्पी हीच आपली राजधानी

करण्याचें ठरवून रावसाहेब पेशव्यांस तिकडे पाठविलें. ग्वालेरची दहा हजार कंटिजंट फौज यावेळीं तात्या टोपे यांनीं मिळविली असून थोड्याच दिवसांत त्यांनीं तेथें आपलें स्थान मजबूत केलें आणि कालपी खालचा सर्व प्रदेश ताब्यांत घेऊन तेथें जमाबंदी-लाहि सुरुवात केली. अजीमुल्ला, टिकासिंग वगैरें त्यांना मध्यंतरी मिळालेले तात्का-लिक मित्र अंतर्धान पावले होते. फक्त जिवाला जीव देणारीं माणसें उरलीं होतीं. " कालपीस ठाणें केल्यावर तात्या टोपे मुलुखाचे बंदोबस्ताकरितां फिरूं लागले. लालपुरी बोवा यमुनेचें कांठावर नाके धरून राहिला. लक्ष्मण शिंदा कालपीचे पश्चिम बाजूवर पंधरा कोसावर बंदोबस्त करून राहिला. व जळका रामभाऊ आठ हजार फौज घेऊन डंघाईचे मुलुखाचे डोंगरावर बंदोबस्त करून राहिला. कालपीचे मुलूखांत पेशवाईचा अंमल सुरू होऊन जिकडे तिकडे पुनः भगवे झेंडे फडकूं लागले. नवी फलटणें ठेऊन त्यांना शिकविण्याचें काम जारीनें सुरू झालें. त्या समयी गोरे लोकांचीं पलटणें हिंदुस्थानांत थोडी असून त्यांचा सर्व भर दिल्लीवर पडला होता. यामुळे कालपी प्रांतांत पेशवाईचा अंमल स्वस्थतेनें चालला होता."

( गोडसे बखर पृ. ४४ पाहा. )

इकडे नानासाहेब इंग्रजांचे हातीं लागले नाहींत, पण कानपूर हातीं आल्यामुळें इंग्रजानीं शहराची यमपुरी बनवून आपली सूडाची इच्छा तृप्त केली. इंग्रज शहरांत शिरतांच जे लढवई बंडास सामील होते ते केव्हांच पसार झाले. पण नंतर गावांतील तीन चार हजार निरपराधी नागरिकांना देहदंडानें निष्कारण प्रायश्चित्त घ्यावें लागलें. बिबीघर व कानपूरची विहीर यांचेमध्यें तीन महिने जनरल नील यानें फांशीचे खांब रोवून ठेवले होते त्यावर दररोज बलिदान सुरुं झाले. चौकशीच्या निमित्ताने अनेकांना संगीनींनी भोसकत, व कित्येक सभ्य गृहस्थांवर तर बिबीघराची रक्तलांछित जमीन जिभेनें चाटून स्वच्छ करण्याची त्यानें पाळीं आणली! एकाने करावें व दुसऱ्याने त्याचें प्रायश्चित्त घ्यावें असें या जगांत पुष्कळदां घडतें तें असें.

नानासाहेब ब्रह्मावर्ताहून निघून गेल्यावर दुसरे दिवशीं इंग्रज सैन्याने जाऊन त्यांचे वाड्यास आग लावून तो अग्निसात केला व अनेक मोठमोठे वाडे व मंदिरें पाडलीं. पण कानपूरच्या सरकारी खजिन्यांतील नानासाहेबांनी हस्तगत केलेले तीन लक्ष रुपये त्यांना शोधूनहि कोठें मिळाले नाहींत. तेव्हां अंजूर तिवारी किंवा कोणातरी फितुरामार्फत त्यांना सुगावा लागला कीं, पेशव्यांनी ही संपत्ति वाड्यांतील विहिरींत

टाकलेली असावी. तेव्हां डिसेंबरांत कानपुराहून मोठमोठे कासरें व दोनशे गोरे लोक नेऊन त्यांनीं विहिरीचें पाणी उपसण्याचें काम सुरू केलें. विहीर बरीच मोठी होती . चार रहाट लावून सतत बारा दिवस पाणी उपसलें तेव्हां कोठें तळ दिसूं लागला ! त्यांत मोठमोठ्या पेटचा टाकल्या असून, सुमारें तीस लक्षांचा ऐवज इंग्रजांना मिळाला. या खजिन्यांत दोन फूट रुंद असलेलीं कित्येक सोन्याचीं तारें, रुप्याचे सामान, सोने मोती, जवाहिरांचे दागिने, मोहोरा व रुपये असें अमूप द्रव्य होतें. प्राईझमनीच्या शिरस्त्याप्रयाणें ज्या पलटणीने तें जिंकलें त्या शिपायांनाच यास्तविक ही लूट मिळावयाची. पण त्यांना दमडी देखील जादा बक्षीस न देतां, सरकारी खजिन्याच्या तुटीची परत फेड म्हणून सरकारनेच नानासाहेबांची संपत्ति ताब्यांत घेतली ! होप ग्रँट याने सर्व ब्रह्मावर्तास आग लावून तेथील प्रत्येक वाडा पाडला व सर्व गांवावर अक्षरशः गाढवाचा नांगर फिरविला ! बाजीराव साहेबांनीं तीस वर्षें तेथें वास्तव्य करून व मोठमोठे वाडे बांधून ब्रह्मावर्तास पुण्यासारख्या राजनगरीचें ऐश्वर्य आणलें होतें. पण तें सर्व शहर जमीनदोस्त होऊन, आज त्याला ओसाड स्मशानाची कळा आलेली पाहून वाईट वाटल्याशिवाय राहात नाहीं. नानासाहेबांचा पत्रव्यवहार सापडावा ही इंग्रजांना फार आशा होती. पण ती फुकट गेली. अजीमुल्लाचा मात्र भरपूर पत्रव्यवहार सांपडला. त्यांत अनेक इंग्रज स्त्रियांनीं त्याला लिहिलेलीं प्रेमपत्रें होतीं ! !

" While serching over the Nana's Palaces at Bithur the other day, we found heaps of letters directed to that fiend "Azimulla Khan" by ladies in England, some from lady—, ending " Your affect. Mother. " Others from a young girl at Brighton named—, written in the most loveable manner, Such rubbish I never read, partly in French, which this scoundrel seems to have understood. How English ladies can be so infatuated. Miss was going to marry Azimulla, and I have no doubt would like to still, although he was the chief instigator of the Cawnpur massacres. You would not believe them if I sent home the letters. Next Mail, and I have time, I will copy one

or two out, just to give you an idea of the native rascal's correspondence......"

Indian *Mutiny Letters—By Fred Roberts.*

इकडे नील यास कानपुरास ठेवून हॅवेलॉक लखनौचे मार्गानें निघाला. पण त्याला दीड महिना पुढें सरकतां येईना कीं पाठीमागें जातां येईना. बिहार प्रांतांत पाटणा येथें बंड झालें; व जगदीशपुरचे कुंवरसिंह व अमरसिंह बंडाला सामील झाले यामुळें, कलकत्ता प्रयाग मार्गाने जी सहा हजार इंग्रज फौजेची मदत हॅवेलॉकला मिळणार होती ती वाटेंत अडकून पडली. बरें कानपूर सोडून लखनौकडे वेढयांतील इंग्रजांना सोडविण्याकरितां धांव घ्यावी तर, काल्पीस असलेल्या तात्या टोपे त्यानें कानपूर तर परत घेतलेंच असतें, पण दळणवळणाची सर्व पिछाडी कापली असती! बंड होणार त्या कल्पनेने सर हेन्री लॉरेन्स यानें मच्छीभवन व रेसीडेन्सीची स्वसंरक्षणाकरितां मजबुती केली होती. मच्छीभवनांत दोन लक्ष पौन्ड सरकारी खजिना होता त्यावर बंडवाल्यांचा डोळा होता. यामुळे बंडाच्या दिवसापासूनच वेढयाला जोर होता. चिनहट येथें लॉरेन्सचा बंडवाल्यांनीं मोठा पराभव केल्यामुळे, मच्छीभवन व रेसीडेन्सी दोन्ही ठिकाणें लढविणें शक्य होणार नाहीं असें पाहून, सर्व इंग्रज माणसांना व शिपायांना त्यानें रेसीडेन्सींत आणलें. नंतर रेसीडेन्सीचा प्रख्यात वेढा सुरू होऊन एकदोन दिवसांतच सर हेंनरी लॉरेन्स याला मृत्यु आला, त्यामुळें तर इंग्रजांचा एक मोहोराच गळून पडला! लखनौत बंडवाले तीस हजार असून रेसीडेन्सींत इंग्रजांचे तीन हजार लोक सतत चार महिनें हॅवेलॉकची मदत आज येईल उद्या येईल, या आशेवर एक एक दिवस कंठीत होते. तथापि लखनौच काय पण सर्व अयोध्या प्रांत बंडवाल्यांनीं व्यापलेला असल्यामुळे बाहेरून मदतीची आशा व्यर्थ होती. दिल्लीचा वेढा मोकळा झाल्याशिवाय लखनौच्या वेढयाबाबत इंग्रज कांहींएक करू शकले नाहींत. म्हणून पुढील प्रकरणांत दिल्ली काबीज केल्याची हकीगत सांगून पुनः लखनौकडे येऊं. मे पासून सप्टेंबर अखेरपर्यंत एकएक दिवस मोजीत, मृत्यूच्या मुखांत लखनौच्या इंग्रजांना दिवस काढणें प्राप्त झालें होतें इतकें खरें!

# १४

## अजीमुल्लाखान

नानासाहेबाचा हस्तक अजीमुल्लाखान याचें उपलब्ध असलेलें शब्दचित्र पुढें दिलें आहे. एखाद्या व्यक्तीचें चरित्र असें असतें कीं त्याच्या सान्निध्यानें दुसऱ्याचें सारें भवितव्य बदलून जातें! अजीमुल्ला हा मनुष्य नानासाहेबांजवळ नसता तर नानासाहेब बंडांत पडले असते कीं नाहीं हें सांगवत नाहीं. पण कानपूरच्या दोन्ही कत्तली मात्र झाल्या नसत्या असें निश्चित वाटतें. कोणावरहि हां हां म्हणतां छाप पाडील असें त्याचें बोलणें होतें. व अनेक गोष्टी जुळवून आणील अशी त्याची कर्तबगारी होती. लंडन टाईम्सचा युद्ध वार्ताहर वुइलियम रसेल हा १८५६ सालीं क्रीमियांत आला असतां त्याची व अजीमुल्लाची ओळख झाली. पण ती नुसती तोंड ओळख होती. पुढें एका वर्षानंतर हिंदुस्थानांत कानपूरच्या कत्तलीचा अतिशय गवगवा होऊन त्यांत वारंवार अजीमुल्लाचें नांव येऊं लागले तेव्हां रसेल याला एकदम आठवलें कीं कॉनस्तांतिनोपल येथें ही व्यक्ति आपणांला पूर्वी भेटली होती. त्याचेंच नांव अजीमुल्लाखान!!

रसेल यानें अजीमुल्लाचें सुरेख शब्द चित्र दिलें आहे तेंच येथें देतो. " ता. १८ जून रोजीं कॉनस्तांतिनोपल येथें मिसरी नामक निवासांत मी उतरलों असतां, एका अगदीं सडपातळ व तरुण अशा गृहस्थाची व माझी गांठ पडली. त्याचा चेहरा सुस्वरूप व रुबाबदार असून वर्ण ताम्रगौर होता, हातांत मौल्यवान जवाहिराच्या अंगठ्या असून अंगांत पौर्वात्य पद्धतीची शेरवानी होती. इंग्रजी व फ्रेंच दोन्हीं भाषा त्याला अस्खलित येत होत्या. त्याच्या रुबाबावरून हा कोणी तरी संस्थानिक अगर मोठा राजघराण्यांतील इसम असावा असें मला वाटलें. नंतर कळलें कीं ईस्ट इंडिया कंपनी विरुद्ध विलायतेंत त्याचें काम होतें; पण त्या कामाचें न जमल्यामुळें तो आतां हिंदुस्थानास परत निघाला आहे.

क्रीमियांत असलेल्या इंग्रजी सैन्यांत कामगार खात्यांत डॉइन नांवाचा एक सुपरिटेंड होता. त्याची या गृहस्थानें ओळख करून घेतली होती. आम्ही एक दिवस मिसरी निवासच्या गच्चीवर बसलों होतो, तेव्हां डॉइननेंच त्याची व माझी ओळख करून दिली. बोलण्यांत त्यानें स्वतःचे कांहीतरी नांवहि सांगितले. क्रीमियांत जाण्याची त्याला फार इच्छा होती. तो म्हणाला " हे शूर रुस्तुम—जवान मला फार पाहावेसे वाटतात. कारण इंग्रज व फ्रेंच दोघांचाहि त्यांनीं पराभव केला! माल्टा येथें असतांना इंग्रजांचा पराभव झाल्याचें मला कळलें तेव्हां मी वास्तविक कलकत्त्यास परत निघालों होतो. पण या बातमीमुळें मुद्दाम कॉनस्तांतिनोपल येथें जाऊन पुढें बालकलाबाहि पहावें असें मला वाटूं लागलें ! "

नंतर बोलतांना त्यानें लंडनमधील आपल्या अनेक ऐषारामी चैनींचे अनुभव सांगितले. त्यांत सहज जातां जातां इतक्या मोठमोठ्या स्त्रियांचीं व घराण्यांची त्यानें नांवें घेतलीं कीं मला तर संशय पडलाच, पण सांगणाराबद्दलहि माझा ग्रह थोडा दूषित झाला. ही गोष्ट त्याच्या अर्थात् खिसगणतीत नव्हती. " स्त्रियांना इतकें स्वातंत्र्य असणें बिलकूल उपयोगाचें नाहीं. पौर्वात्य देशांतल्या रिवाजाप्रमाणें त्यांना नजर कैदेंतच ठेवलें पाहिजे. तीच वास्तविक त्यांची मर्यादा. त्यांना स्वातंत्र्य मिळालें कीं, पतंगाप्रमाणें दीप ज्योतीवर झडप घालून त्यांनीं आत्मघात करून घेतलाच समजा ! " असें आपलें मत त्यानें उघड बोलून दाखविलें.

या संभाषणानंतर कांहीं आठवडे लोटले, तेव्हां एक दिवस डॉइन याजकडून एका नोकरानें मला चिठ्ठी आणून दिली; त्यांत अजीमुल्लाखान यांना रणभूमीवर खंदक पाहण्यास घेऊन यावे असें लिहिले होते. त्याची गाठ पडली तेव्हां माझ्या लक्षांत आलें कीं याचेंच नांव अजीमुल्ला. मी यावेळेपर्यंत त्याला संस्थानिकच समजत होतो! नंतर त्याला घेऊन लगेच मी खंदकाकडे निघालो. अजीमुल्लाकरिता लष्करी परवाना घ्यावयाचा होता म्हणून त्याला क्षणभर तेथेंच टेंकडीवर उभा केला व मी सेनापतीच्या खोपटाकडे पायीं निघालो.

यावेळीं सूर्य मावळण्याचा अगदी सुमार होता. थोडा अंधार पडला कीं लढाई करितां खंदकांतील व्यवस्था व नेआण आम्ही करीत असूं. पण शत्रू नेमकी हीच वेळ साधून तोफांचा आमचेवर भडीमार करीत असे. आतांहि असेंच झालें. अजीमुल्लाखान टेकडीवर उभा असतां रशियन लोकांनी तोफला बत्ती दिली, तेव्हां अंतरिक्षांतून सूं सूं करीत एक गोळा येऊन अजीमुल्लाचे अगदीं जवळ येऊन पडला. त्याबरोबर जवळच एक कबरस्थान होतें त्यांत जाऊन त्यानें भिंतीचा अडोसा घेतला व न भितां अगर न घाबरता तेथून शत्रूच्या तोफांच्या वातेरीकडे तो नीट न्याहाळून पाहू लागला. इतक्यांत मी येऊन त्याचेजवळ परवाना दिला व सांगितलें कीं आताच अंधार झाला आहे; मला एके ठिकाणीं जेवणाचे आमंत्रण आहे तेथें मला गेलें पहिजे. म्हणून मी जातो. तुम्हीहि लवकरच या. तो म्हणाला, "तुम्ही बेलाशक जा. शत्रूची गोलंदाजी पहावयाला ही मला सुरेख जागा मिळाली आहे. माझें पहाणें झाल्यावर मीहि थोड्या वेळानें तिकडे निघून येतो. पण बघा राव! शत्रूची ती नाक्काची टेंकला तुम्हाला सर करितां येईल असें मला तरी वाटत नाहीं! यानंतर मी त्याला स्नेह्याचे घरीं जेवणास येण्यास सांगितलें. तेव्हां थोडें तिरस्कारपूर्वक हंसून तो म्हणाला "मी हाडाचा मुसलमान आहे हें विसरूं नका!"

"पण मिसरी हॉटेलमध्यें माझ्या बरोबर तुम्ही नव्हतात का जेवलात?" मी विचारलें.

यावर तो हंसून म्हणाला, "अहो कसला धर्म, आणि कसलें काय? असल्या थोतांडावर मी विश्वास ठेवतो असें समजूं नका. मला स्वतःला कोणताच धर्म नाहीं. सर्व धर्म मला सारखेच आहेत."

इकडे जेवणानंतर मी उशीरा घरीं परत आलो तेव्हां असें आढळले कीं, अजीमुल्ला माझ्याच बिस्तऱ्यावर गाढ झोंपी गेला आहे ! मी येण्याचे पूर्वी तो आला व माझे घरच्या शिध्यावर हात मारून तो खुशाल तेथेंच झोंपला होता. सकाळीं पाहतो तो मी उठण्याच्या आधीं तो उठून पसार झाला ! टेबलावर त्यानें एक चिट्ठी लिहून ठेवली होती त्यांत पाहुणचाराबद्दल त्यानें माझे आभार मानले होते. अशी ही एक अजब व्यक्ति होती !

# १५

## दिल्लीच्या बादशाहीचा अंत

कानपूर, काल्पी व अयोध्या येथें बंडवाल्यांच्या धोरणांत व लष्करी हालचालींत कांहीतरी एकसूत्रीपणा होता. पण दिल्लीच्या लष्करांत हें कांहींच धोरण नव्हतें. व लायक पुढारी त्यांच्यांत कोणीच नव्हता यामुळे दिल्लीकडील बाजू हळूंहळूं ढांसळू लागली. अलाहाबाद पासून सर्व प्रदेश बंडवाल्यांनी व्यापला असल्यामुळे दिल्लीच्या इंग्रजांना कलकत्त्याहून मदत मिळणें शक्यच नव्हतें. पण जुलै अखेर पंजाबकडून कांही मदत मिळूं लागली. यापूर्वी खुद्द पंजाबांतच बंड होण्याची भीति होती. पण मॅांटगॉमेरी, डेली व कूपर या त्रयीनें पंजाब प्रांत अवघ्या एका महिन्यांत दडपशाहीचा कहर पेटवून शांत केला.

मॅांटगॉमेरी, डेली, कूपर या तिघांनीं लष्करी कायद्याच्या नांवाखालीं शेंकडों लोकांना तोफेच्या तोंडी दिले. गांवेच्या गांवे जाळलीं. आणि राक्षसी अत्याचारांचा कळस करून अशी दहशत उत्पन्न केली कीं, नंतर पंजाबने बंडवाल्यांच्या बाजूनें बोट देखील वर उचललें नाही. पण खरी मौज पुढेच आहे. ख्रिस्ती राज्यकर्त्याविरुद्ध हिंदु व मुसलमानांना चेतवून जसा कटाच्या पुढाऱ्यांनीं धार्मिक भावनांचा राजकारण'त

उपयोग केला, तोच डाव कटवाल्यांवर उलटविण्यासाठीं इंग्रजांनीं मुसलमानाविरुद्ध असलेलें शिखांचें ऐतिहासिक धर्मवैर यावेळीं शोधून काढले! कारण गुरु गोविंदसिंह व शीख पुढारी यांचा मुसलमानांनीं वध केला त्याबद्दल शीख संतापाने जळत असत. लॉरेन्सनें शिपायांच्या जुन्या पलटणी मोडून टाकल्या आणि त्यांत नवे शीख अफगाण गुरखे यांची अगणित भरती करून नव्या पलटणी बनविल्या. आणि "गुरु गोविंदसिंहाच्या रक्ताचा आम्ही सूड घेऊं" अशी शीखांकडून शपथ घेऊन त्यानें हें सैन्य दिल्लीवर पाठवून दिलें!

जूनमध्यें इंग्रज दिल्लीसमोर सुमारे सहा हजार होते आणि बंडवाल्यांची संख्या सुमारे साडे आठ हजार होती. दोन अडीच महिने बाहेरून कुमक येण्याची आशा नव्हती, तेव्हां त्यावेळीं दिल्लीच्या सैन्यानें नेट धरून हल्ला केला असता तर जनरल बर्नार्ड याला दिल्लीचा वेढा उठवून चालतें व्हावें लागलें असतें. पण बादशाही फौजेच्या हातून ही गोष्ट झाली नाही! तेव्हां बादशहा फार निराश होऊन म्हणाला 'पांचशें वर्षे टिकलेली बादशाही बुडावी अशी खुदाचीच इच्छा दिसते!' सेनापति बखतखां याला तो रागानें म्हणाला—"दिल्लींत इतकीं माणसें जमा झालीं असून एक टेकडी तुमच्यानें घेववत नसेल तर तुम्ही सारेजण दिल्ली सोडून चालते व्हा ना?" ग्वाल्हेरच्या जयाजीरावांना तसेंच अनेक हिंदु मुसलमान संस्थानिकांनां मदतीबद्दल आर्जवून त्यानें लिहिलें होते. पण एकाहि संस्थानिकाने तिकडे लक्ष दिलें नाही. अवघ्या शंभर वर्षांपूर्वी बादशहाच्या हांकेला ओ देऊन बादशाहीचें संरक्षण करण्याकरितां पानपत झालें होते! पण आज तो काळ राहिला नव्हता. तेव्हां बादशहाने अगदीं निराश होऊन जयपूर, जोधपूर, विकानेर, अलवार इत्यादि राजांना स्वतः पत्रें लिहून कळविले कीं, **"अनेक संस्थानें मिळून एक फेडरेशन किंवा संघ यावेळीं इंग्रजांविरुद्ध निर्माण झाला पाहिजे. हवे असल्यास दिल्लीची सर्व बादशाही सत्ता तुम्हां सर्वांवर सोंपवून मी राजीनामा द्यावयास तयार आहे!"** पण या राजानींच काय पण कोणाहि संस्थानिकानें बंडांत पडावयाचें नाहीं असें त्यावेळीं निश्चित ठरविलें होतें!

सप्टेंबरांत इंग्रज सैन्यांत शिपायांची संख्या साडेचौदा हजार झाली. त्यांत इंग्रज सहा हजार व साडे आठ हजार नुसते पंजाबी व शीख होते, यावरून पंजाबचे मदतीची

कल्पना होईल. ग्रिफिथनें लिहिलें आहे "पंजाबांत लॉरेन्सने जाहीरनामा काढतांच शेकड्यांनीं नव्हे तर हजारोनीं पंजाबचे शीख इंग्रजी सैन्यांत दिल्लीविरुद्ध दाखल झाले. त्यांनीं मदत केली नसती तर आम्हांला दिल्ली कधींच घेतां आली नसती. आणि तेच बंडखोरांना जाऊन मिळते तर आमचा सर्वस्व नाशच झाला होता! दिल्लीवर स्वारी करावी ही कल्पना त्यांचे मनांत फार भरून राहिली होती. ती यावेळीं त्यांनीं पुरी करून घेतली. फरक इतकाच कीं, स्वतंत्र राष्ट्र म्हणून स्वतः ते दिल्लीवर स्वारी करते तर त्याला काही तरी अर्थ होता. पण ब्रिटिश साम्राज्याचे हस्तक म्हणून त्यांनीं हें कृत्य केलें आणि मुसलमानांविरुद्ध आपली जातीय सूडाची इच्छा तृप्त करून घेतली!"

दिल्लीच्या हल्ल्याचें वर्णन मेजर ग्रिफिथ यानें पुढील प्रमाणें केलें आहे—

"ता. १३ सप्टेंबरपासून हल्ल्याला सुरवात झाली. हिंदुरावचे घरांतील बातेरींतून आम्ही तोफा डागीत होतो. रात्रीं या हल्ल्यांची शोभा फार विलक्षण दिसत असे. तोफांचे गोळे सुटत त्यांनीं ठिकठिकाणीं आगी लागत. त्यांचा स्वच्छ प्रकाश पडून, दिल्ली भोंवतालच्या बागा आणि शहरांतील भव्य वाड्यांचे घुमट व मनोरे अगदीं स्पष्ट दिसत असत. नुसता तोफांचा गडगडाटच नव्हे तर, शेंकडों बंदुकांचे सारखे कानठळ्या बसणारे आवाज होत. त्यानें वातावरण अगदीं धुन्द होऊन राहिलें होतें. ता. १४ पर्यंत हवा सुरेख होती. पण १८ रोजीं एकाएकीं वादळ होऊन अशा जोराच्या मुसळधार पावसास सुरवात झाली कीं कांहीं बोलता सोय नाही! पावसाची ही झोड चालू असतांच दिल्लीतील नीमच व बेरली येथील फौजांनीं दक्षिण दरवाजाने ग्वालेरकडे जाण्याकरितां पाय काढला. ता. १८ रोजीं सूर्यग्रहण होतें, तें सुमारें तीन तास टिकलें. दिवसा अंधार इतका पडला कीं नवल वाटलें! पण याचा बंडवाल्यांचे मनावर मात्र विलक्षण परिणाम झाला असें कळलें. त्यांना वाटलें प्रत्यक्ष परमेश्वराचाच आपणांवर कोप झाला. आणि सूर्याने आपले नेत्र झांकून घेतले!"

काश्मीर दरवाज्यासमोरील हल्ल्यांत सर जॉन निकलसन हा सेनापति गोळा लागून ठार पडला! तटाला खिंडार पाडून इंग्रज शहरांत शिरले तेव्हां जुम्मा मशिदींत हजारों मुसलमान जमा झाले होते. तेथें व रस्त्यांतून सारखी कापाकापी होऊन प्रेतांचा नुसता खच पडला होता. ता. २० सप्टेंबर रोजीं राज-

वाडयासुद्धां दिल्ली काबीज झाली. आणि बादशहा व शहाजादे कैदी म्हणून पाडाव झाले. त्यांना नेत असतां हॉडसन यानें राजपुत्रांच्या अंगावर गोळ्या झाडून भर रस्त्यांत त्यांचा प्राण घेतला! यानंतर इंग्रजांबरोबर शिखांनीं दिल्लीच्या पांच हजार नागरिकांची, अपराधी निरापराधी न पाहतां सरकट कत्तल केली आणि आपल्या धर्मवैराचा सूड उगवून घेतला!! व शहरांत लाखो रुपयांची नुसती लूट केली. इंग्रजांनीं पंजाबचें सर्व राज्य अवघ्या दहा वर्षांपूर्वीच बुडविलें होतें त्याची, रणजितसिंहाची किंवा बनारसला कैदेंत असलेल्या महाराणी जिंदाची देखील शिखांना आठवण झाली नाहीं. आपला धार्मिक शत्रू कोण आणि राष्ट्रीय शत्रू कोण, इतकाहि विवेक त्यांना राहिला नाहीं!'

अशा रीतीनें दिल्लीचे बादशहा व बादशाही नष्ट झाली. आणि बंडवाल्यांची त्यांत हानि झाली ती अशी कीं, ज्या नांवाने साऱ्या हिंदुस्थानला त्याना पाचारण करिता येत होतें ती कल्पना गळून पडली. '**दिल्लीची बादशाही**' हे दोनच शब्द, पण फार व्यापक अर्थाचे समावेशक व अनेकांना राजकारणाच्या दृष्टीने उपयोगी पडलेले होते. मराठ्यांचें साम्राज्य आणि इंग्रजी सत्तेची वाढ हीं दोन्ही दिल्लीच्या बादशहाची अंकित राहूनच झाली होती. किंबहुना लक्ष्मीबाईनें पुनः राज्यसूत्रें धारण करितांना जो जाहीरनामा काढला त्यांतहि, खुलुक् खुदाका, मुलुख बादशहाका असेच शब्द होते. कारण तेच शब्द साऱ्या हिंदुस्थानात सुपरिचित होते. बंड झालें तरी कटवाल्यांनींहि दरबारी भाषेपुरते कां होईना, पण दिल्लीच्या बादशाहीचेंच आवरण स्वतःच्या रक्षणाकरितां घेतलेलें होतें. बंड करणारांच्या हेतूमध्ये हल्लींच्या अर्थानें स्वातंत्र्याची कल्पना असेल किंवा नसेलहि. पण त्यांच्या सर्व कल्पनेचा उच्चार '**दिल्लीच्या बादशाहीची स्थापना**' या एकाच वाक्यांत करिता आला असता असें आम्हाला तरी वाटतें. त्यांत कायद्याच्या दृष्टीनें लपण्याची सोय होती तसेंच, कोणालाहि हवा तितक्या स्वातंत्र्याला वाव होता. यामुळे अनेकांनी आपले हेतु याच शब्दांच्या आधारानें गुंफून हा कट रचला होता. दिल्लीच्या बादशाहीची स्थापना हें केवळ निमित्त होतें. ही सर्व संपादणी इंग्रजांना कळत होती, याकरितां 'दिल्लीच्या बादशाही'चे कोलीत कोणी पुनः खेळवूं नये म्हणून त्यांनीं बादशाहीच नष्ट केली आणि तें पद व्हिक्टोरिया राणीला दिलें!

बहादुरशहाविरुद्ध बंड करण्याचा आरोप घालतां येण्यासारखा नव्हता. कारण तो स्वतःच बादशहा होता. म्हणून इंग्रजांचे खून करणें व त्याला मदत करणें हे आरोप त्यावर ठेऊन त्याला ब्रम्हदेशांत हद्दपार करण्यांत आलें. वास्तविक राजवाड्यांत लपलेल्या इंग्रज स्त्री–पुरुषांचें संरक्षण करण्याचा त्यानें आपणाकडून शक्य तितका प्रयत्न केला होता; शरणागताला मरण देणाऱ्या हॉडसन इतका तो अधम नीच खास नव्हता. पण इंग्रजांनी ती गोष्ट शाबीतच धरली. मॅलेसन यानें तर या खटल्यांतील सरकारी वकिलाचें समग्र भाषण पुरावा म्हणून आपल्या ग्रंथांत दिलें आहे. इतिहास ग्रंथ कसें निःपक्षपातीपणानें लिहावे याचा हा एक नमुनाच म्हणावयाचा !

असो. सरतेशेवटी बहादुरशहाबद्दल दोन शब्द सांगून हें दिल्लीप्रकरण पुरें करूं. बहादुरशहा हा एक अत्यंत रसिक विद्वान मनुष्य असून, दिल्लीच्या बादशाहांचे परंपरेंत शोभण्यासारखा होता. बादशाहीचा पडता काळ यावेळी होता. तथापि, साऱ्या दिल्ली शहरांत त्याला अत्यंत मान असे. तो स्वतः उत्तम कविता करी. कुराण मुखोद्‌गत असूनहि धर्मवेड त्याजजवळ काडीमात्र नव्हते. न्याय व नीती त्याजजवळ फार असे. दिल्लीचा वेढा चालू असतां दिल्लींत जो कोणी गोहत्या करील त्याला तोफेच्या तोंडी देण्याचा त्यानें हुकूम केला होता. कांही मूर्ख माथेफिरू मुसलमानांनी त्यावेळीं जुम्मा मशिदींत जिहादचें निशाण उभारलें. तेव्हां जिहादी पुढाऱ्यांची कानउघाडणी करून त्यानें सांगितले कीं "जिहाद फक्त इंग्रजा विरुद्ध आहे. हिंदूंविरुद्ध नाहीं ! हिंदूंच्या विरूद्ध धर्मयुद्ध पुकारण्याची तुम्ही चूक केलीत तर, लक्षांत ठेवा कीं, सैन्यांत हिंदुस्थानी पूर्बिये लोकच मुसलमानांपेक्षां अधिक आहेत. मुसलमानांची ते हां हां म्हणतां चटणी उडवतील !" बंडांत पडण्याचें त्याचें खरोखर वय नव्हतें. पण त्या वयांतहि प्रत्येक बुरुजावर जाऊन लढाईची देखरेख करितांना त्याला पाहून त्याच्या श्रमांबद्दल आदर वाटल्याशिवाय राहात नसे. अखेर इंग्रजांचे गोळे शहरांत पडून हाहाःकार उडाला. तेव्हां त्यानें सर्व शहरांत जाहीर रीतीनें दवंडी पुकारली कीं, 'उद्यां बादशहा जातीनिशी स्वतः युद्धास जाणार आहे. तरी ज्याला ज्याला शस्त्र धारण करितां येत असेल त्यानें युद्धाकरितां हजर व्हावें !" इतकें त्याचें अंतःकरण थोर व कोमल असून त्यानें दाखविलेली सत्वधीरता बादशहा या पदवीस शोभण्यासारखीच होती. आजपर्यंत बादशहाचा उल्लेख Wretched या भिकार विशेषणाशिवाय इंग्रजांकडून होत नसे. पण

कालमान बदलल्यामुळे तेच इंग्रज सध्यां किती वेगळे लिहूं लागले आहेत हें दाखविण्याकरितां डॉ. स्पीअर यांचा एक उतारा देतोः—

" Bahadurshah was educated to the life of a mediatised prince and the role fitted him perfectly. Whether he could have developed the qualities of action we shall never know, for he was denied all opportunity in his early years and the mutiny experience came far too late. But as a philosophic prince he would have adorned any court. He would have made a dignified ruler of a minor German state under the Empire or an excellent constitutional king. Delhi in his times was an Indian Weimar, with Ghalib for its Goethe. His interests and tastes were primarily literary and aesthetic. He loved poetry and philosophy, gardens and nature in all its guises. He loved animals and had a special fondness for doves. He was religious without being fanatical, and learned without being bigoted.

......... But above all Bahadurshah was a poet and a literary patron. He was the pupil and friend of Zauq, whose rival was the famous Ghalib. He composed several volumes of lyrics, some of which attained considerable popularity. Though not quite the same rank as Ghalib and Zauq he has his niche in the Urdu pantheon and his merit cannot be denied. It is this gift, much more than his crown, which gave him his place in the life of Delhi, and it is this even more than his political misfortunes, which has caused him to be affectionately remembered by the people."

Dr. T. G. P. Spear, Ph. D,
in Journal of Indian History, April 1941

गलीब झाऊक यांच्या उर्दू कविता भाषांतरित होतील किंवा उर्दू ऐतिहासिक साधनें प्रकाशित होतील तेव्हां बहादुरशहाबद्दल अधिक माहिती उपलब्ध होईल.

पण हल्लीं प्रसिद्ध असलेल्या एका गझलच्या श्लोकार्धानेंहि बहादुरशहाचें नांव इतिहास प्रसिद्ध राहीलः—

**दुमदुमाये दम नहीं अब, खैर मांगों जान की**
**अय जफर थंडी हुई समशेर हिंदुस्थान की।**

"हे बादशहा! हिंदुस्थानची समशेर थंड झाली, आणि तुझ्यांतहि (वयपरत्वें) आतां दम उरला नाहीं; तेव्हां सर्व सत्ताधीश इंग्रजाकडे प्राणांची भीक मागण्यावांचून आतां काय गत्यंतर आहे?" या प्रश्नाला बादशहानें उत्तर दिलें—

**गाझीयों मे बू रहेगी जब तलक ईमानकी**
**तबतो लंडन तक चलेगी तेग हिंदुस्थानकी।**

"आमच्या वीरांच्या अंतःकरणांत स्वातंत्र्याच्या निष्ठेचा शेवटचा बिंदु असेपर्यंत हिंदुस्थानचा खड्ग लंडनच्या छातींत घुसत राहील.!"

# १६

## लखनौचा वेढा

दिल्लीं पडली ती तेथें कोणी लायख लष्करी सेनापति नसल्यामुळे व कांहीं अंशीं फितुरीमुळें पडली. बुडणाऱ्या जहाजाची आशा राहिली नाहीं म्हणजे तें सोडून उंदीर ज्याप्रमाणें किनाऱ्याकडे पळतात, त्याप्रमाणें दिल्ली पडणार हें पाहून बरेली व निमच येथील फौजा दिल्लीतून निघून लखनौच्या वेढ्यांत मिळाल्या आणि त्यांनीं इंग्रजाचा वेढा अधिक सख्त केला. असा कीं त्यांतून सुटकाच होऊं नये. ता. २५ सप्टेंबर रोजी हॅवेलॉक यानें मोठ्या शर्तीनें बंडवाल्यांची फळी मोडून रेसीडेन्सीत कुमक पोंचविली. पण नंतर त्याला पुनः बाहेर पडण्याचें साधन नसल्यामुळें त्याचेवर देखील तेथेंच अडकून राहण्याची पाळी आली. सतत चार महिने रेसीडेन्सींत अडकून पडलेले इंग्रज मृत्यूच्या महाद्वारांत दरक्षणीं मरणाची वाट पाहात होते. कारण आजूबाजूंच्या घरांतून रोखलेल्या तोफांतून सतत गोळ्यांचा वर्षाव होत असल्यानें, भगदाडें पडून रेसोडेन्सीची अगदीं चाळण झाली होती. लखनौच्या वेढ्यांत सर हेनरी लॉरेन्स व कॅप्टन नील हे गोळा लागून ठार झाले व हॅवेलॉक याला आजारीपणानें मृत्यु आला. या दोघा सेनानायकांची योग्यता फार मोठी

होती. हेनरी लॉरेन्स हा उत्तम मुत्सद्दी होता. तोफेचा गोळा लागून आतां आपण वांचत नाहीं असें पाहतांच त्यानें धीर देऊन सर्वांस सांगितलें, "कसेंहि करून प्रथम बायका मुलांना वांचवा. माझ्या थडग्यावरील स्मृतिलेखांत असें लिहा कीं 'हेनरी लॉरेन्स आपलें कर्तव्य करीत असतां मृत्यु पावला.' लॉरेन्स प्रमाणें हॅवेलॉकहि मेल्यामुळे एक अस्सल वीर इंग्रजांचे बाजूचा नाहींसा झाला. शत्रूचें सैन्य अगणित असतां, साऱ्या दोन हजार लोकांनां घेऊन लखनौच्या वेढ्याचा व्यूह फोडण्यास तो निघाला होता. तो म्हणे "हातांत तरवार असतांनां मरण येईल यापेक्षां जास्तींत जास्त वाईट आपलें काय होणार आहे ?" हॅवेलॉक यानें मदत पोंचविल्यामुळें इंग्लिशांनां पुष्कळ धीर आला. आतांपर्यंत त्यांचे डोळ्यासमोर दुर्दम अंधेर व काळोख पसरला होता. हॅवेलॉक आल्यानें त्या जागेंत आशा किरण पोचूं शकला.

यानंतर आणखी दोन महिने गेले तरी वेढा कायम होता. डिसेंबरांत इंग्रजी फौज पुष्कळ जमा झाली व अलमबागेंत बंडवाल्यांचा पराजय करून औटरॅम व कॉलिन कँबल यांनी रेसीडेन्सीतून इंग्रजांची मुक्तता केली. या वेढ्यांत इंग्रजांनी जे धैर्य व कर्तव्यबुद्धि दाखविली त्याबद्दल त्यांना वाटणारा अभिमान खरोखरच सार्थ म्हटला पाहिजे. तथापि त्या वेळेस कॉलिन कँबेल यांनीं जी एक अजब गोष्ट केली त्याचा लष्करी दृष्टीनें अर्थ कोणालाच समजला नाही ! शत्रूचा पराभव केलेला असतांना पुढें लखनौ काबीज करण्याचें सोडून, अगर बंडवाले तहाची गोष्ट काढीपर्यंत तेथें ठाण मांडून बसण्याचें सोडून त्यानें अलम बागेंत औटरॅम याला ठेवलें, आणि फक्त इंग्रज बायकामुलें घेऊन शत्रूच्या डोळ्यादेखत ही स्वारी लखनौ सोडून निघाली. जणू कांही लखनौ जिंकण्याकरितां हें युद्ध नव्हतेंच ! त्याबरोबर या सेनापतीचें पाणी बंडवाल्याना पूर्ण कळून आलें ! त्याचा स्वभाव अत्यंत लहरी होता. युद्धांतील अत्यंत निकडीच्या गोष्टी देखील तो महिनेच्या महिने मनावर घेत नसे. याचा परिणाम असा होई कीं, जीं गोष्ट करण्याला नख पुरें होईल, त्या गोष्टीकरितां नंतर कुऱ्हाडीचे घावावर घाव घालावे लागत. लढाईच्या कामांत मुलकी अधिकाऱ्याना व मुत्सद्यांना ( गव्हर्नर जनरल याला देखील ) काय कळते असें तो मानीत असे ! इंग्रज आपल्या डोळ्यादेखत परत गेले याचा अगदीं विपरीत परिणाम अयोध्येंतील तालुकदारांच्या मनावर झाला इंग्रजांच्या सत्तेंत अर्थ नाहीं असें समजून जे तालुकदार पूर्वी

चंडाला मिळाले नव्हते तेहि आतां बंडवाल्यांना जाऊन मिळाले, व लखनौ परत मिळण्याचें काम खडतर व दुःसाध्य होऊन बसलें. जॉर्ज कँबेल याने म्हटलें आहे—

" As it was, things in Oudh became worse than ever, The settlement was infinitely more difficult and long protracted, and was then only obtained on terms very humiliating to us and unjust to the people. "

Innes—287

जनरल इन्नेस यांनीं लखनौचे वेढयांत हेनरी लॉरेन्स याचे हाताखालीं काम केलें होतें. पण त्यांनीं देखील असेंच मत दिलें आहे. सेनापति कॉलीन कँबेल याच्या लष्करी हालचाली इतक्या भोंगळ होत्या कीं कानपूर सोडून तो लखनौकडे जातांच कालपीहून येऊन नानासाहेब व तात्या टोप्यांनीं ताबडतोब कानपूर सर केलें. आणि तें परत घेण्याकरितां इंग्रजांनां पुनः अकरा दिवस लढावें लागलें. मैनपुरी व फत्तेगड हीं जिंकलेली ठाणीं बंडवाल्यांनीं पुनः घेतली, व मालगडचा वलीहद त्यांना जाऊन मिळाला. रोहिलखंडावरचा वचक जाऊन ते शिरजोर झाले. लखनौंत अलम बागेमध्ये औटरॅम याला बसविला होता त्याची स्थिती यामुळें पुनः शोचनीय होऊन गेली. याला उपाय म्हणजे पुनः लखनौवर स्वारी व पुनः युद्ध ! म्हणजे हें युद्ध कधीं संपावयासच नको ! आणि सर्वांत खेदाची गोष्ट म्हणजें Expert म्हणून अधिकार देऊन आणलेल्या या शहाण्या 'तज्ज्ञ' सेनापतीला ढोबळ चुकांबद्दल कॅनिंग याला बोलण्याची चोरी होती ! या सर्व प्रकारांमुळें कॅनिंग इतका कंटाळून गेला कीं, त्यानें मुद्दामच कलकत्याहून आपलें ठाणें हालवून तें अलाहाबादेस पांचशें मैल वर नेलें. आशा ही कीं आपण समक्ष जागेवर असलो तर याला कांहींतरी आळा पडेल.

फेब्रुवारी अखेरपर्यंत नेपाळचे जंगबहादुरकडून दहा हजार गुरख्यांचीं मदत येईपर्यंत कॉलिन कँबेल यानें लखनौ जिंकण्याबाबत कांहीं एक केलें नाहीं. मुत्सद्यांना रणांत काय समजतें? अशी त्याला घमेंड होती. पण नेपाळची मदत ही इंग्रजी मुत्सद्यांनीं सूत्रें हालवूनच मिळविलेली होती. आणि ही मदत न मिळती तर इंग्रजांना लखनौ जिंकण्याची आशा नव्हती. जंगबहादुरचें सैन्य कॉलिन कँबेलच्या सैन्यास

मिळालें तेव्हां इंग्रजी सैन्यांत एकंदर ३१ हजार शिपाई व १६० तोफा होत्या. यावरून दिल्लीपेक्षां लखनौचें बंड किती मोठें होतें याची कल्पना करितां येईल. लढाईला सुरुवात होतांच लखनौची बेगम हजरत महाल व युवराज हे तर जातीनें बंडवाल्यांना प्रोत्साहन देत तेथें हजर होतेच, पण त्यांचे इतर पुढारी म्हणजे मेहेंदी हसन, बंदा हसन, गफूरबेग, फजल अजीम, महंमद हुसेन आणि दरबारची मंडळी ही सर्व लढाईत हजर असून त्यांत फैजाबादचा मौलवी प्रमुख होता. केसरबाग, शहानजफ, बेगन कोठी, मोतीमहाल, ताराकोठीं, इमांबरा, अलमबाग, मच्छीभवन सिकंदरा या ठिकाणीं फार दारुण व हातघाईच्या लढाया झाल्या. सर्व लखनौला वेढा घालणें शक्य नव्हते, याकरिता व्यूह करून बंडवाल्यांना पश्चिमेकडे रेटीत न्यावयाचें असें ठरलें होतें. पण शत्रूस अडविण्याकरितां ब्रिगेडिअर कँबेल याला जें नाकें रोखण्यास कॉलिन कँबेल यानें सांगितलें होतें तें त्यानें न रोखल्यामुळें बहुतेक सर्व बंडवाले निसटले आणि पुनः अयोध्याप्रांतांत पसरले. तात्पर्य लखनौ मिळाले, पण ही सर्व मोहिम होऊन फुकट गेली ! अशी लखनौच्या वेढ्याची फलश्रुति इंग्रजांनीच लिहून ठेवली आहे—

"Thus Lucknow had been taken, but the foe had not been crushed, nor even punished, and they were free to reassemble elsewhere in their thousands and tens of thousands...Sir Colin lost nearly the whole of the hoped for fruits of his capture of Lucknow, owing first to his checking Outram on the 14th, then to his misdirected persuits on the 15th; and finally to his failure of his proper leading for his splendid force of cavalry at the most opportune and critical moment of the operation."

Sepoy Revolt—P. 225. Major G. M. Innes

या सुमारास अयोध्येंतील सर्व जमीन सरकारनें जप्त केली असून सरकार मर्जीप्रमाणें त्या जमिनीची विल्हेवाट करील असा कनिंग यानें जाहीरनामा काढला ! तो पाहून मात्र सरकारच्या मुत्सद्देगिरीचें दिवाळें वाजलें असें अँग्लो इंडियन पत्रकारांना देखील वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. यामुळें सर्व तालुकदार वर्ग बिथरून जाऊन बंडवाल्यांना सामील झाला व बंड लवकर मिटेल ही आशाच नष्ट झाली.

ठिकठिकाणी बंड पेटत असतां पळून जाणाऱ्या इंग्रजांना आश्रय देऊन त्यांचे प्राण वाचविणारे, व ते परधर्मी असले तरी त्यांचें आदरातिथ्य केलेल्या राजनिष्ठ जमीनदारांचीं उदाहरणें यावेळेपर्यंत थोडीं नव्हतीं. पण सरकारनें सर्वांच्याच जमीनीवर कारण नसतांना गदा आणल्यावर त्यांनाहि वाटूं लागले कीं, सरकार हरामखोर आहे असें बंडवाले म्हणत तें एकूण खरें तर ! यामुळें हा सगळा वर्ग इंग्रज सरकारवर इतका चिडून गेला कीं, प्रत्येक तालुकदार इंग्रजांचा शत्रु झाला ! आणि त्यांचा जमीनजुमला, किल्लेकोट व गढ्या हीं यापुढें बंडवाल्यांना आश्रय-स्थानें झालीं. अयोध्या प्रांतांत तटबंदी केलेल्या अशा गढ्या सुमारे सात आठशेंवर होत्या. त्यावर तोफा व बंदुका असून प्रतिकाराची सर्व तयारी होती.

It is stated that in September 1856, the number of fortified places held by the great landholders and other influential persons in Oudh amounted to 623, of which 351 were in good repair; Although only a small proportion of these were said to have guns mounted in the embrasures, it was known that many more had been thus defended before our assupption of the Government, and that a considerable number of pieces of ordnance had been buried or otherwise concealed, was a probable conjecture the truth of which subsequent events have confirmed.

Stanley's dispatch—13 October 1858.

सर जॉर्ज कँबेल यांनीं खेदानें म्हटलें आहे कीं, इंग्रज सेनापतीच्या लष्करी हाल-चालीचीं वर्णनें इतिहासकारांनीं मोठीं आळवून सुरस केलीं असतील, पण अयोध्याप्रांत लढायांपेक्षां मुत्सद्देगिरीलाच वश होऊन पुनः कबजांत आला ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली पाहिजे. हातांत तरवार घेतलेल्या शत्रूला तो मागेल ते देऊन निमूटपणें आम्ही पड घ्यावी अशी स्थितीच त्यावेळी प्राप्त झाली होती ! याप्रमाणें प्रथम तालुकदार येऊन मिळाले. नंतर पुष्कळसे शिपाई बंड सोडून घरीं निघून गेले, आणि यानंतर राहिलेल्या बंडवाल्यांना रापती नदीपार घालवून देण्याचें काम राहिलें, तें १८५८ सालअखेर पुरे झालें.

"Historians tell us of marching and counter marching, and the surrender of this fort and that fort to the Commander in chief; but it cannot be too plainly stated that Oudh was settled not by arms but chiefly by diplomacy. Things had come to that pass that peace was obtained by yielding to rebels, with arms in their hands, all they wanted. The talookdars were thus induced to come in; very many of the sepoys also went home, and it only remained to drive over the Raptee the remains of the old troops, which was successfully done by the end of that year."

Memoirs of my Indian Career. Vol. 1, P. 303.
By. George Campbell

तात्पर्य, यावेळीं दिल्ली व लखनौ शहर हे बंडवाल्यांचे बालेकिल्ले पडले हें खरें. पण बहुतेक सर्व बंडवाले जर शरण न येतां निसटून गेले तर लष्करीदृष्ट्या तो इंग्रजांचा पराभवच समजला पाहिजे. कॅनिंगनें तर तालुकदारांचे विरुद्ध जाहीरनामा काढून आगींत तेल ओतलें यामुळें, अयोध्या प्रांतांत इंग्रजांना जे थोडे मित्र राहिले होते तेहि शत्रू बनून बंडाच्या बाबतींत पुनः पहिलाच दिवस असें म्हणण्याची खडतर वेळ आली. रणांगणावर युद्ध जिंकणारा सेनापति आणि मंत्रागारांत बसून सूत्रें हालविणारा मुत्सद्दी याच्या विचारांत सांधेजोड असली तर, राजकारणांत जी गंमत दिसते तशी विजोड वीर-मुत्सद्यांच्या जोडीनें दिसत नाहीं. मुत्सद्दी हा अर्धा वीर असतो व सेनापति अर्धा मुत्सद्दी असावा लागतो. तरच राजकारणाची शिकार साधते. या दोघांच्या हेतूंत मेळ पडेनासा झाला कीं, त्यांच्या हालचालींना मग 'राजकारण' हें नांवहि देण्याची पात्रता उरत नाहीं. लॉर्ड कॅनिंग व कॉलिन कँबेल हे या दृष्टीनें परस्परांनां शोभणारे म्हणजे सारखेच नालायक होते! सुदैवानें सैन्याच्या बाबतींत मात्र मे महिन्यांत सरकारची जी शोचनीय स्थिति होती ती अगदीं पालटून आतां त्यांचेजवळ मुबलक सैन्य होतें. उत्तम रायफली व दारुगोळा होता, इतर संस्थानिकांच्या मदतीची खात्री होती. यामुळें त्यांनीं आत्मविश्वासानें आतां बंडवाल्यांचे आव्हान स्वीकारून या युद्धाचा ईर्षेने सोक्षमोक्ष करण्याचें ठरविलें. बंडवाल्यांना नवी मदत कोठून मिळाली नव्हती, व त्यांच्या अपेक्षेप्रमाणें

एकहि संस्थानिक त्यांना सामील झाला नव्हता हें खरें. पण अशा बाबतींत नशिबावर हवाला ठेऊन जीं माणसें समुद्रांत नाव लोटतात त्यांची आशा विलक्षण असते. होय, कांही मातबर संस्थानिक आम्हाला मिळाले नाहींत; पण ते कदाचित उद्यां मिळतील. ते खुशीनें न सामील झाले तर आम्ही सक्तीनें त्यांचेवर ती पाळी आणू! राजकारणांत ज्याचा जय होईल त्याचेकडे वळणारे पुष्कळ असतातच कीं नाहीं? राजकारण हा एक साहसाचा खेळ आहे. आणि 'साहसे श्रीः प्रतिवसति' हें त्याचें सूत्र आहे! तात्पर्य, हा आशा निराशेचा डाव उभयपक्षीं आतां रंगांत आला होता एवढें खरें.

# १७

## एका हेराची रहस्यकथा

‘ युद्धस्य कथा रम्या ’ हें तर खरेंच, पण युद्धाच्या इतिहासांत हेरांच्या गोष्टीइतकें नवलकारक व चित्तवेधक दुसरें आढळणार नाहीं. याचें कारण असें कीं, हेर इतिहास सांगत बसत नाहीं, तर आपण स्वतः पाहिलेली व अनुभवलेली गोष्ट सांगतो. यामुळें अशा सत्यकथेची किंमत वेळीं दहा इतिहास ग्रंथांपेक्षाहि मौल्यवान् ठरते. शत्रूच्या हातीं पाडाव झालेल्या हेराला बहुधा देहांताची शिक्षा होते व त्या-वेळीं तो जें सांगतो तें करुणास्पद असतें इतकेंच नाहीं तर खरेंहि असण्याचा संभव अधिक. जिवाच्या आशेनें मनुष्य एखादे वेळ खोटें सांगेल, पण ज्याच्या जीविताची आशा नष्ट झाली त्याला खोटें सांगून तरी काय लाभ होणार ! या दृष्टीने पुरा-व्याच्या कायद्यांतहि, मृत्यूपूर्वी घेतलेल्या आरोपीच्या जबानीला ( Dying Declaration ) फार महत्त्व दिलेलें आहे. १८५७ सालच्या युद्धासंबंधीं नंतर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत हेरांच्या किती तरी मनोरंजक गोष्टी प्रसिद्ध झालेल्या आहेत. तथापि त्यांतली एकच निवडून आम्ही पुढें दिली आहे; याचें कारण पुराव्याच्या दृष्टीने अशा जबान्यांचा इतिहासाला केवढा उपयोग होतो हें वाचकांच्या नीट लक्षांत यावें.

१८५७ सालच्या बंडांतील एका प्रमुख कटवाल्याची ही जबानी असून, हें बंड कां झालें, कसें झालें, कटांत कोण व्यक्ति प्रमुख होत्या, त्यांचे हेतु काय होते, यांवर त्यामुळें फारच उत्तम प्रकाश पडतो. या गृहस्थाचें नांव महंमद अली खान. बरेलीच्या उमराव घराण्यांत याचा जन्म झाला. वयानें तिशीच्या आंतबाहेर असून तो अत्यंत धाडसी, कर्तबगार व उमदा होता. विलायतेंत व युरोपांत त्यानें प्रवास केला होता. परराष्ट्रीय राजकारण त्याला उत्तम कळत होतें. नानासाहेबांचा वकील अजीमुल्ला व हा महंमदअली यानीच परराष्ट्राशीं संगनमत करून हिंदुस्थानांत बंडाची उठावणी केली. बंडांत लखनौच्या बेगमेच्या सैन्यांत हा महंमदअली एक वरिष्ठ दर्जाचा लष्करी अधिकारी होता. पण इंग्रजांच्या सैन्याची लष्करी माहिती काढण्याकरितां वेषांतर करून गेला असतां तो हेर म्हणून धरला गेला, व त्याला फांसावर चढविण्यांत आलें! १८५७ चें बंड कां झालें, कशाकरितां झालें, नानासाहेबांचा कानपूरच्या कत्तलीशीं कसा संबंध नव्हता, कंपनी सरकारचे हातून राज्य काढून घेऊन पार्लमेंट तें राणीसरकारकडे देणार ही सनदशीर सुधारणा किती इष्ट आहे, वगैरे अनेक गोष्टी त्यानें मनमोकळेपणाने बोलून दाखविल्या; ही हकीकत सांगत असतां रात्रहि सरली, व त्याचबरोबर त्याचें आयुष्यहि सरलें असल्यामुळें दुसऱ्या दिवशीं महंमदअली यांस फांशी देण्यांत आलें. फोर्बस मिचेल यानें ही सर्व हकीगत आपल्या 'आठवणीं'त सविस्तर दिली असल्यामुळें आम्ही जशीच्या तशीच मुद्दाम पुढें देत आहों :—

१८५८ सालच्या फेब्रुवारींत कॉलिन कँबेल लखनौचा वेढा उठविण्याकरितां निघाला असतांना त्याचे हाताखालीं जनरल लूगाड, ॲड्रियान होप, फोर्बस मिचेल वगैरे कित्येक अधिकारी होते. लखनौमध्यें बंडवाल्यांचा प्रतिकार फार सख्त असल्यामुळे कानपुरापासून लखनौपर्यंत रस्त्यावर इंग्रजी सैन्याची रांगच लागली होती. या वेळीं सुमारें एकतीस हजार सैन्य आणि एकशेसाठ तोफा इंग्रजांचे सैन्याबरोबर होत्या. उनाववर फार मोठी छावणी पडली होती व अनेक माणसें कामाच्या मिषानें छावणींत येत, अर्थात् त्यांत कांहीं हेरहि असत!

मिचेल यानें आपल्या 'आठवणीं'त लिहिलें आहे:—या वेळीं उनावपाशीं दहा दिवस आमच्या छावणीचा तळ पडला होता. अलमबागेंत औट्रमच्या सैन्यावर हजरत महाल बेगम व मौलवी वारंवार तोफा डागीत त्यांचा आवाज आम्हाला

दूरवर ऐकूं येत असे. तसेंच, आमच्यामागें कानपुरास गंगेच्या घाटावरील देवळें उडवून देण्याचें काम जनरल नेपियर करीत होता, त्याचे आवाजहि कानावर येत. एक दिवस सकाळीं विशेष काम नसल्यामुळें विलायतेचीं कांहीं वर्तमानपत्रें वाचीत असतां, चहाबरोबर खाण्याच्या 'प्लम केक्स' विकणारा एक फेरीवाला छावणींत आला. तो रूपानें तरुण, दिसण्यांत सुरेख, वर्णानें गौर, कपाळ उंच, काळ्या भोर वळविलेल्या मिशा, डोळे पाणीदार, अंगांत पांढरीशुभ्र शेरवानी असून देशी नेटिव सैन्यांतील अधिकारी जसे असतात तशी त्याची एकंदर ढब वाटली. त्याचे पाठीमागें एक उग्र चेहेऱ्याचा, तोंडावर देवीचे वण आणि हातावर दाट काळे केस असलेला काळाकभिन्न मुसलमान नोकर होता. त्याच्या डोक्यावर केक्सनी भरलेला हारा होता.

'कायरे कशा आहेत केक्स ?'

'हां साहेब, खाऊन पहा मग पैसे द्या.'

'अरे ! तूं छावणींत आलास, तुजजवळ रीतसर परवाना आहे कां ?'

'हा बघा साहेब ! शेरियर साहेबांचे सांगण्यावरून अॅड्रियन हींप साहेबांनी स्वतः लिहून दिला आहे. त्यांचें हस्ताक्षर तुमच्या ओळखीचें असेलच.'

मिचेलने तो परवाना पाहिला. त्यांत फेरीवाल्याचें नांव जेम्स् ग्रीन असें लिहिलें असून परवाना सर्व रीतसर होता.

थोड्याच वेळांत त्यानें तेथें बसून इंग्रजी वर्तमानपत्रें पाहावयास मागितलीं. आणि आमची फौज किती आहे, विलायतेंतील लोक बंडाबद्दल काय बोलतात, नव्या आलेल्या फौजांना लखनौचा उन्हाळा कसा काय मानवेल, इत्यादि चौकशी केली. हा फेरीवाला अगदीं अस्खलित शुद्ध इंग्रजी बोलत होता याचें मिचेल यास फार नवल वाटलें. 'तूं इतकें सफाईदार इंग्रजी कसें बोलतोस ?' असें मिचेल यानें विचारलें तेव्हां तो म्हणाला, "माझा बाप युरोपियन लष्करांत फार दिवस खान-सामा होता. मीहि लहानपणीं रेजिमेंट शाळेंत जाई, त्यामुळें मला लहानपणापासून इंग्रजी येतें." असें सांगून फेरीवाल्याच्या स्वभावाप्रमाणें थोडा थट्टा विनोद करून आपल्या केक्स विकण्याकरितां तो अॅड्रियन होपसाहेबाच्या छावणींत गेला. जातांना इंग्रजी वर्तमानपत्रें मागून नेण्यास मात्र तो विसरला नाहीं !

मिचेल पुढें लिहितो–"या फेरीवाल्याच्या हुशारपणाचें मला नवल व कौतुक वाटलें. पण संध्याकाळीं त्याच्याबद्दल जी बातमी कानावर आली त्यामुळे मात्र फारच आश्चर्य वाटलें! होप ग्रँट याचें छावणींत हा फेरीवाला गेला तेव्हां असें आढळून आलें कीं, हा लखनौचा हेर आहे व बातमी काढण्याकरितां त्यानें इंग्रजी छावणींत प्रवेश केला होता! त्याची कोर्ट-मार्शलपुढें चौकशी झाली व दुसरे दिवशीं सकाळीं त्याला फांशी द्यावयाचें ठरलें. रात्र बरीच झाली असल्याकारणानें त्या दिवशीं शिक्षा अमलांत आली नाहीं. म्हणून त्याला माझ्या छावणींत बंदोबस्त देऊन पाठविण्यांत आलें. त्या फेरीवाल्याबद्दल माझा थोडा बरा ग्रह झाला होता; पण तो 'हेर' ठरला हें पाहून मला थोडें वाईट वाटलें. आणि त्याच्या बरोबर जो मुसलमान हरकारा होता त्यानें तर बिबीघरांतील इंग्रज बायका-मुलांची कत्तल केली असें चौकशींत निघालें!!

फिचेट त्या वेळीं कानपुरास बँडवाला पोऱ्या होता. त्यानें पुढें सहा महिन्यांनीं स्पष्ट साक्ष दिली कीं, लष्करांतील लोक किंवा नानासाहेबांचे पहारेकरी यांनीं जेव्हां बायकामुलांची कत्तल करण्याचें नाकारलें तेव्हां एका वेश्येनें (अझीझन बेगम, अगर नानासाहेबांची एकादी 'कुणबीण') जाऊन बाहेरच्या पांच माणसांना आणलें. त्यांत दोन धंदेवाईक कसायी, दोन बांवकरी, व एक मजबूत काळाकभिन्न विलायती होता. मला वाटतें पुढें फिचेटनें त्याचें जें वर्णन केलें त्यावरून, जेम्स ग्रीनबरोबर असलेला मनुष्य हा तोच असावा!

माझ्या छावणींत त्या दोघांना आणल्यावर कांहीं पहारेकरी डुकराचें मांस आणण्याकरितां धांवले. कारण ज्यांना फांशी द्यावयाचें त्यांना प्रथम धर्मभ्रष्ट करून त्यांची विटंबना करीत! किंबहुना तसा प्रघातच होता. मला हें आवडलें नाहीं. तेव्हां जो कोणी बिगर हुकूम असें बेकायदा कृत्य करील त्याचा पट्टा व ड्रेस काढून घेऊन नोकरींतून त्याला मी कमी करीन, असे मीं फर्मावलें. जेम्स ग्रीन याला माझा हा हुकूम ऐकून इतकें बरें वाटलें, कीं त्याने माझे मनःपूर्वक फार आभार मानले.

त्या कैद्यांनीं संध्याकाळची प्रार्थना केली. तेव्हां माझे मनांत आलें कीं, आतां आपण रात्रीं झोंप घेऊं नये! हेरांना सांभाळण्याची अवघड जबाबदारी माझेवर होतीच. बिचाऱ्यांचें जीवन सारी एक रात्र राहिलें होतें. तेव्हां मी आपल्या

खर्चाने बाजारांतून त्यांना थोडी मेवामिठाई आणून दिली, त्यांना खातांपितां यावें इतपत त्यांच्या बेडया सैल केल्या, आणि त्यांच्याशीं मोकळेपणानें गप्पागोष्टी मारून उरल्या रात्रींत त्यांचेकडून काय मिळेल ती माहिती घेण्याचें ठरविलें.

भरपूर मनासारखें जेवण झालें तेव्हां थोडा हुक्का पिऊन कांबळयावर आरामांत बसल्यावर जेम्स ग्रीन यानें मला आपली हकीगत मोकळेपणानें सांगण्यास सुरवात केली. तो म्हणाला, "साहेब, मला एखादा हेर किंवा क्षुद्र चहाडखोर मनुष्य समजूं नका. बेगमेच्या फौजेंतला मी वरिष्ट दर्जातला ऑफिसर आहें. लष्करी चीफ इंजिनिअरचें माझेकडे काम असून लखनौला वेढा घालणाऱ्या तुमच्या सैन्याची बारीक रीतीनें पाहणी करण्याकरितां मी आलों होतों. पण वेळ वाईट, म्हणून दुर्दैवाने तुमच्या हातीं पडलों. पण माझें नांव विचारतां तर, माझें खरें नांव महंमद अल्लीखान. जेमी ग्रीन हें कांहीं माझें खरें नांव नाहीं. मी विलायतेंतील लंडन व एडिंबरो पाहिलें आहे. तेथें माझी स्नेही मंडळीहि आहेत. रोहिलखंडच्या उच्च सरदार घराण्यांत माझा जन्म झाला. बरेलीच्या कॉलेजमध्यें शिक्षण झालें. पुढें रुरकीच्या कॉलेजमध्ये जाऊन मी एंजिनिअर झालों. पुढें अयोध्येचा नबाब नासिरुद्दीन याचे हाताखालीं नोकरी करावी असा बेत होता, इतक्यांत नेपाळच्या जंगबहादुरबरोबर त्याचा खासगी चिटणीस म्हणून विलायतेस जाण्याचा माझा योग जमून आला. इतर शहरांबरोबर आम्ही एडिंबरो पाहिलें. तेथें याच तुमच्या ९३ हायलंडर पलटणीनें मोठी परेड करून आम्हाला स्वागतार्थ सलामी दिली होती! दुर्दैवानें आतां त्याच पलटणीच्या हातीं सांपडून मी हेर म्हणून फांशी जात आहें, हा योगायोग नव्हे काय?

"विलायतेंत कांहीं दिवस राहिल्यानंतर मी हिंदुस्थानांत परत आलों आणि अनेक राजदरबारीं काम केलें. १८५४ सालीं नानासाहेबांचे वकील अजीमुल्लाखान याचेबरोबर पुनः विलायतेस जाण्याचा मला योग आला. माझ्याप्रमाणेंच त्यालाहि अस्खलित उत्तम इंग्रजी येतें. कानपुरास सरकारी हायस्कुलांत गंगादिन याचे हाताखाली त्यानें शिक्षण घेतलें. विलायतेस मोठमोठ्या लोकांच्या आमच्या ओळखी झाल्या; पण नानासाहेबांच्या पेनशनचे कामाचें मुळींच जमलें नाहीं! आम्ही विलायतेंत याकरितां सुमारें पन्नास हजार पौंड खर्च केले. नंतर मी कांस्तांतिनोपल-मार्गें हिंदुस्थानांत १८५५–५६ चे सुमारास परत आलों. क्रिमियांत ता. १८ जून

रोजीं रशियाविरुद्ध लढत असलेली इंग्रज व फ्रेंच फौज किती भिकार आहे हें पाहून मला नवल वाटलें. पुढें कान्स्तांतिनोपलमध्यें रशियातर्फे कांहीं बऱ्या व्यक्ति ( त्या खरोखर किती अधिकृत होत्या हें सांगवत नाहीं ) आम्हांस येऊन भेटल्या व हिंदुस्थानांत आम्हीं **बंड उभारलें तर रशियाकडून फार मोठी मदत मिळेल** असें त्यांनीं आम्हांस खात्रीपूर्वक वचन दिलें ! तेव्हां आम्हींहि हिंदुस्थानांत कटाची उभारणी करण्याचा बेत केला. शुक्र खुदा ! आणि त्यांत आम्हांला खुदाच्या दयेनें यशहि आलें ! ! तुम्ही आज जीं वर्तमानपत्रें मला दिलीं त्यावरून दिसतें कीं, कंपनी सरकारची लुटारूपणा करण्याची सनद कांहीं पुढें चालविण्यांत येणार नाहीं ! पुष्कळ झालें. इंग्रजांपासून हिंदुस्थान जरी आम्ही स्वतंत्र करूं शकलों नाहीं तरी, आमच्या हातून थोडें तरी देशहित घडलें. आमचे प्राण कांहीं अगदींच व्यर्थ गेले नाहींत ! राणीसरकारच्या हाताखालीं कंपनीसरकारपेक्षां हिंदुस्थानला अधिक बरे दिवस येतील, अशी आशा वाटतें. आतां मी ते दिवस पाहण्यास राहणार नाहीं हें सोडून देऊं !

" बंडांत जे कित्येक अमानुष अत्याचार झाले ते मनांत आले कीं शरम वाटते. या छावणींत मी आलों तो इंग्रजाविरुद्ध द्वेष व शत्रुत्व बाळगून आलों. पण तुम्ही जी माणुसकी मला दाखविली त्याने मी लाचार झालों. गंगेच्या घाटावर असेंच उदाहरण घडलें. नदीवरचीं देवळें नेपिअर उडवून देत असतां कांहीं ब्राह्मणांनी येऊन विनंति केली कीं, ' या देवळाचें रक्षण करावें. ' तेव्हां नेपियरने त्यांना सांगितलें कीं, ' इंग्रज बायकामुलांचा कानपुरांत घात होत असता तुमच्यापैकीं एकानें जरी त्याविरुद्ध प्रयत्न केला असला, किंवा निदान त्यावेळीं मनानें नापसंती दर्शविली असली तरी त्यानें पुढें येऊन तसें सांगावें, म्हणजे तें देऊळ मी सोडण्यास तयार आहे.' मी त्या वेळीं घाटावर नेपियरचे हे शब्द ऐकण्यास समक्ष होतो. नामुष्कीची गोष्ट अशी कीं, एक देखील ब्राम्हण तसें म्हणणारा पुढें आला नाहीं.

मी महंमद अलीला विचारलें, " बंडास सुरवात झाली त्या वेळीं तूं कानपुरांत होतास काय ? "

" नाहीं, मी त्या वेळीं सुदैवाने रोहिलखंडांत माझ्या बायकामुलांची व्यवस्था करण्यांत गुंतलों होतो. कारण लवकरच बंडाची गडबड सुरू होणार हें मला माहीत होतें. बरेलीला बंड झालें तेव्हां त्या शिपायांबरोबर मी ताबडतोब दिल्लीला गेलों.

तेथेंहि बादशहानें मला मुख्य एंजिनीअर नेमलें. चार महिने मी दिल्लींत होतो, पुढें दिल्ली पडण्याचे सुमारास इतरांबरोबर पळ काढून मी लखनौस आलों. मथुरेस आल्यावर यमुनेस फार पाणी आल्याकारणानें सैन्यास जाण्यास वाट नव्हती तेव्हा मीच नावांचा पूल तयार करून दिला. या वेळीं शहाजादा फिरोजशहा व बखतखां यांचेजवळ तीस हजार सैन्य होतें. लखनौस गेल्यावर तेथेहि मुख्य लष्करी एंजिनिअरचें काम मला मिळालें. सिकंदराबादची कत्तल मीं डोळ्यांनीं पाहिली! तीन हजार शिपायांना आदल्याच रात्रीं तेथें बसवून कसा हल्ला करावयाचा याची मी सूचना देऊन शहा नजफवरून लढाई पहात होतों. दुर्दैवाने त्या सर्वांचा फडशा झाला, आणि चौकांतील बादशाही ध्वज खालीं ओढून जेव्हां इंग्रजी निशाण वर चढलेलें मी पाहिलें तेव्हां तर माझ्या डोळ्यांपुढें अंधारीच आली! लखनौमधील पुष्कळ कोटांचें व गढ्यांचें काम लष्करी प्रतिकाराचे दृष्टीने मींच करून दिलें. लखनौस आतां तुम्ही जाल. तेथें गेल्यावर त्या कोटापुढून जातांना तुम्ही जगलांवाचलांत तर माझीं कामें कशीं आहेत ते तुम्हास दिसेलच!"

मिचेल याने कैद्याला विचारलें-"बरें, हा जो तुझ्याबरोबर नोकर आहे हाच बिबीघरांत इंग्रज बायकामुलांची कत्तल करणारा मारेकरी होता काय?"

"असावा असें आता मलाहि वाटतें. पण साहेब, ज्या वेळीं मी त्याला कामावर घेतला त्या वेळीं मला हें माहीत नव्हते! असल्या दुष्ट माणसांच्या संगतीनेंहि दुसऱ्यावर प्राणसंकट ओढवतें."

"इंग्रज बायका मुलांचा प्राण घेण्यापूर्वी त्यांचेवर जुलूम बळजबरी झाली म्हणतात हें खरें काय!" मिचेलनें विचारलें.

त्यावर महंमदअल्ली तत्काळ म्हणाला, 'साहेब, या देशांत आपण परके नसतात तर असला प्रश्न विचारला नसतात! या देशाचे रीतिरिवाज व धर्माचार किती सख्त आहेत हें ज्यांना माहीत आहे त्या सर्वांना कळतें कीं, हे सर्व प्रवाद अगदी झूट आहेत! जातिद्वेष माजविण्याकरितां ते मुद्दाम पसरविलेले आहेत!! एकाहि स्त्रीवर जुलूम झाला नाहीं. भिंतीवर या स्त्रियांनीं करुण कहाण्या लिहून ठेवल्या होत्या असें कित्येक वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करण्यांत आलें. पण तेंहि खोटें होतें. भिंतीवर कांहींएक लिहिलेलें नव्हतें. हॅवेलॉक व औट रॅम यांच्या सैनिकांनीं जेव्हां

पुन्हा कानपुरांत प्रवेश केला तेव्हा त्या शिपायांनीं भिंतीवर हीं वाक्यें चितारलीं! मी त्यावेळीं खुद्द कानपुरांत नसलों तरी मी याची पुष्कळ बारीक चौकशी केली आहे, व त्यावरूनच हें तुम्हांला सांगतों."

"बायकामुलांची असली अमानुष कत्तल नानासाहेबांनीं केली याला कारण तरी काय घडलें?" मिचेलने विचारलें.

"साहेब! आमच्या लोकांच्या शब्दांवर तुम्ही जाऊं नका. ते वचन देतील व तें त्यांनीं पाळलें नाहीं असेंहि पुढें दिसेल; पण याचा अर्थ त्यांच्या मनांत कपटबुद्धि असते असा मात्र नाहीं. तें दिलेलें वचन फुकट जातें. हीं माणसेंहि तें वचन विसरून जातात! नानासाहेबांच्या मनांतून खरोखर या स्त्रियांना वांचविण्याचें होतें. पण दुर्दैवानें अंतःपुरांतच या स्त्रियांना एक शत्रु होता. नानांच्या हातून अघोर कर्में होऊन त्यांनीं इतकें पुढें जावें कीं, नंतर मनांत आलें तरी बंडाच्या चळवळींतून त्यांना पाठीमागें पाऊल घेतां येऊं नये, ही त्यांची इच्छा! अजीमुल्ला व अझीझन बेगम यांनींच हें कत्तलीचें काम केलें. नानांच्या परिवारांपैकीं कोणीहि हें करण्यास तयार झाला नाहीं. तेव्हां बेगमेनें बाहेरचीं माणसें आणवून हें कृत्य करविलें. स्वतः तात्या टोपे यांनीं ही गोष्ट मला सांगितली आहे. त्यांचें या बाबतींत नानासाहेबांशीं भांडण झालें. हें अघोर कर्म स्त्रीजातीनें केलें, पुरुषांनीं नव्हे! त्याच इतक्या निर्दय व स्त्रीजातीच्या वैरी होऊं शकतात. या इंग्रज स्त्रियांवर तिचा इतका राग कां होता कोण जाणे! मी ती चौकशी केली नाहीं."

मिचेलनें पुढें त्याला विचारलें, "जनरल व्हीलरच्या मुलीनें चार-पांच इसमांना पिस्तुलानें ठार मारलें, आणि जुलूम होऊं नये म्हणून तिनें विहिरींत उडी घेतली हें खरें काय?"

"तेंहि साफ खोटें! व्हीलरची मुलगी आतां या क्षणीं लखनौमध्यें जिवंत आहे. मुसलमानी धर्म स्वीकारून, ज्यानें तिचें रक्षण केलें त्याचबरोबर तिनें निका लावला आहे."

इतकीं बोलणीं होत आहेत तो पहाट झाली, त्याबरोबर मीं त्यांना ताबडतोब प्रार्थना आटपण्यास परवानगी दिली. क्षणभर बायकामुलांची आठवण येऊन त्याला वाईट वाटलें. पण मनाचा निग्रह करून तो म्हणाला, "असें उपयोगी नाहीं. फ्रेंच

इतिहासांतील डँटनचें उदाहरण यावेळीं डोळ्यांसमोर ठेवावें." नंतर त्यानें मला नजर म्हणून एक अंगठी दिली. तो म्हणाला, तुम्ही मला माणुसकीनें उदारपणें वागविलें. या क्षणीं या अंगठीशिवाय मजजवळ देण्यास कांहीं नाहीं. हिची किंमत सारी दहापांच रुपयेच आहे. पण एका साधूनें ही मला दिली आहे. लखनौमध्यें गेल्यावर मधून मधून हिच्याकडे पाहा, म्हणजे तुमचा जीव रक्षण होईल.

इतक्यांत होप साहेबांचा जमादार छावणींत आला आणि कैद्यांना तांतडीनें बोलावलें आहे असें सांगून त्यांना घेऊन गेला.

मला वाईट वाटलें. पण लखनौला जाण्यासाठीं ताबडतोब तळ हालविण्याचा हुकूम असल्यामुळें मीहि आवरा आवरीस लागलों. दुपारीं तंबूराहुट्या सर्व पाडून छावणीचा तळ हालला व लष्कर चालूं लागलें. सूर्य आकाशांत प्रखरपणें तळपळत होता. लखनौ–कानपूर रस्त्यावर एका झाडापाशी आल्यावर मीं सहज वर पाहिलें तों फांसाला लटकून महंमद अलीखान व त्याचा हारेवाला नोकर अचेतन स्थितींत लोंबत आहेत असें दिसले! तें दृश्य पाहून माझ्या डोळ्यांत अश्रुबिंदु जमा झाल्याशिवाय राहिले नाहींत.

## लखनौच्या वेढ्यांतील आख्यायिका

( १ ) लखनौच्या वेढयांतील अनेक गोष्टी मोठ्या रोमहर्षण कारक आहेत, तथापि त्यांतल्या एकदोन पुढें देतों. सारें शहर शत्रूनें व्याप्त असतां लखनौमध्यें फक्त रेसिडेन्सीच्या एका इमारतींत इंग्रज कोंडले गेले होते. अशा स्थितींत त्यांनी वेढा लढविला ही मोठी शर्थच म्हणावयाची. आणि ज्या इंग्रज सेनापतींनीं या बायकामुलांना सोडविण्याकरितां शत्रूच्या शहरांतून वाट काढली त्यांच्या कर्तव्यबुद्धीबद्दलही मनांत निःसंशय कौतुक उत्पन्न होतें. लखनौतील प्रत्येक घर म्हणजे बंदुकीच्या गोळ्या रोखलेला एकेक किल्लाच होता. त्याच्या पुढून धडपणानें जावयाचें म्हणजे मरणाच्या दारांत पाऊल घालण्यासारखें होतें! पावसाळ्यांत पेरणीचा हंगाम असल्यानें, अर्धें लोक वेढयाचें काम इतरांवर सोंपवून खुशाल शेतावर जात. आणि संध्याकाळीं वेढयाच्या कामाला पुन्हा हजर होत. मे पासून नोव्हेंबरपर्यंत असा सक्त वेढा होता कीं, रेसिडेन्सींत बाहेरून चिटपाखरू देखील जाणें

मुष्कीलीचें होतें. अखेर नोव्हेंबरांत सरसेनापती कालिन, कॅम्बेल आणि औट्रम यांनीं आलमबागेंत बंडवाल्यांचा मोठा पराजय करून इंग्रज बायकामुलांची सुटका केली.

या प्रसंगीं सिकंदराबागेंत फार मोठी कत्तल झाली. जवळजवळ तीन हजार लोक राजवाड्याच्या चौकांत मरून पडले. चौकांत एक पिंपळाचें मोठें झाड होतें. त्यावर लावलेला लखनौच्या राज्याचा हिरवा झेंडा काढून टाकून इंग्रजांनीं तेथें आपलें निशाण लाविलें. दुपारी रखरखीत ऊन तापलें होतें आणि काडतुसें तोंडानीं सोलावीं लागत यामुळे तहान फार लागे. तेव्हां थोडी विश्रांति घेण्याकरितां इंग्रजांचे सैनिक त्या पिंपळाच्या पारावर जाऊन बसले. तेथे गोळ्या लागून दहाबारा इंग्रजांचीं प्रेतें पडलींच होतीं. तीं प्रेतें पाहतां असें आढळून आलें कीं, छातीवर, पायावर किंवा कोठेंही बाजूने गोळ्या लागण्यापेक्षा त्या सर्वांना वरून गोळ्या लागलेल्या आहेत. तेव्हा नवल वाटून केकर वालेस याच्या मनांत सहज अशी कल्पना आली कीं, या झाडावर तर कोणी बसले नसेल ना ! म्हणून हातांत रिव्हाल्वर घेऊन तो झाडावर चढला. झाड फार गर्द असल्याने प्रथम त्याला कोणी दिसलें नाहीं. पण तिरप्या आडव्या फांदीवर जातांच वर कोणीतरी त्याला बसलेलें आढळलें, ' आहे रे आहे !' असें म्हणून त्याने नेम धरून रिव्हाल्वर झाडला. तों ती व्यक्ती धाडकन् चौकांतील फरसबंदीवर मरून पडली. त्या व्यक्तीच्या अंगांत मखमलीचें जाकीट आणि पायांत रेशमी विजार होती. जवळ जाऊन पाहातात तों ती एक सुंदर स्त्री होती ! कदाचित् आपल्या भावाबंदांच्या रक्षणाकरितां किंवा स्वतःच्या अब्रूकरितां तिनें तें उंच अडोशाचें ठिकाण पत्करलें असेल. केकर वॉलेस याला हें दृश्य पाहून मोठी हळहळ वाटली. " आग लागो त्या पिस्तुलाला " असें म्हणून पिस्तुल टाकून तो पलटणींतून चालता झाला. आणि दुसऱ्या दिवशींच काय पण पुन्हां कधींही तो सैन्यांत कामावर आलेला कोणाला दिसला नाहीं ! !

( २ ) कॅप्टन मेन याची एका बैराग्याबद्दल घडलेली अशीच एका गमतीची गोष्ट मिचेलनें आपल्या पुस्तकांत दिली आहे. कॅप्टन मेन व त्याचा स्नेही हातांत बंदुका घेऊन लखनौच्या रस्त्यांतून फिरत जात असतां, एका कोपऱ्यावर कोणी एक गरीब बैरागी सर्वांगाला राख फासून एका वाघाच्या कातड्यावर बसला होता. तोंडावर, कपाळावर तांबडे आणि पांढरे पट्टे यांनीं त्याचे रूप विचित्रच दिसत होतें. मेनचा स्नेही त्या बैराग्याकडे पाहून मेनला म्हणाला, पाहिलास का तो बैरागी ? ही संगीन

त्याच्या अंगांत भोसक ! त्यावर कॅ. मेन म्हणालां "छट् हा काय बंडवाला आहे कीं काय ? हिंदुस्थानांत असे किती तरी बैरागी पाहण्यांत येतात. त्यांना गांज्याची एक चिलीम किंवा हुक्का मिळाला कीं जगांत कशाची दाद नसते." इतके म्हणून बोलत बोलत ते दोघे त्या बैराग्याच्या जवळ येऊन पोंचतात तोंच त्या बैराग्यानें वाघाच्या कातड्याखालून एक रिव्हाल्हर काढला आणि ठो, ठो, ठो, असे तीन बार केले ! त्यांचे दोन बार हुकले पण एक लागला. तेव्हां या दोघांनीं संगिनीनीं त्या बैराग्याचें काम पुरें केलें !

# १८

## झांशीवालीचा वृत्तान्त

लखनौ काबीज केल्यामुळें इंग्रजांना निश्चित वाटूं लागलें कीं आपण हा लढा खात्रीनें जिंकणार! जोपर्यंत त्यांचे सैन्य जागयावर नव्हतें, आणि बाहेरून परचक्राची भीति होती तोपर्यंत इंग्रज लोक इतके गाईसारखे सालस झाले होते कीं त्यांच्यावर हात उगारण्याला दया वाटावी. पण दिल्ली उध्वस्त करून लखनौ जिंकल्यावर त्यांच्या सूडाच्या सर्व भावना जागृत झाल्या. आतां कसला न्याय आणि कसला अन्याय? आतां हवें त्याला फांशी द्यावें, हवी ती जहागीर बुडवावी, हव्या त्या ठिकाणीं जाऊन हवी तितकी लूट करावीं, फक्त दडपशाही करितांना तोंडानें बंडाचें निमित्त करून गवगवा करावा म्हणजे झालें! एवीं तेवीं बंड झालें तर आतां त्याचा स्वार्थाकडे उपयोग करून कां न घ्या? दडपशाही करावयाची असली म्हणजे, जणूं कांहीं कोठेंतरी खून व अत्याचार घडण्याची इंग्रज मुत्सद्दी वाटच पहात असतात. तो झाला कीं पुढें पाऊल टाकून त्यांनीं आपली शिकार साधलीच! १८५७ च्या जून महिन्यांत झांशीस जे अत्याचार घडले ते वास्तविक जेलदरोगा आणि कंपनीचे मुसलमान शिपाई यांनीं केले, याबद्दल कोणाला संशय

नव्हता. पण त्या अत्याचाराला लक्ष्मीबाई सामील असल्याचा इंग्रजांनीं तिच्यावर खोटा आरोप केला ! आणि खुशाल इंग्रजी सैन्य झांशीवर आणून, युद्ध करून तोफा डागून त्यांनीं झांशीचें राज्य जमीनदोस्त केलें ! वास्तविक १८५७ च्या जून पासून १८५८ चे मार्च पर्यंत दहा महिने, बंडाशीं कोणताहि संबंध न ठेवतां तिनें झांशीचें राज्य अगदीं बिनबोभाट व सांगून सवरून इंग्रजांचे वतीनें चालविलें होतें. असें असतां, वाळल्याबरोबर ओलेंहि जाळून इंग्रजानां झांशीविरुद्ध युद्ध पुकारण्याचें खरोखर कांहीं कारण नव्हतें. पण याला कारण राजकीय स्वार्थ, आणि त्याला निमित्त अत्याचार ! ! डलहौसीला लोक दडपशाहीचा पुतळा मानतात, आणि कॅनिंगला न्याय नीतिमान समजतात ! पण झांशी व चित्रकूट इंग्रजांनीं कशीं अन्यायानें बुडविलीं हें पाहिलें म्हणजे, हे सारे इंग्रज एका माळेचे मणि आहेत असें वाटल्याशिवाय राहात नाहीं !

झांशी संबंधाची हकिगत सुप्रसिद्ध आहे. पण अनुसंधानापुरती थोडक्यांत सांगतो. झांशीस ता. ६ जून १८५७ रोजीं बंड झालें. आदले दिवशीं गॉर्डन साहेबानेच राज्याचें दप्तर तिच्या स्वाधीन केलें. दुसरे दिवशी अत्याचार झाले. बागी लोकांनीं तिच्याकडे येऊन सक्तीनें दोन लाख रुपये मागितले, नाहींतर दुसरे वारस सदाशिव नारायणराव यांस गादीवर बसवूं असा धाक घातला. तेव्हां निरुपायानें बाईनें स्वतःचे दागिने काढून दिल्यावर बंडवाले दिल्लीस चालते झाले. नंतर जबलपूरचे कमिशनर अर्स्किन, व आग्रा येथील कमिशनर फ्रेजर यांना पत्रें लिहून सर्व हकिगत तिनें कळविली आणि पुनः इंग्रजी अंमल होईपर्यंत, इंग्रजांचे वतीनेंच आपण राज्य संभाळले आहे' असेंहि कळविलें. आपण **स्वतः** हीं पत्रें अर्स्किन यांना दिलीं असें मार्टीन यानें म्हटलें आहे.

She sent kharitas to Col. Earskine at Jubbulpore, to Col. fraser, chief commissioner at Agra, which I handed him with my own hand, to hear her explanation, but–No Jhansi had been a byword and was condemned unheard."

याशिवाय मध्य हिंदुस्थानचे पोलिटिकल एजंट सर रॉबर्ट हॅमिल्टन यांसहि झांशी येथील सर्व परिस्थिति तिनें वेळोवेळीं कळविली. तिनें बंडाशीं संबंध ठेवला नव्हता, उलट इंग्रजी बायकामुलांचें रक्षण व्हावें असा तिने शक्य तितका प्रयत्न केला. यापेक्षा तिनें आणखी काय करावयाचें होतें ?

पण हें सर्व फुकट गेलें. कारण इंग्रजी चित्रगुप्ताच्या वहींत झांशीचें राज्य आतां संपलें होते. इंग्रजी वर्तमानपत्रांत झांशीच्या अत्याचारांसंबंधीं अगदीं भडक वर्णनें येऊं लागलीं. कोणी म्हणे इंग्रज स्त्रियांवर शिपायांचे कडून बळजबरी जुलूम केला गेला. कोणी लिहिलें कीं, जोखन बागेंत इंग्रज स्त्रीपुरुषांना नागवें करून झाडांशी बांधून स्वतः राणीनें त्यांची पाठ फोडली! पण कोणाला असा विचार सुचेना कीं हें सर्व शक्य आहे काय? लखनौला वेढा पडला तेव्हांहि या आगलाव्या गोष्टवेल्हाळ वार्ताहरांनीं असेंच लिहिले कीं, सर्व इंग्रज स्त्रियांवर बळजबरी करण्यांत आली. जणूं कांहीं केवळ भोगलालसेकरितांच हें सर्व बंड झालें होतें! कानपूरच्या बिबी-घराची जागा एका जणानें सप्टेंबरांत जाऊन पाहिली व तत्काळ वर्तमानपत्रांत लिहिले कीं 'घोटा बुडेल इतकें रक्त अद्याप तेथें दिसलें. बूट व मोजे पायांत असलेले लहान मुलांचे पाय घोटयापर्यंत तरवारीनें तोडून भिंतीशी रांगेनें मांडून ठेवले होते! पण लिहिणाराला हें कळलें नाहीं कीं, रक्त व मांस उघड्या हवेंत कांही तीन तीन महिने टिकत नाहीं! कानपुरास कांहीं जून जुलै महिन्यांत उत्तर ध्रुवाजवळचें बर्फ येऊन पडलें नव्हतें. एडवर्ड लेकी यानें अशी कितीतरी उदाहरणें "Fictions counected with the Indian outbreak of 1857 या पुस्तकांत त्यावेळीं दाखविलीं होतीं. हें पुस्तक १८५९ सालीं प्रसिद्ध झालें असून इंग्रजांचा 'प्रचार' हें किती प्रभावी शस्त्र आहे तें त्यावरून दिसून येतें. सैन्यांतल्या इंग्रज शिपायांची अक्कल ती किती असणार? पण हीं वर्णनें वाचून त्यांचें माथें भडकून जात असे. तथापि शिपायांना अक्कल नसली तरी अर्स्किन हॅमिलटन या शहाण्या पोलिटिकल एजंटांना ती अगदीच नसावी काय? पण या मुत्सद्यांचे हात राजकीय स्वार्थानें बरबटलेले होते! झांशी खालसा करण्याला दत्तक हें कारण पुरेना, म्हणून त्यांनां अत्याचाराचें हें नवें निमित्त मिळालें! आणि तें घेऊन, हरणांच्या कपाळावर झडप घालण्याकरितां शिकारी चित्यांना सोडावें त्याप्रमाणें, अत्याचाराच्या विकृत प्रचारानें माथें भडकलेलें गोरें सैन्य त्यांनीं खुशाल झांशीवर [illegible]वून दिलें, आणि झांशी धुळीला मिळविली.

यावेळीं सर ह्यू रोझ व व्हिटलॉक यांची खास रवानगी मध्यहिंदुस्थानचा बंडावा मोडण्याच्या कामावर झाली होती. आणि लक्ष्मीबाईला जिवंत पकडून आणण्याचा हॅमिलटन् यास ता. ११ फेब्रुवारी रोजीं कॅनिंग यानें गुप्त हुकूम दिला होता. त्याप्रमाणें औरंगाबाद, महू, सागर, रठगड, चंदेरी येथील किल्ले सर ह्यू झपाटयानें काबीज करीत

चालला. त्याची तयारी मोठी सख्त असल्यानें त्याला कोठेच अपयश आलें नाहीं. व्हिटलॉक बांदा व चित्रकूटावर जाऊन पुढें त्याला येऊन मिळणार होता. बाणपूरावर तो आला तेव्हां आपणालाहि लढाई करण्याची पाळी येणार असें बाईला वाटूं लागलें. बाणपूरच्या राजानें यावेळीं आपलीं बायकामुलें संरक्षणाकरितां झांशीत आणून ठेवलीं होतीं. एक दिवस रानांत कांहीं स्वार चालले असतां, गफलतीमुळें कांहीं पत्रें त्याचे हातीं पडून त्याला समजलें की झांशीतहि फितूर अगोदरच झालेला आहे. तेव्हां आपलीं बायकामुलें काढून न्यावीं तसेंच लक्ष्मीबाईस वेळींच जागें करून तिनें काल्पीस पेशव्यांचे आश्रयास जावें, असें सुचविण्याकरितां झांशीस मुद्दाम जाऊन त्यानें बाईची गांठ घेतली. बाईचें म्हणणें यावर असें पडलें कीं झांशीत फितूर झालेला असेलहि, पण आपण शरण गेल्याप्रमाणें पेशव्यांचेकडे जाण्यापेक्षां, पेशवे मोठे आहेत तर त्यांनी येऊन आमचें संरक्षण करावें. असें कां न व्हावें? बाईची स्वःतची हिंमत किती होती, व अशा प्रसंगीं स्वकीयांच्या सभेंत धोरण ठेवून इतरांवरहि छाप राहण्यासारखें ती कसें हुशारीनें बोलत असे त्याबद्दल एक फार चांगला प्रसंग वरसईकरांच्या मूळ हस्तलिखितांत आम्हांस सांपडला आहे. 'माझा प्रवास' या पुस्तकांत सदर प्रसंग घेतलेला नसल्यामुळें तो अप्रसिद्ध उतारा पुढें दिला आहे.

'बाणपूरचा राजा फौजेदिशी वेत्रवती नदीचे बेहेड्यांत आश्रयार्थ राहिला होता. सहज एके दिवशी फिरत असतां त्याने झांशीहून ग्वाल्हेरास जाणारी एक डाक पकडली. त्यांत झांशींतून विननांवाचें लिहिलेलें एक पत्र आढळलें. त्यांत मजकूर सर्व फितुरी करून राज्य घेण्याचा होता. लखोटयावर नांव व पत्ता एका सरदाराचा होता. यामुळें हा फितूर ग्रामस्तापैकीं कोणी केलेला दिसत नव्हता. बाणपूरच्या राजाने लक्ष्मीबाईला आपली बहीण मानली होती व आपलीं बायकामुलें आश्रयाकरिता झांशींत नेऊन ठेविलीं होतीं. त्याच्या मनांत असें आलें कीं, आपण तेथें जाऊन फितुरीसंबंधी हा कागद बाईस दाखवावा व तेथें सर्व युद्धाची तयारी केलेली आहे ती घेऊन, काल्पीस रावसाहेब पेशवे व तात्या टोपे आहेत त्याना जाऊन मिळण्याचा विचार करावा.

'नंतर चार स्वार बरोबर घेऊन झांशीस जाण्याच्या इरायाने ते सायंकाळीं तडक निघाले ते अवशीचे बारा घटका रात्रीस झांशीचें उत्तर दरवाजाजवळ आले. झांशीस जंग होणार, सबब शहरचा बंदोबस्त चांगला ठेविला होता. व रात्रीं हुजूर हुकुमाशिवाय दरवाजांतून कोणालाहि घेण्याचा हुकूम नव्हता म्हणून पहारेकरी वर्दी

देण्याला किल्ल्यांत आला. तों आम्ही कांही मंडळी दिवाणखाण्यांत बोलत बसली होती बाईसाहेबांची स्वारी शंकरकिल्ल्यांतील बंगल्यांत होती. त्यांचेकडून हुकूम मिळताच राजाचा आंत प्रवेश होउन कचेरीचे दिवाणखान्यांत दोघांची भेट झाली. राजानें मोठा श्वास सोडून सांगितलें, “ माझ्याने प्रयत्न होता तो केला पण यश मिळालें नाहीं· हल्ली फौजेनिशीं वेत्रवती नदीचा आश्रय करून राहिलो आहे.” बाईसाहेब बोलल्या “हेहि राज्य आपलेंच आहे. येथेहि थोड्या दिवसांत लढाई होणार तरी आपण येथेच राहून येथील काम पहावे. किल्ला लढाईला चांगला आहे. ईश्वर तुम्हाला येथें यश देवो!” यावर राजानें फितुरीचे पत्र बाईपुढे ठेविले व बोलला की या पत्राची वार्ता कोणास कांहीच न सांगता, पांच चार दिवसांत सर्व सरंजाम व फौज घेऊन आपण काल्पीस श्रीमंत आहेत तेथे जावे हें मला बरें वाटतें. कारण पत्र कांही ग्रामस्थापैकीं रयतेने लिहिलेले नव्हे. आपल्या सरदारांपैकींच कोणीतरी लिहिलें असावें. याचा शोध लागावयाचा नाही आणि बभ्रा मात्र होऊन शेवटीं पश्चात्ताप करण्याचा प्रसंग प्राप्त होईल. तेव्हा बाईसाहेब बोलल्या कीं, “ आजपर्यंत येथें लढाई होणार हा विचार होता, सबब श्रीमंताकडे विशेष व्यवहार ठेवला नाहीं. आणि मी मुलगी कोणाची व सून कोणाची हा विचार न करता, काल्पीस सर्व पुरुष मंडळी तेथे मी त्यांना जीवभीतीने शरण गेल्याप्रमाणे जावे हें मला बरें वाटत नाही. त्यापेक्षा मी आताच सर्व लोकांस व सरदार मंडळीस बोलावणें पाठवून येथें सभा करून या पत्राचा विचार करूं व सर्वांची याबद्दल शपथ घेऊन जें करणें तें करूं.” राजानें उत्तर दिलें कीं, “ या बखेड्यांत आपण पडूं नये, कारण जो मनुष्य फितुरीबद्दल विचार करतो तो कधीच कबूल होणार नाही. आपण भरंवसा ठेवून राहणें हें मला योग्य वाटत नाही. या कामांत आपण विश्वासाने विसंबून राहाल तर परिणामीं या माझ्या भाषणाची आठवण होईल. असो. होणार हें कांही टळत नाही. आम्ही आपली मुलें माणसें आजच काढून नेणार.” बाईसाहेबांनी उत्तर दिलें “ मुलेंमाणसें तुम्ही न्यावी, परंतु मी आताच सर्व सरदार मंडळीस बोलावणें पाठवून विचार करतें तेथपर्यंत येथे असावे.”

नंतर लागलीच लक्ष्मणराव दिवाणजीस बोलावणें पाठवलें व सर्व नवे जुने सरदार व पलटणीपैकीं सरसुभेदार यांस बोलावण्याविषयी आज्ञा झाली. आज्ञेप्रमाणे बोलावणें होताच सर्व लोक मशाली पेटवून किल्ल्यांत येऊं लागले. तेंव्हा आम्हीहि पूर्वेच्या बुरुजावर जाऊन मौज पाहत बसलो होतो, तों तेवढ्या रात्रीस सर्व लोक

सरदार किल्ल्यांत आपापल्या इतमामाप्रमाणें येत होते व शहरचे रस्त्यापासून किल्ल्यांतील मोठ्या दरवाजापर्यंत तमाम मशाली पेटल्या होत्या. दिवाणखान्यांत सर्व लोक आपआपल्या स्थानीं आदबीने बसल्यावर बाईसाहेब आपल्या जागेवर बसल्या. बाणपूरचा राजा दरवाजाबाहेर नजीकच बाईच्या समोर बसला होता. दिवाणजी कंबर बांधून बाईसाहेबांसमोर उभे राहिले. बाईसाहेबांनी एका रुप्याच्या ताटांत बाण व बेलभंडार आणवून ब्राह्मणाकडून मध्येच आणून ठेवला होता. नंतर बाणपूरचे राजाने पत्र काढून सभेंत वाचून दाखविलें. तें समयीं बाईसाहेबांनी असें भाषण केलें कीं, " या पत्रावरून आपले राज्यमंडळांत फितूर आहे. तेव्हा कांहीं मंडळींचे मनांत असें आले आहे कीं, हा सर्व सरंजाम फौज वगैरे घेऊन काल्पीस पेशवे यांस मदत करण्यास जावे. तेथे जें होणे ते होवो, परंतु येथें राहूं नये."

नंतर लालू बक्षी व भुलाजीसिंग सरदार वगैरे लोक म्हणाले कीं, हा किल्ला लढण्यास बाका आहे. हा टाकून घाईचे वेळेस पेशव्यांना शरण जाणें आम्हाला ठीक वाटत नाही. जरी एखादे सरदाराचे मनांत कपट येऊन फितुरीबद्दलचा विचार त्याने केला असेल तरी, त्यांस अभय आहे. या समयीं त्यानें कबूल होऊन सर्वांचीं मनें निःसंशय करून या घटकेपासून माझें चित्त फितुरीकडे नाही अशी शपथ घ्यावी." तेव्हां दिवाणजीनें भाषण केले कीं, "या समुदायांत कबूल होणे फार कठीण आहे, हें पत्र शहरचे रयतेस लिहिण्याचे कारण नाही. सरदारांपैकींच खचित आहे. ते सर्व सरदार या सभेस हजर आहेत." यावर सर्व लोक स्वस्थ राहिले.

ते समयीं बाई म्हणाली कीं " मी बायको मनुष्य, तशात विधवा, पूर्व वयस्कर मी सून कोणाची हाही विचार मनांत आणला पाहिजे. यासमयीं आपण येथून निघून त्या पुरुष मंडळींत शरणाप्रमाणें जाणें त्यापेक्षा येथेच कांहीही होवो ! पेशवे यजमान आहेत तर, लढण्याचे कामांत त्यांनी येऊन मदत करावी. येथे जंग सुरू झाल्यावर त्यांनीं युद्धास स्वतंत्रपणें यावें असें मात्र केलें पाहिजे व त्यांना हें कळविण्याची तजवीज दिवाणजींनी ठेवावी. तूर्त याप्रसंगी जरी कोणाचे मनांत कपट असेल तरी त्याने तें दूर करून निष्कपट होऊन या शिवबाणावर हात ठेवून बेल-भंडाऱ्यास स्पर्श करावा." असें बाईसाहेबांचे बोलणें ऐकून तमाम नवे व जुने सरदार उठून पूर्वी सभेंत ठेविलेल्या ताटास हात लावून शपथ घेऊन आपापल्या जागीं परत गेले. ते समयीं भुलाजीसिंगहि येऊन बाईचे समोर हातांत ताट घेऊन

शपथ करून जाग्यावर जाऊन बसला. मग आनंदाने सभा विसर्जन झाली. बाणपूर राजाने त्याच रात्रीं आपलीं मुलेंमाणसें व खजिना घेऊन वेत्रवतीचे काठीं आपले गोटांत प्रयाण केलें!"

चैत्र महिना संपतांच एक दिवस झांशी समोरच्या मैदानांत तंबू राहुट्या दिसू लागले. तेव्हां इंग्रजानें ही वेढा घालण्याची तयारी केली आहे असें सर्वांस समजलें. झांशीपासून दीड कोस आल्यावर स्वाराबरोबर इंग्रज सेनापतीनें पत्र पाठविले कीं स्वतः बाईसुद्धां दिवाणजी, लालूभाऊ बक्षी, मोरोपंत तांबे वगैरे आठ इसमांनीं येऊन ताबडतोब भेटावें. बरोबर कोणतेहि हत्यार किंवा सैन्य आणूं नये. यावर बाईनें उत्तर लिहिले कीं आमचा बंडाशी संबंध नसतां इंग्रज झांशीस वेढा कां घालतात हें समजत नाहीं. मी बायको मनुष्य. माझें येणें होणार नाहीं. वाटल्यास दिवाणजी संस्थानचे चालीप्रमाणें हत्यारबंद लोक घेऊन येतील. यावर आपली मर्जी! हें उत्तर पाहून ह्यू रोज यानें फौज दतियावर परत पाठविली व काल्पीहून मदत येऊं नये म्हणून काल्पीचे दक्षिणेस बंदोबस्त केला. इकडे बाईनें तावडतोब रावसाहेब पेशव्यांकडे पांच स्वार पाठवून आम्ही तुमच्या भरंवशावर लढाई करीत अहों असें सांगितलें, तेव्हां रावसाहेबांनीहि मदत पाठविण्याचें कबूल केलें.

यानंतर वेढ्याला सुरवात झाली त्याची अपूर्व हकिगत वरसईकरानें दिलेली असल्यामुळे ती पुनः येथें देत नाहीं. ता. २३ पासून ३ एप्रिलपर्यंत सतत अकरा दिवस वेढा चालला. त्यांत कमरेला पदर खोंवून व हातात तरवार घेऊन ही शूर स्त्री प्रत्येक तटावर व बुरुजावर जाऊन लढाईचें काम चालवीत होती. इंग्रजांकडे सुमारे साडेतीन किंवा चार हजार शिपाई होते असें इंग्रज ग्रंथकार लिहितात तें खोटें आहे. "वेढा पडला त्याच वेळेला आंतील मंडळीस वाटलें कीं देखाव्यापेक्षां मनुष्य कमी दिसते. रात्रौ बातमीदार आला त्यानेंहि सांगितलें कीं मनुष्य सरंजाम दिसतो त्यापेक्षां कमी आहे. सुमारे लढवय्ये **साठ हजार** आहेत. बाकी बाजार बुणगे पुष्कळ आहेत." यावरून ही फौज निदान तीस हजार तरी असेल. पण यांत ओर्छाची सुमारे वीस हजार फौज मिळाली असावी. कारण सहा महिन्यापूर्वीच त्यानें झांशीवर वीस हजार सैन्यानिशी येऊन लढाई केली होती. आणि हॅमिल्टन यास लिहिलें होतें कीं, लक्ष्मीबाई बंडवाली आहे याकरितां इंग्रजांतर्फे आपण ही लढाई करीत आहोंत!!

इंग्रजी सैन्यानें प्रथम मोर्चे लावण्याचा दोन तीन दिवस प्रयत्न फार केला. पण मोर्चा लागेना. तेव्हा एका फकिरानें त्यांना तें ठिकाण दाखविले. तसेंच दारूच्या कोठाराचीहि बातमी दिली. त्याप्रमाणें मोर्चा बांधून इंग्रजांनीं गरनाळी तोफ चालू करतांच शहरांत जिकडे तिकडे आकांत उडाला. रात्रीं या गोळयांची शोभा विलक्षण दिसे. खदिरांगाराप्रमाणें लाल असे ते गोळे आकाशांत उंच गेले म्हणजे चेंडू इतके लहान दिसत. त्यांचाहि एकच बार होत नसे. पांच सात बार होत व दर वेळेला त्याच्या कपच्या उडून माणसें जखमी होत. " इंग्रजी सैन्यांत कितीहि दोष असले तरी त्यांचा तोफखाना मात्र साऱ्या जगांत पहिल्या नंबरचा आहे " असे उद्गार सर चार्लस नेपियर याने काढले ते खरे होते असें दिसतें. कारण गोडसे यानें लिहिलें आहे, " एक दोन गोळे तसेच फुटल्यावाचून पडले होते. ते नंतर आम्ही वजन करून पाहिले. तों पक्के साठपासष्ठ शेर भरले! "

अशा या तोफखान्यापुढें झांशींच्या जुन्या तोफखान्याचा टिकाव लागणें दुर्घट होतें. सहासात दिवस झाले पण पेशव्यांकडून मदत येत नाहीं हें पाहून बाईस फार चिंता लागून राहिली होती. अखेर ता. १ एप्रिल रोजीं तात्या टोपे याची सुमारे वीस बावीस हजार फौज इंग्रजी सैन्यावर आली. सर ह्यू रोझ याने नांवाला वेढा तसाच ठेवून कांहीं सैन्य तात्या टोपे यांचेवर पाठविले. तेव्हा या लढाईचा निकाल काय होतो हें पाहण्याकरितां झांशीतील अनेक मंडळी तटावर जमा झाली होती. तात्या टोपे यांनीं प्रयत्न फार केला. पण झांशीच्या दुर्दैवामुळें त्यांची फौज फुटूं लागून पळ काढूं लागली. इंग्रज सैन्यानें पाठलाग करूं नये म्हणून, बेटवा नदीचे काठीं दाट जंगल होतें. तें सर्व वाळलेलें जगल तात्या टोपे यांनीं पेटवून दिलें आणि चोवीस पन्ही छत्तीस पन्ही तोफा रणांत टाकून त्यानें पळ काढला. पेशव्याचे फौजेचा मोड होऊन तिनें पळ, अपयश व दुःख यांचा स्वीकार केला व झांशीवालीच्या फौजेत हाहाःकार होऊन सर्वांचीं मनें होरपळून जाऊन दु ख, भीति व निराशा यांचा त्यावर अंमल बसला.

तात्या टोपे यांचा या लढाईत पराजय कसा झाला हें एक गूढ आहे. नुकतीच त्यांनी चरखारी घेतली होती. त्यांत त्यांना तीन लक्ष रुपये व चोवीस तोफा मिळाल्या होत्या. तसेंच बाणपूरचा राजा, शहागडचा राजा, दिवाण दशरथ, दौलतसिंग, कचप्पा खारवाला, तसेंच शेंकडों लोक त्यांच्या पक्षाला मिळालेले होते.

वाटेंत बरवासागर येथें राजा मानसिंग येऊन मिळाला होता. व शिवाय जवळ बावीस हजार फौज व अठ्ठावीस तोफा होत्या. (जबानी पाहा) या लढाईची तपशीलवार हकिगत मिळत नाहीं.

अकरा दिवस म्हणजे अठ्ठयाऐशीं प्रहर झांशी लढली, तरी बाईसाहेबांचे हिमतींत किंवा मेहेनतींत यत्किंचित फरक पडला नाहीं. अकराव्या दिवशीं इंग्रजाची हालचाल थोडी कमी दिसत होती यामुळें इंग्रज वेढा उठवून निघून जाणार अशी आवाई पसरली. त्यानें किंचित हुशारी वाटून रात्रीं दोहोंचे सुमारास बाईसाहेबांना गाढ झोप आली. पण इकडे खरा प्रकार वेगळाच होता. भुलाजीसिंग परदेशानें फितूर करून किल्ल्याचा भेद शत्रूला कळविला त्याप्रमाणें, सकाळीं अंधुक अंधुक दिसूं लागण्याचे पूर्वी हजारों मजुरांच्या डोक्यावरून भारे आणून इंग्रजांनीं तटाला जिन्यासारखी वाट रचली आणि शेकडों गोरे तटावर आले. बाईसाहेबास ही हकीगत समजतांच सहस्र विंचू चावल्याप्रमाणें दुःख होऊन क्षणमात्र त्यांची अक्कल गुंग झाली. पण त्या कांहीं भटाभिक्षुकासारख्या नादान नव्हत्या. त्यांना ताबडतोब वीरत्वाचा आवेश चढून आपलें दीड हजार अरबांचें खास पथक घेऊन त्या दक्षिण दरवाज्याकडे धांवल्या. आंत हजारों गोरे लोक आले होते. त्यांच्या तरवारी म्यानाबाहेर पडल्या होत्या. बाईसाहेब सर्वांचे मागें चालत असतां आवेशानें हातांत नागवी तरवार घेऊन सर्वांचे मध्यभागीं गेल्या. गोरे लोकांची आणि विलायती लोकांची गांठ पडतांच एकदम तरवारीचा चकचकाट होऊन लोक एकमेकांत मिसळून गेले आणि अवघ्या पांच मिनिटांत शेंकडो गोरा कापून निघाला. कांहीं इंग्रज दूर जाऊन झाडांच्या व घरांच्या आश्रयाने गोळ्या घालूं लागले तेव्हां, ही वेळ परतण्याची आहे असें सांगून एका वृद्ध सरदारानें मोठया मिनतवारीनें बाईसाहेबांस मागें फिरवून किल्लांत आणलें.

इकडे इंग्रज शहरांत शिरतांच त्यानें जिकडे तिकडे आगी लावल्या, त्यामुळें शहरांत मोटा आकांत झाला. हलवाईपुरा हा शहरचा मोठा संपन्न भाग होता तो पेटून त्याच्या ज्वाळा आकाशाला भिडल्या होत्या. जिकडे तिकडे रडारड, आरडाओरड, पळापळ चालली होती व बंदुकांच्या शतावधि आवाजांनीं दर आवाजागणिक एकेका निरपराधी प्राणाची हिंसा होत होती. हजारों श्वापदें दीन शब्द करून सैरावैरा धांवत होतीं. शहराची ती दीन अवस्था जेव्हां वाडयाच्या गच्चीवरून बाईसाहे-

बांच्या दृष्टीस पडली तेव्हां त्यांच्या डोळयांना खळखळा पाणी आल्याशिवाय राहिलें नाहीं. बाईसाहेबांचे मनांत दुःख आणि करुणा इतकी ओतप्रोत भरली होती कीं, आपणच महापातकी आहोंत असें समजून दारूच्या कोठारानें स्वतः उडवून घेऊन आत्मनाश करण्याचे त्यांनीं ठरविलें. पण याहि वेळेला त्या वृद्ध पथकी सरदारानें त्यांचे सांत्वन करून त्यांना ·परावृत्त केलें आणि म्हटलें, बाईसाहेब! मरण हें कोणाच्या हातचें नाहीं. आपण शूर आहां. असें नादानपणानें मरून जाण्यापेक्षां आपण अवशीला रात्रीं शत्रूची फळी फोडून निघून जाऊं. त्यांत यश आलें तर उत्तमच, नाहीं तर रणांत देह ठेवून स्वर्ग जिंकूं!" हे शब्द ऐकतांच बाईसाहेबांस किंचित् समाधान वाटून त्यांस पुन शूरत्वाचा आवेश चढला व नंतर त्यांनीं स्वस्थपणें स्नानभोजनादि नित्यकर्में आटोपून जे लोक लढवय्ये नव्हते त्यांस व दासदासी वगैरे सर्व नोकरांस तमाम जाण्यास परवानगी दिली.

"इकडे बाईसाहेब अवशीचे बारा घटकांचे सुमारास सर्व तयारी करून किल्ल्याचे बाहेर निघाल्या. मोरोपंत तांबे वगैरे जी आप्तमंडळी होती ती सर्व हत्यारबंद होऊन घोड्यावर बसून तयार झाली व प्रत्येकाजवळ कमरेशीं बांधण्यास मोहरापुतळ्या दिल्या. संस्थानांत जो अर्थ होता तो सर्व हत्तीवर खलित्यांत भरून घेतला व तो हत्ती मध्यभागीं घेतला. बरोबर सुमारें दोनशें निवडक स्वारांनिशीं जुने जिवास जीव देणारे सरदार होते तेहि घेतले. शिवाय सकाळीं इंग्रजांबरोबर जी चकमक झाली त्यांतून सुमारें १२०० विलायती लोक जिवंत राहिले होते ते घेतलें. स्वतः बाईसाहेब अडीच हजार रुपये किंमतीचा खंदा राजरत्नासारखा घोडा होता त्यावर आरूढ झाल्या. पायजमा स्टॉकिन बूट वगैरे सर्व पुरुषवेश धारण केला. अंगांत तारेचें चिलखत घातलें. कमरेस जंब्या वगैरे हत्यारें बांधून खांकेंत तरवारहि घेतली व जवळ कांहीं एक अर्थ घेतला नाहीं. फक्त एक रुप्याचा जांब म्हणजे पेला पदराशीं बांधून घेतला. नंतर रेशीमकांठीं धोतरानें पाठीशीं बारा वर्षें बयाचा दत्तक मुलगा बांधून घेतला. शाबास त्या बायकोची!

"याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर "जय शंकर" असा शब्द करून सर्व मंडळी किल्ल्याखालीं उतरली, व भर शहरांतून उत्तर दरवाजांतून बाहेर पडली. शेंकडों लोक बाईसाहेबांचा निरोप घेण्याकरितां रस्त्याचे बाजूने उभे होते. त्यावेळेस त्या शूर लोकांचें अवसान पाहून मृत्यूचे दाढेंत हात घालणारे हे वीर पुरुष

शत्रूची फळी फोडून जातील असा पाहणारांस पूर्ण भरंवसा आला. बाईसाहेब शहराबाहेर पडल्या नाहींत तोंच शहरांत इंग्रजांचे लोक बंदोबस्ताकरितां होते त्यांनीं हांक ठोकून गलबला केला व बाईसाहेबांचे लोकांचे अंगावर धांवले. बाहेर शत्रूचे लोकहि सावध होऊन त्यांनीं हल्ला केला व तोफा सुरू केल्या. बाईसाहेबांचेजवळ बंदूक होती. तिचा उपयोग करीत करीत त्यांनीं भरधांव घोडा फेंकला. त्या हल्ल्यांत पुष्कळ लोक मरण पावले व बाकीचे लोक राहिले ते अंधारांत वाट चुकून जिकडे तिकडे ज्यास वाट फुटेल तिकडे ते पळूं लागले. चोहोंकडे स्वार पळूं लागले. त्यांत बाईसाहेबांचा घोडा कोणता हें इंग्रज शिपायांस उमगले नाहीं. त्यांचा घोडा जो निघाला तो एका क्षणांत इंग्रज फौजेचा गराडा फोडून त्यांस मागें टाकून पुढें चालला. बरोबर एका घोड्यावर पुरी बसणारी दासी होती ती व एक बारगीर असे दोघांचे घोडे पळत होते. गोट फोडून बाहेर जे निघाले ते तिघे कालपीचे रस्त्यानें चालले. त्यासमयीं त्यांचा पाठलाग एक कोसपर्यंत कांहीं इंग्रजांचे स्वार करीत होते; परंतु बाईसाहेबांचे घोडे फार चपळ असल्यानें त्या स्वारांस ते थोडक्याच अवकाशांत दिसेनासे झाले, व रात्रींचा विषय असल्यानें घोडे कोठे गेले याचा पत्ता लागेना, सबब ते निराश होऊन मागें फिरले. बाईसाहेब कोठें गेल्या व त्यांचे सरदार कोठे गेले किंवा ते आपल्याच गोटांत गर्क होऊन गेले आहेत, याचा पत्ता इंग्रज शिपायांस लागेना. याचमुळें पुष्कळ वेळपर्यंत तोफा व बंदुका सुरू ठेवल्या होत्या. उजाडल्यावर शोध करितां बाईसाहेबांचे पदरचे लोकांचीं अनेक प्रेतें सांपडलीं पण मुख्य मंडळी कोठेंहि सांपडली नाहींत.

"इकडे बाईसाहेब उजाडतां उजाडतां झांशीचे मुलुखाचे हद्दीवर एक गांव आहे तेथें जाऊन पोंचल्या. तेथें दत्तक मुलास पाठीचा सोडून महालकरी याचे घरीं त्यास थोडें फराळास घातलें व घोड्यावर नंतर पाऊल टाकतात इतक्यांत पाठलाग करणारे इंग्रजांचे कांही स्वार येऊन जवळ जवळ अंगावरच धडकले! तेव्हां एका क्षणांत तरवारीनें त्यांना घायाळ करून बाईसाहेबांनीं जो घोडा भरधांव सोडला तो काल्पी येईपर्यंत थांबविला नाहीं. एकसारखा सर्व दिवसभर भरधांव घोडा टाकीत रात्रीं बारा घटकांचे सुमारास बाई कालपीस पोंचली. अन्नपाण्याशिवाय चोवीस तास पाठीशीं ओझें बांधून भरधांव घोड्यावर काढले तेव्हां त्या बाईचे शक्तीची हिंमतीची व बारगीरपणाची कमाल समजली पाहिजे." (गोडसे कृत "माझा प्रवास") तात्या टोपे हेहि त्याच दिवशीं कालपीस पोंचले होते.

नंतर दुसरे दिवशीं रावसाहेबांची गांठ घेतली. भेट झाल्यावर राणीसाहेबांनीं नेत्रांत अश्रु आणून आपली तरवार श्रीमंतांपुढें ठेवली व सांगितलें कीं "तुमच्या पूर्वजांनीं ही तरवार आम्हांस दिली. त्यांच्या पुण्यप्रतापानें आजपर्यंत आम्ही तिचा योग्य उपयोग केला. आतां तुमचें आम्हांस साह्य राहिलें नाहीं, याकरितां ती परत घ्यावी." हे शब्द ऐकून रावसाहेबांस मोठा गहिंवर आला आणि त्यांनीं झांशी-वालीचें सांत्वन करून दुसरे दिवशीं आपली सर्व फौज तिचेपुढें उभी केली आणि लढण्याकरितां तिनें मागितलीं तितकीं पथकें तिच्या स्वाधीन केलीं. यानंतर कुंच व गलौली येथें संग्राम होऊन अखेर काल्पीहि कशी पडली ती सर्व हकिगत प्रसिद्ध असल्यानें देण्याचें कारण नाहीं. काल्पी गेल्यामुळें वर्षभर श्रमानें जमविलेला खजिना व दारुगोळ्याचा सर्व सांठा इंग्रजांचे हातीं पडला; ज्या संस्थानिकांच्या व राजे-राजवाड्यांच्या हक्काकरितां ते लढत होते त्यांतल्या एकाहि मोठ्या संस्थानिकानें त्यांना साह्य केलें नाहीं, आणि ज्या जनतेनें धर्मप्रेमानें त्यांना सर्वतोपरीं साह्य केलें त्यापैकीं हजारों लोक, कांहीं रणांत तर कांहीं फासावर लटकले गेले! या लढ्याचा आतां शेवट काय होणार? आणि जर नीट शेवट लावावयाचा तर यापुढें कोणतें पाऊल कसें टाकलें पाहिजे असा आणीबाणीचा प्रसंग आला. म्हणून या प्रश्नाचा विचार करण्याकरितां बंडांतील प्रमुख मंडळी गोपाळपुरास जमली.

त्या मंडळींत रावसाहेब पेशवे, बांदेवाले नबाब, तात्या टोपे, झांशीवाली व इतर कांहीं प्रमुख मराठे व मुसलमान सरदार होते. त्यांत झांशीवालीनेंच अशी कल्पना काढली कीं, काल्पीसारखें एखादें मजबूत स्थळ हातीं असल्याशिवाय बंड-वाल्यांना आणखी वर्ष सहा महिनेहि टिकाव धरितां येणार नाहीं. याकरितां काय वाटेल ती खटपट करून ग्वालेर हातीं घ्यावें. ग्वालेर हें साऱ्या उत्तर हिंदुस्थानचें नाक आहे. आणि शिंदे–होळकरांसारखा प्रमुख संस्थानिक यावेळीं पेशव्यांच्या बाजूला आला तर, पराभूत झालेल्या बंडवाल्याना पुनः हुरूप येईल, इतकेंच नव्हे तर, दक्षिणेंत येऊन इंग्रजांविरुद्ध रान उठवितां येईल. शिंदे सामोपचारानें वश झाले तर ठीकच, नाहींतर ग्वालेर बेलाशक सर करून घ्यावें!"

तात्या टोपे यांनीं पूर्वी ग्वालेर येथून फौज वश करून आणली होती तेव्हां ग्वालेरच्या राजकारणाचा अंतस्थ तलास त्यांनीं घेतला होता. त्यावेळीं भलेपणा राखून त्यांना जितकें करितां आलें तितकें केलें; पण आतां सामोपचाराचाहि

सोक्षमोक्ष होण्याची वेळ आली, शिंद्याला किंवा कोणाहि मोठ्या संस्थानिकाला बंड-वाल्यांना सामील होणें हें साहजिकच मोठें संकट वाटे. कारण त्यानें आहे तेंहि जाण्याची पाळी यावयाची ! याविरुद्ध कटवाल्यांची विचारसरणी अशी होती कीं, राजनिष्ठ राहिल्यानें तरी यापुढें तुमचीं संस्थानें वाचणार कशीं ? इंग्रजानें विश्वास-घात करून इतकीं संस्थानें व जमीनदार बुडविले म्हणून त्यांच्याकरितां तर आम्ही तरवार घेतली ! इंग्रज सर्वच बुडविणार. आज एक तर दुसरा उद्यां, इतकाच फरक. आजवर तुम्ही इमानदारी राखली त्याला केवळ परधार्जिणेपणा, दुःख व पारतंत्र्य यापेक्षां काय फळ आलें ? तुमच्या राजनिष्ठेचें चीज काय झालें? तात्पर्य, याचा निकाल अखेर तरवारीनेंच लागणार ! तरवारीच्या जोराखेरीज इंग्रजाला इमानदारीची किंमत कळतच नाहीं त्याला कोण काय करणार ?

या युक्तिवादाविरुद्ध आक्षेप घेण्यासारखें कांहींच नव्हतें. पण असले प्रश्न केवळ युक्तिवादानें सुटत नसतात. मनुष्याच्या पराक्रमाची धार पुष्कळदां नादान स्वार्थ-बुद्धि बोथट करिते. "होय. आमचें संस्थान बुडणार असलें तरी उद्यांपर्यंत तरी वाट आहेना ? इंग्रजाच्या हातून तें बुडावयाचेंच असलें तर बुडेलहि. पण तुम्हाला सामील होऊन उद्यांचें मरण आजच कां ओढवून घ्यावयाचें ? असें कांहींना त्यांचें मन सांगे. तात्पर्य, त्यावेळीं युक्तिवाद हवा तितका झाला, पण अखेर हे मतभेद दुस्तर ठरले ! शिंदे, होळकर हे पेशव्यांचे सेवक व पेशवे धनी हें नातें केवळ नांवाचें राहिलें होतें. पण प्रत्यक्ष नात्याचा जिव्हाळयाचा संबंध असलेलीं कितीतरी माणसें कांहीं या पक्षास तर कांहीं त्या पक्षास अशीं विभागलीं होतीं. उदाहरणार्थ, ग्वालेरचे सरदार बाबासाहेब आपटे व नानासाहेब पेशवे हे व्याही होते. पण बाबा-साहेबांनीं इंग्रजांची बाजू सोडली नाहीं. उलट त्यांनीं नानासाहेबांना निरोप पाठविला कीं ' सडे याल तर घरदार तुमचें आहे. पण सैन्यानिशीं याल तर माझें सैन्य तुमचें स्वागत करण्याला सिद्ध आहे !" स्वतः दिनकरराव राजवाडे यांचे साडू दिनकररावांचे विरुद्ध पक्षास होते. व पुढें पेशव्यांचा निःपात झाला तेव्हां पेशव्यांच्या स्त्रियांची सेवा करण्याकरितां ते नेपाळांत जाऊन राहिले ! तात्पर्य, हा पक्षविरोध खरोखर आंतडयाला पीळ पाडणारा होता; आणि स्वकीयांतच शत्रुत्वाचा प्रसंग आल्यामुळें तो बिनतोड झाला होता !

यावेळीं रावसाहेब पेशव्यांनीं बायजाबाई शिंदे यांना अत्यंत नम्रपणानें पत्रें

पाठविलीं कीं "यावेळीं आम्हांस कसेंहि करून साह्य करावें. आम्हांस तुमचें राज्य घेण्याची बिलकूल इच्छा नाहीं. आम्हांस दक्षिणेंत जावयाचें आहे." या पत्रांस बायजाबाईनें उत्तर पाठविलें नाहींच पण दिनकररावांच्या सल्ल्यानें तिनें तीं पत्रें इंग्रजांकडे धाडून दिलीं ! ! दिनकरराव दिवाण हा पूर्णपणें इंग्रजांच्या आहारीं गेलेला मनुष्य होता. जयाजीराव शिंद्यांची नाडी त्याच्या हातांत होती, इतकेंच नव्हे तर, आग्र्यास असलेला रेसीडेंट मॅकफर्सन याला दिनकररावांकडून ग्वालेरची रोज खडान् खडा बातमी कळत असे. रावसाहेबांनीं नंतर रामचंद्रशास्त्री साठे यांना बायजाबाईकडे पाठविलें. पण त्याचाहि उपयोग झाला नाहीं. उलट दिनकरराव यांचा हेतु असा होता कीं, या वाटाघाटींना कांहींहि निश्चित उत्तर न देता मोघमपणानें बोलून कालहरण करावें; आणि काल्पी व आग्रा येथून इंग्रजी फौजा आल्यावर पेशव्यांच्या फौजेस कोंडींत धरावें !

तथापि जयाजीराव यांचा स्वभाव फार अधीर होता. सकाळ उजाडते न उजाडते तोंच त्यांनीं पायदळ व तोफखाना घेऊन मुरार नजीक बहादरपूर येथें पेशव्यांची छावणी होती त्यावर चालून गेले. शिंदे आपणांवर स्वतः चाल करून येत आहेत हें रावसाहेबांस प्रथम खरें वाटलें नाहीं. पण तोफेचा गोळा जेव्हां पेशव्यांचे तंबूवरून गेला तेव्हां लक्ष्मीबाई ताबडतोब घोड्यावर स्वार होऊन हिनें नौबत वाजविण्यास हुकूम दिला. व मोठ्या त्वेषानें स्वतः हल्ला करून तोफ बंद पाडली इतकेंच नव्हे तर, जयाजीरावांची अतिशय निर्भत्सना करून त्यांस सोडून दिलें, असें दिनकररावांच्याच एका इंग्रजी चरित्रांत लिहिलें आहे. तात्या टोपे व रावसाहेब स्वार होऊन मैदानांत येतांच कळ फिरल्याप्रमाणें जयाजीरावांचें सर्व सैन्य फितुर झालें. तेव्हां जयाजीराव व दिनकरराव धोलपुरास पळून गेले व बायजाबाई शिंदे वगैरे खाशा मंडळींनीं पळ काढून नरवरच्या किल्ल्याचा आश्रय केला.

इकडे ग्वालेर काबीज झालें पण शहरांत व विशेषतः राजवाड्यांत प्रवेश करणें हें काम अतीशय धोक्याचें होतें. पण लक्ष्मीबाईला भीति हा पदार्थच माहीत नव्हता. हातांत नागवी तरवार घेऊन तिनें शहरांत प्रवेश केला आणि राजवाड्यांत जाऊन आपले पाहरे बसवून, 'सर्व निर्भय आहे. तुम्ही खुशाल यावें' असा पेशव्यांस निरोप पाठविला.

नंतर पेशव्यांचे सैन्यानें दिवाण दिनकरराव, सरदार बळवंतराव माहुरकर इत्यादि क्रांतिविरोधी लोकांचीं घरें पाडून टाकलीं व राजवाड्यांतील खजिन्यांतून कंटिजंट फौजेस आठ लक्ष रुपये वाटले. मुरारवर एक फौज ठेवली तसेंच सर्व दिशांस नाक्याचे ठिकाणीं फौजा रोखून ठेऊन बंदोबस्त केला. कोणी म्हणतात कीं लष्करी बंदोबस्ताकडे लक्ष न देतां पेशव्यानीं ब्राह्मणभोजनांत व नाच तमाशांना सुरुवात केली. पण हें तितकेसें खरें वाटत नाहीं. पण दुसरेंहि असें कीं, चरखारीं कुंच, कालपी, गलोली, इत्यादि प्रत्येक ठिकाणीं पराभव झाल्यावर, आतांपर्यंत पेशव्यांचे फौजेनें रानावनांत राहून, तळहातावर शीर घ्यावें त्याप्रमाणें फार हाल काढले होते. ग्वालेरचा अपूर्व विजय मिळाल्यानंतर दोन दिवस त्यानीं विजयोत्साहांत घालविले;असले तर तें मनुष्यस्वभावाला धरूनच होतें; विजयी शिपायांनीं चैन करावयाची नाहीं तर करावयाची कोणी ? पण ही मनाची स्वस्थता कांहीं त्यांच्या पुढाऱ्यांना नव्हती. ग्वालेरमधील राज्यक्रांति टिकवावयाची तसेंच इंग्रज सैन्याला तोंड द्यावयाचें हें त्यांना माहीत होतें. Uneasy lies the head that wears a crown' हेंच खरें.

इकडे जयाजीरावांनीं धोलपुरास जाऊन तेथून आग्र्यास मॅक्फर्सन याजकडे बोलणें लावलें कीं, इंग्रज सरकारशीं आम्ही राजनिष्ठ राहिलों असतां बंडवाल्यांनीं आम्हांस पदच्युत केलें; तरी इंग्रज सरकारनें पुनः आम्हांस ग्वालेरमध्यें नेऊन राज्यावर बसविले पाहिजे ! तेव्हां रेसिडेंट म्हणाले ' आम्ही कांहीं तुम्हांस राज्यावरून काढले नाहीं. सबब तुम्हांस परत राज्यावर बसविण्याची जबाबदारी कांहीं इंग्रज सरकारानें घेतलेली नाहीं. " हें हरामखोरीचें उत्तर येतांच फाळके सरदार यांनीं रेसिडेंटाला तोंडावर सांगितलें कीं, ही जबाबदारी जर तुमची नाहीं तर दहा हजार कंटिजंट फौज आजवर ग्वालेरमध्यें आमच्या संरक्षणाकरितां ( ? ) ठेऊन जो तिच्याकरितां पगार घेतलात तो कशासाठीं ? राजनिष्ठ आणि बंडवाले या दोघांना जर वेगळें मापच तुमचे पाशीं नसेल तर, बंडवाले करतात तें ठीकच म्हटलें पाहिजे ! तेव्हां कांहींशी लाज वाटून मॅकफर्सननें सांगितले कीं, जयाजीराव व विशेषतः बायजाबाई शिंदे हे जर हल्ल्याचे वेळीं इंग्रजी छावणींत राहतील तर कांहीं विचार करितां येईल.

इकडे ग्वालेर गेल्याची बातमी सर ह्यू रोझ याला कालपीस ता. ४ जून रोजीं कळली. उन्हाळ्यामुळें प्रकृति बिघडून गेल्याकारणानें त्यानें रजा मागितली होती.

पण ही बातमी कळतांच ताबडतोब सैन्य घेऊन तो पुढें आला. कारण यानंतर एकदा पावसाळा सुरू झाला कीं, सैन्याच्या हालचाली अशक्य होऊन जातील. आणि चार महिने ग्वालेर जर पेशव्यांच्या हातीं राहिलें तर, सारा दक्षिण प्रांत पेटण्यास वेळ लागणार नाहीं हें कोणासहि समजण्यासारखें होतें. याकरितां एक एक दिवस लाखाचा समजून निकड करणें अवश्य होतें.

"How the 'impossible' happend has been told. In a moment Sir Hugh realised the full danger of the situation. Grant them delay, and Tantia Topi, with the immense acquisition of political and military strength secured by the possession of Gwalior, and with all its resources in men, money, and resources at his disposal, would be able to form a new army on the fragments of that beaten at Kalpi, and to provoke a Maratha rising throughout India. It might be possible for him, using the dexterity of which he was a master, to unfurl the Peshwa's banner in the southern Maratha districts. Those districts were denuded of troops, and a striking success in the central India would probably decide their inhabitants to pronounce in favour of the cause for which their fathers had fought and bled."

Mallesen—Vol. 5, P. 150

त्याप्रमाणें त्यानें आग्र्याहून सैन्य मागविलें. ता. १४ ला ब्रिगेडियर स्मिथ हा अंत्री येथें येऊन पोंचला व ता. १६ रोजीं ग्वालेर पर्यंत सैन्य पोंचून ता. १७ जून रोजीं लष्करी हालचालींना सुरवात झाली. ग्वालेरचा किल्ला अभेद्य होता. पण ग्वालेर जिंकल्यावर दहाबारा दिवसच झाले असल्यामुळें किल्ल्यांत कोंडून घेणें सुरक्षित नव्हतें व शत्रूच्या राजधानीची खात्री नव्हती. यामुळे पेशव्यांनीं उघडया मैदानांत लढाई देण्याचें ठरविलें व फुलबागेंत मुख्य तळ ठेवला. लष्करच्या पूर्वेस कोटा की सराई चार पांच मैलांवर असून ओढे व वहाळ यामुळे चार पांच उंचवटयाच्या रांगा होत्या. त्या प्रत्येक रांगेवर तोफा ठेवल्या असून तेथील ओढयावरून लष्करला येण्याचे पूल सर्व काढून टाकले होते. या भागाचें आधिपत्य

लक्ष्मीबाईनें घेतलें होतें. इकडे सर ह्यू रोझ यानें मुरारवर हल्ला केला तेव्हां बायजाबाई शिंदे व जयाजीराव यांना पुढें घातलें. यामुळें जो डाव पूर्वी तात्या टोपे यांनीं टाकला तोच उलट पेशव्यांचे वर पडला. कंटिजंट फौज शिंद्याविरुद्ध कसें लढावें म्हणून स्वथ बसली व मुरार सहज सर झालें. स्मिथ याला मात्र कोटा-कीसराईची प्रत्येक टेंकडी लढून घ्यावी लागली.

घोड्यावर पुरुषवेषानें स्वार होऊन प्रखर उन्हांत सर्व दिवसभर लक्ष्मीबाई अविश्रांत श्रम करीत होती. उत्तर हिंदुस्थानांतील उन्हाळा इतका प्रखर असतो कीं, हां हां म्हणतां उन्हाची तिरीप लागून मूर्च्छा येण्यास किंवा आजारी पडण्यास वेळ लागत नाहीं. कित्येक शिपाई घोड्यावर बसल्या बसल्याच गलितत्राण होऊन मान टाकीत. मग त्यांना इस्पितळांत आठ आठ दिवस ठेवावें लागे. कित्येकजण वेडे होऊन बरळूं लागत अशीं वर्णनें इंग्रजांनींच लिहून ठेवली आहेत. अशा परिस्थितींत श्रमाची पर्वा न करितां शत्रूच्या गोळ्यांच्या टप्प्यांत रणरागिणीप्रमाणें सैन्याला प्रोत्साहन देत झांशीवाली फिरत होती असें सांगतात. सारा दिवस उन्हांत श्रम केल्यामुळें पिछाडीस येऊन, तृषा हरण करण्याकरितां सरबत पिऊन लक्ष्मीबाई क्षणभर विश्रांति घेत होती. इतक्यांत हल्ला आला असा पुकारा झाला. त्या-बरोबर दत्तक मुलगा दामोदरराव याला रामराव गोविंद याचे हवालीं करून बाई घोड्यावर स्वार झाली. इंग्रजांच्या आठव्या हुझर पलटणीचे स्वार जे बेफाम सुटले ते कापाकापी करीत व पिस्तुलाच्या गोळ्या झाडीत चालले. यामुळें मराठ्यांची छावणी उधळून गेली. त्यांतच लक्ष्मीबाईचा घोडा अनावर होऊन निघाला तो फुलबागेच्या ओढ्यापर्यंत आला. ओढ्यावरील पूल इंग्रज सैन्याला येतां येऊं नये म्हणून काढून टाकला होता. ओढयावरून उडी मारून न जातां घोडा जो क्षणभर तेथें विचकला तो पुढें निघेना. इतक्यांत हुझर पलटणीचे स्वार येऊन कापाकापीला सुरवात झाली. त्यांत डोक्यावर तरवारीची जखम लागून व पिस्तुलाची गोळी लागून बाई कामास आली.

पुरुषवेष असल्यामुळे, ही लक्ष्मीबाई असेल असें इंग्रज स्वारांच्या त्यावेळीं लक्षांत आलें नाहीं. आणि ते स्वारहि परतले. रात्र पडल्यावर तिच्या सेवकांनीं जवळच गंगादास बाबाचा मठ होता तेथें नेऊन तिची शुश्रूषा केली. पण प्राण अगदीं डोळ्यांत आल्यामुळें तिनें एकवार मुलाची भेट घेऊन प्राण सोडला. जवळच

एक गवताची गंज होती त्यांत तिच्या विश्वासू सेवकांनीं तिला अग्निसंस्कार केला व 'कोणाहि इंग्रजाचा आपल्या शरीरास स्पर्श होऊं देऊं नये' ही तिची शेवटची इच्छा पुरी केली. झांशीवाली पडल्यामुळें पेशव्यांच्या बाजूची साक्षात् वीरश्रीच अंतर्धान पावली असें म्हटलें पाहिजे. केवळ स्त्री म्हणून किंवा 'वीरांगना' म्हणून तिचें कौतुक केलें जातें असें नाहीं. तिच्या धैर्याला उत्तम लष्करी चातुर्य व सेनानायकत्व यांची जोड होती. सर ह्यू रोझ यानें या लढाईचें प्रतिवृत्त लिहून पाठविलें त्यांत "She was the ablest military leader on the enemy side" असे सत्य व गौरवपूर्ण उद्‌गार काढलेले आहेत. मॅलेसननें लढाईची हकिगत देतांना तिच्याबद्दल म्हटलें आहे :—

"Amongst the fugitives of the rebel ranks was the resolute woman who, alike in council and in the field was the soul of the conspirators. Clad in the attire of man and mounted on horseback, the Rani of Jhansi might have been seen animating her troops throughout the day. When inch by inch, the British troops passed through the pass, and when reaching its summit Smith ordered the Hussers to charge, the Rani of Jhansi boldly fronted the British horsemen. When her comrades failed her, her horse, in spite of her efforts, carried her along with others. With them she might have escaped, but that, her horse crossing the canal near the cantonement stumbled and fell. A Husser ignorant of her rank and sex cut her down. She fell to rise no more. That night her devoted followers determined that the English should not boast that they had captured her even dead, burned her body.

Thus died the Rani of Jhansi. Whatever her faults in the British eyes may have been, her countrymen will ever remember that she was driven by ill treatment into rebellion, and that she lived and died for her country."

—Malleson.

ता. १ जून रोजीं ग्वालेर बंडवाल्यांनीं जिंकलें आणि केवळ तीन आठवड्यानंतर ता. १८ जून रोजीं तें त्यांचे हातांतून गेलें ! या पराभवामुळें बंडवाल्यांच्या सर्व भावी आशा व आकांक्षा धुळीला मिळाल्या आणि पळ काढून प्राणरक्षण करणें किंवा इंग्रजांना शरण जाणें एवढे दोनच मार्ग त्यांचेपुढें उभे राहिले. ही पुढील हकीगत फार दुःखद आणि हृदयद्रावक आहे ती यापुढें सांगूं.

## परिशिष्ट

# ग्वालेरचा रेसिडेंट मॅकफर्सन यांचें बंडासंबंधीं मत

मॅकफर्सनच्या आठवणींत म्हटलें आहे " शिंदे ग्वालेर सोडून पळून गेल्यामुळें रावसाहेब पेशव्यांची फार निराशा झाली. नवीन दिवाण नेमण्याचे वेळीं काढलेल्या हुकुमांत त्यांनीं शिंद्यांचा ' आमचे अत्यंत एकनिष्ठ सरदार ' असा मोठ्या गौरवानें उल्लेख केला होता. ग्वालेरमध्यें येऊन राज्य ताब्यांत घेण्याबद्दल बायजाबाई शिंदे यांनीं रावसाहेब पेशव्यांनीं पत्रें पाठविलीं पण तीं पत्रें तिनें सर हॅमिलटनकडे पाठवून दिलीं. ग्वालेरमध्यें रावसाहेबांनी सैन्याला लुटालूट करूं दिली नाहीं, पण दिनकरराव व माहूरकर यांचीं घरें जमीनदोस्त केलीं. पेशव्यांनी शिंद्यांचे सर्व अधिकारी तसेच कायम ठेवले, फक्त सर सेनापतिपद तात्या टोपे यांना दिलें. खजिन्यांतून स्वतःच्या फौजेला व शिंद्यांचे फौजेला पगार म्हणून वीस लक्ष रुपये वांटले. शिवाय सुमारें पंचवीस तीस हजार रुपयांचे त्यांना जवाहीर मिळाले.

( आठवणी पृ. ३३४ )

## मॅकफर्सनचें पत्र

आग्रा २८ फेब्रुवारी १८५८

" टाईम्समध्यें कोणी एकजण लिहितो, कीं आयोध्या बुंदेलखंड या प्रांतांप्रमाणें पंजाब प्रांतांतहि लोकांच्या जमिनीवरील हक्कांवर आम्ही गदा आणली असती तर, लखनौ कानपूरच्या लढाया लढण्यापेक्षां हॅवॅलोक याला कलकत्यापासूनच सुरवात करावी लागली असती ! म्हणजे सारा देशच आमच्यावर उलटला असता ! हें मत अगदीं बरोबर आहे असें मला वाटतें. लोकांप्रमाणें बंगालच्या फौजेंतहि असंतोष पसरला म्हणून सैन्यानें बंड केलें असें समजूं नका. लोकांत आधींचा सार्वत्रिक असंतोष

नसता तर केवळ नुसत्या काडतुसांच्या ठिणगीमुळें आग पेटली नसती. पण या वादग्रस्त विषयाला अंत नाहीं. त्याला हजार कारणें आहेत. पण दरएक कारण आपापल्या पुरतें खरे असलें तरी सैन्यांत, समाजांत, किंबहुना हरएक ठिकाणीं आमच्याबद्दल अप्रीति व असंतोष नसता तर बंड झालेंच नसतें. आणि याहि असंतोषाला कारण म्हणजे लोकांचे आम्ही बुडविलेले जमीनदारी हक्क, माफी हक्क वगैरे होत."

( २ )

ता. ३ मार्च १८५८

"शक्य असेल तर लॉर्ड कॅनिंगच्या कौन्सिलांतील कोणीहि अधिकाऱ्यानें माझ्या एका प्रश्नाचें उत्तर द्यावें. एप्रिल महिन्यांत बंडाच्या सूचना अनेक ठिकाणांहून सतत त्यांचे कानावर आदळत असतांना, सिमला व अंबाला येथून युरोपियन फौज ताबडतोब आणवून त्यांनीं ती दर एक मुख्य शहरीं मॅगेझीनवर कां ठेवली नाही? आणि शहरांतील सर्व अधिकाऱ्याना खबरदार राहण्यास सक्त हुकूम कां दिले नाहींत? हें बंड फक्त फौजेपुरतें आणि केवळ मीरत सारख्या एखाद्या शहरापुरतें असेल असें सरकारला वाटलें, पण या बंडाचीं पाळेंमुळें अगदीं खेडोपाड्यापर्यंत पसरलीं होतीं, हें आतां जरी सरकार उमगेल तरीहि या बंडाचा पुष्कळच उपयोग झाला म्हणायचा! The mutiny arose in the villages, not in the cantonements."

( आठवणी पृ. ३४५ )

( ३ )

## धर्मासाठीं सर्वांची आशा सोडली

महाराणी लक्ष्मीबाईबद्दल 'माझा प्रवास' या छापील पुस्तकांत एक सुंदर आठवण आली आहे. पुराव्याच्या कायद्याचे कसोटीनें त्यांतले शब्द अस्सल म्हणजे पहिल्या प्रतीच्या किंमतीचे आहेत. पण दुसऱ्या एका दृष्टीनें त्यांतील शब्द मोत्यांच्या सराप्रमाणें बहुमोल वाटतात. कारण "**हिंदू धर्माचा अभिमान धरून या कर्मास मी प्रवृत्त झालें**; आणि त्याकरितां वित्ताची, जीविताची, सर्वांची आशा सोडली" असे महाराणी लक्ष्मीबाईचे स्पष्ट शब्द त्यांत

नमूद आहेत. 'हेतूचा पुरावा' याहि दृष्टीनें या शब्दांचें महत्त्व असल्यानें गोडसे भटजींच्याच शब्दांत ही हकीगत पुढें दिली आहे:—

"काल्पीचा रस्ता धरल्यानंतर दर मजल जातां जातां एके दिवशीं सायंकाळीं एका खेडेगांवीं वस्तीस पोंचलों. कालपी सुमारें सहा कोस राहिली होती. गांवाबाहेर चिंचेची झाडी आहे तेथें स्वयंपाक तयार करून भोजनें झाल्यावर स्वस्थ निद्रा केली. पहांटेच्या प्रहर रात्रीच्या सुमारास एकाएकी मोठा गलका झाला, त्यासरसे उठून पहातों तों शेंकडों स्वार रस्त्यानें उधळत चालले आहेत असें दृष्टीस पडलें. हें काय अरिष्ट आलें आहे याची कल्पना होईना. तसेंच घाईघाईनें आपलें सामान गुंडाळून खाकोटीस मारून शिपाई लोकांच्या बरोबरीने पळ काढूं लागलों. कांही वेळानें असें समजलें कीं पेशव्यांची व इंग्रजांची चरखारीवर लढाई होऊन त्यांत पेशव्यांचा मोड झाला. त्यांत झांशीवाली राणीहि होती. ती फौज परत काल्पीवर चालली आहे. मग आम्ही किंचित स्वस्थ होऊन झुमुझुमूचे सुमारास एका विहीरीवर पाणी काढून शौचमुखमार्जन करण्यास बसलो, तों पांचचार स्वार विहिरीवरून जात होते त्यांत झाशीवाली दृष्टीस पडली. तिनें सर्व पठाणी पोशाख केला होता व सर्व अंग धुळीनें भरलें होतें. तोंड किंचित आरक्त असून म्लान व उदास दिसत होतें. तिला तृषा फार लागली असल्यानें घोड्यावरूनच तिने तुम्ही कोण आहां, असा प्रश्न केला. तेव्हां आम्ही पुढें होऊन हात जोडून विनंति केली कीं, आम्ही ब्राह्मण आहों. आपणांस तृषा लागली असल्यास पाणी काढून देतों. बाईसाहेबांस ओळख पटली व त्या खालीं उतरल्या. मी रसी व मडकें घेऊन लागलींच विहिरींत सोडणार तों बाईसाहेब म्हणाल्या कीं, तुम्ही विद्वान ब्राह्मण, तुम्ही मजकरितां पाणी काढूं नका. मीच काढून घेतें! हे तिचे उदारपणाचे शब्द ऐकून मला फार वाईट वाटलें, परंतु निरुपायास्तव रसी व मडकें खालीं ठेवलें. बाईसाहेबांनीं पाणी काढून त्या मृण्मय पात्रांतून ओंजळीनें पाणी पिऊन तृषा हरण केली. दैवगति मोठी विचित्र आहे. नंतर मोठ्या निराश मुद्रेनें बोलल्या, कीं 'मी अर्धा शेर तांदुळाची धनीण, मजला विधवेला विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची कांही जरूर नव्हती. परंतु **हिंदुधर्माचा अभिमान धरून या कर्मास प्रवृत्त झाले**. व याजकरितां वित्ताची, जीविताची, सर्वांची आशा सोडली. आमच्या पदरीं पातकच फार म्हणून ईश्वर यश देत नाहीं. चरखारीवर मोठी लढाई झाली. परंतु आम्हांस यश

आलें नाही. काल्पीवरहि इंग्रज चालून येत आहे. तेथे थोडक्यांतच जंग होईल. जे अदृष्टांत लिहिलें असेल तें होईल!"

असें म्हणून बाईसाहेब उठल्या, आम्हीहि उभे राहिलों. इतक्यांत आठवण होऊन आम्हांस विचारलें कीं, तुम्ही गरीब भिक्षुक ब्राह्मण, तुम्हांस घोड्यावरहि बसतां येत नाही. काल्पीस काय हेतु धरून जात आहां? असा प्रश्न करतांच आम्ही सांगितलें कीं काल्पीस दक्षिणी ब्राह्मण पुष्कळ आहेत; त्यांजपासून दक्षणा मिळेल ती मिळवून यमुना उतरून गंगास्नानार्थ ब्रह्मावर्त क्षेत्रीं जाणार आहों. बरे आहे. काल्पी मुदामांत यावें असें म्हणून बाईसाहेब चालत्या झाल्या." ( पृ. ९५ )

# ११

## बंडाची अखेर

ग्वालेरच्या लढाईंत पराजय झाल्यामुळें बंडवाल्यांच्या सर्व आशांची इतिश्री झाली. ज्याला हिंदुस्थानांत वजन आहे असा एक देखील संस्थानिक आपणांस येऊन मिळत नाहीं किंवा पाठीशीं घालीत नाहीं हें यापुढें उघड झाल्यामुळें बंडाचें नशीब ठरल्यासारखेंच झालें! ता. १ नोव्हेंबर १८५८ रोजीं कंपनीसरकारचें राज्य राणी सरकारनें आपल्या हातीं घेऊन जाहीरनामा काढला. कंपनीची सनद १८५४ सालींच संपली होती. पण अलीकडे मुलुख जिंकण्याकरितां अनेक लढाया झाल्या त्यामुळें कंपनी सरकार कर्जबाजारी झालें. नवे आठ दहा कोट रुपये ब्रिटिश सरकारनें कंपनीला उसनवार द्यावे तेव्हां हिंदुस्थानचें राज्य चालणार अशी स्थिति येऊन ठेपली. त्यांतच १८५७ सालचें बंड उद्भवलें यामुळें पार्लमेंटांत इतका गवगावा झाला कीं, त्यापुढें कंपनी सरकारची सनद पुढें वाढवून मिळत नाहीं हें अगदीं निश्चित झालें. जुलुमी राज्य आणि कर्जबाजारीपणा यामुळें कंपनीचा शेवट झाला. राणीच्या जाहीरनाम्यामुळें सामान्य लोकांना असें वाटलें कीं इंग्रजांच्या हातून बंड मोडलें हें खरें पण या महायज्ञांत कंपनीसरकारचीहि आहुति पडली; विशेषतः

राणीच्या जाहीरनाम्यांत, जुने तह, सनदा, वहिवाटी, वारसाहक्क, धर्मविषयक चालिरीति व वहिवाटी यांना आम्ही धक्का लावणार नाहीं, जसा आमचा धर्म तसाच तुमचाहि मानूं, हे जे शब्द व्हिक्टोरिया राणीनें उदारपणें लिहून दिले होते त्यामुळें ज्यांनीं याकरितां बंड केलें त्यांचें नैतिक समर्थन झाल्यासारखें वाटलें. ज्यांनीं बंडांत भाग घेतला होता पण प्रत्यक्ष खून व अत्याचार यांच्याशीं ज्यांचा संबंध नव्हता, त्यांना या जाहीरनाम्यानें सरसकट माफी दिली होती. यामुळे बंडाशी अप्रत्यक्ष संबंध येऊन जीवाच्या भीतीमुळें ज्यांची धांवपळ चालली होती त्यांना तर गळफांस तुटावा इतकें बरें वाटलें. कारण त्याकाळांत इंग्रज लोक सूडाने इतके वेडावलेले होते कीं हजारो माणसांना नाहक फांशी जावें लागलें होतें !

कंपनी सरकारचें राज्य राणीसरकारनें आपल्या हातीं घेतलें म्हणजे काय झालें ? हें सामान्य लोकांपैकीं फारच थोड्या लोकांना त्यावेळीं समजलें असेल. त्यावेळच्या बजेटच्या आंकड्यावरून असें दिसतें कीं बंडामुळें येथें पांचकोट रुपये कंपनीसरकारला खर्च आला. विलायतेंतून जी ब्रिटिश फौज इकडे आली ती केवळ हिंदुस्थानातच लढली असें नाहीं. प्रथम चीन पर्शिया येथें लढाया झाल्या व नंतर या फौजांचा हिंदुस्थानांतील बंड मोडण्याकडे उपयोग झाला. पण विलायतेत त्यांचें सहा महिने शिक्षण झाल्यापासून तो पुनः परत विलायतेंत येऊन पोचेपर्यंत, जो सुमारे पांच कोट रुपये खर्च झाला तोहि हिंदुस्थानवरच कर्ज म्हणून बसला. स्टॉकचे ३० कोट रुपये धरले. अशा रीतीने एकंदर चाळीस कोट रुपये परस्पर हिंदुस्थानच्या डोक्यावर कर्ज बसवून, स्वतः एक दमडी खर्च न करितां हिंदुस्थानचें राज्य राणी सरकारने विकत घेतलें !! हिंदुस्थान हा तर बोलूनचालून गुलाम ! एका मालकाकडून दुसऱ्याने तो विकत घेतला. पण त्याच्या किंमतीची फेड मालकाच्या खिशांतून झाली नाही; ती त्याच्या डोक्यावर चाळीस कोट रुपायांच्या कर्जाचा नवा बोजा लादून केली ! 'जिताच्या डोक्यांत धोंडा' अशी म्हण आहे ती कांहीं खोटी नाही.

The strangest clauses of this Act ( Act for the better government of India of 1858 ) are the financial clauses. It was provided that the dividend on the capital stock of the East India Company, and all the bond debenture and debt of the company in Great Britain and all the territorial and other debts of the Company should be

" charged and be chargeable upon the revenues of India alone " ...

India in Victorian Age—P. 230

पूर्वी वॉरन हेस्टिंग्जच्या अन्यायांविरुद्ध बर्क व शेरिडन यांनीं पार्लमेंटांत हिंदी लोकांची बाजू मांडली. त्याचप्रमाणें १८५७ चे बंडानंतर हिंदी लोकांची कड घेऊन बोलणारे सर जॉर्ज विंगेट व जॉन ब्राईट हे उदारधी गृहस्थ निघाले:—

But a greater man than Sir George Wingate spoke on the subject of the mutiny-expenditure in his own frank and fearless manner. " I think " said John Bright, " that the 40 millions which the revolt will cost, is a grievious burden to place upon the people of India. It has come from the mismanagement of the Parliament and the people of England. If every man had what was just, no doubt that 40 millions would have to be paid out of the taxes levied up on the people of this country."

John Bright's speech on the East India Loan 1859.

अर्थशास्त्राच्या दृष्टीनें या स्थित्यंतरांतील गोम सामान्य मनुष्यांना न समजली तरी, त्यावेळी जीं राजकारणी माणसें होतीं त्यांना ' राणीचा जाहीरनामा ' हें कपट आहे, बंडवाल्यांना फोडण्याकरितां त्याचा उपयोग व्हावयाचा आहे, झालेला कोणताहि अन्याय दुरुस्त करण्याची सरकारची इच्छा नाहीं, हें स्पष्ट कळत होतें. राणीचा जाहीरनामा निघाल्याबरोबर हजरत महाल बेगमेने उलट जाहीरनामा काढून राणीच्या जाहीरनाम्याचें मुद्देसूद रीतीनें खंडण केलें. तिनें लिहिलें—" नवें राज्य झालें म्हणजे झालें तरी काय ? कलकत्यास गव्हर्नर जनरलापासून तों अगदीं खेड्यांतील शिपायांपर्यंत जर सर्व अधिकारी पूर्वींचेंच आहेत तर ' नवें राज्य ' झालें याला अर्थ कसला ? राणीकडे राज्य गेल्याने कंपनी सरकारने केलेला कोणता अन्याय नाहींसा झाला ? कोणता जुलूम दुरुस्त झाला ? का लखनौवाल्यांना त्यांचे राज्य परत मिळाले ? यापैकी काय झालें ? पुढें या गोष्टी आम्ही करणार नाहीं असल्या खोटया वचनांना जामिनकी कोणती ? एका हाताने सरकारने सरसकट बंडवाल्यांना माफी दिली; व दुसऱ्या हाताने 'जर खून व अत्याचार यांशी

संबंध नसेल तर' अशी अट घातली, तर यांतून कोण निसटून जाऊं शकेल? कोण निरपराधी हेंहि ठरविणारे पुनः इंग्रजच ना? अगदीं क्षुल्लक गुन्ह्याची देखील इंग्रजांनी माफी दिली, किंवा आजवर कधीहि कोणाला क्षमा केली ही गोष्ट स्वप्नांत देखील घडलेली कोणी कधी ऐकलेली नाही! म्हणून या जाहीरनाम्यावर कोणीहि विश्वास ठेवूं नये.'' असें स्पष्टपणें बेगमेनें सर्वांस जाहीर केलें.

तथापि इंग्रजांशी युद्ध पुढें चालविण्याची बाब बहुतेक अशक्यप्राय दिसत असल्याकारणानें या माफीच्या जाहीरनाम्यामुळें अनेकांना मोह पडला. राणीच्या जाहीरनाम्यानंतरहि बंडवाले फौजा जमा करून वर्षसहा महिने भटकतच होते. धर्मप्रेमाने प्रेरित होऊन किंवा स्वातंत्र्यप्रेमाने त्यांनी या कार्यात उडी घेतली, पण त्यांच्या अपेक्षेप्रमाणें इराण, अफगाणिस्तान, नेपाळ किंवा कोणीहि परराष्ट्राने येऊन त्यांना मदत केली नाही. ग्वालेर, इंदूर किंवा राजपुतान्यांतील सर्व हिंदु संस्थाने, तसेंच हैद्राबाद, भोपाळ, पतियाळा, झिंद वगैरे मुसलमानी संस्थानें तटस्थ राहिलीं; इतकेंच नव्हे तर त्यांनीच इंग्रजांना मुख्यतः मदत करून हें बंड मोडलें! सामान्य जनतेंतहि स्वातंत्र्य युद्धाची कल्पना तितकी खोल पसरली नव्हती, यामुळे बंडवाल्यांनीं केलेला हा महान् प्रयत्न फुकट गेला. तात्या टोपे, रावसाहेब पेशवे, फिरोजशहा, लखनौवाली बेगम ही मंडळी कित्येक दिवस आठ दहा हजार फौजेनिशी रानावनांत भटकत होती, आणि स्वसंरक्षणाचा उपाय पाहात होती. तात्या टोपे यांनीं नर्मदा ओलांडली तेथपर्यंत वरसईसर गोडसे त्यांजबरोबर असून त्यांनी हकीकत दिली आहे त्यांत म्हटलें आहे कीं, इंग्रजांच्या माफीच्या जाहीरनाम्यावरून कैक लोक बंड सोडून घरीं गेले. पलटणी लोकांजवळ लुटीपासून अर्थ पार झाल्याने वेळचें वेळेवर हुकूम उठत नाहीसा झाला. तरी रावसाहेब माघारे फिरले. सातपुड्यांत महिना पंधरा दिवस राहिले. नंतर झांशी व सागर याचें दरम्यान जंगल बहुत आहे त्याचे आश्रयाने राहावें असा विचार करून तेथे पोंचले. तों फौज फार कमी झाली. कितीएक पलटणी लोक पळून गेले. इंग्रजांनी जाहीरनामा लावला होता कीं, ज्या लोकांस आमचें भय वाटत आहे त्यांनीं भय सोडून, शिपाईपणाचा ड्रेस टाकून, हत्यारविरहित होऊन खुशाल आपापले घरीं जाऊन निर्भयपणाने राहावें. त्यावरूनहि कैक लोक बंड सोडून घरीं गेले. तेव्हां आम्हीहि ब्रम्हावर्ताकडे वळलो. होप ग्रँट यानें यासंबंधीं लिहिलें आहे कीं, "केवळ बंडाला लोक सामील झाले हाच गुन्हा असें मानण्याचें धोरण आम्हीहि यानंतर सोडून दिलें, आणि अनेक लोकांना घरोघर जाऊं दिलें यामुळें बंड

जवळ जवळ संपलेच अगदीं खुनाशींच ज्याचा संबंध पोंचत असेल त्यालाच केवळ आम्ही पकडत होतो. ”

बहुजन समाजाच्या दृष्टीनें जरी बंड संपलें तरी बंडांतील प्रमुख पुढारी माणसें म्हणजे त्रिवर्ग पेशवे बंधु, तात्या टोपे, हजरत महाल बेगम, खान बहादुर खान ही सर्व रोहिलखंडांत मोकळीच होती. त्यांचा परिवार म्हणजे सैन्य, आश्रित, नोकर चाकर वगैरेहि कांही थोडे नव्हते. कमींत कमी हे लोक वीस पंचवीस हजार असावेत. यांतील अनेक लोक भूमिगत झाले व ज्यांचेपाशीं जमाव होता त्या खाशानीं गनिमी काव्याच्या लढाईस सुरवात केली. If heard melodies are sweet those unheard are sweeter still हें वर्णन अशा गनिमी काव्याच्या नवलकथांना समर्पकरीतीनें लागूं शकतें. जनतेंत बंडवाल्या पुढाऱ्यांबद्दल जो एक आपलेपणा होता त्यामुळे अशीहि एक दोन वर्षे निभलीं. तात्या टोपे हा रावसाहेब पेशव्यांचे नांवानें खुशाल एक “ प्रतिसरकार ” स्थापून जाहिरनामे काढीत होता व फौजफांटा जमा करून खंडणी वसूल करीत होता. “ कोठेंहि गेलें तरी गांवकरी आम्हाला त्यांची माहिती सांगत नसत. बंडवाल्यांना मात्र ते हवी ती मदत पुरवीत. जनतेची सहानुभूति निःसंशय त्यांचेकडेच होती, ” असें डॉ. सिल्व्हेस्टर यानें आपले आठवणींचे पुस्तकांत लिहिलें आहे. पण संघटित सत्ताधीश सरकार आणि गनिमी काव्यानें लढणारे देशप्रेमी असहाय लोक यांचा सामना फार काळ लांबत नाहीं. उमाजी नाईकाच्या पराक्रमाप्रमाणें अशा गनिमी हालचालीचें स्वरूप रोमहर्षक व कौतुकास्पद असलें तरी तो पराक्रम व्यक्तिविषयक असतो व त्याचा दारुण शेवटहि ठरलेला असतो ! “ मराठ्यांचे शेवटचे सेनापति ” अशी पदवी मिळवून तात्या टोपे यांनीं इतिहासांत आपलें नांव अजरामर केलें आहे. म्हणून त्यांची ती हकीगत पुढील प्रकारणांत सांगू.

# २०

## ‘मराठ्यांचे शेवटचे सेनापति’—तात्या टोपे

तात्या टोपे हें नांव उच्चारलें म्हणजे एक दुर्दम, पराक्रमी व कर्तबगार व्यक्ति डोळ्यासमोर उभी राहते. मराठ्यांचे हे शेवटचे सेनापति. आणि मराठ्यांचा जो सुप्रसिद्ध लढाऊ गुण ‘गनिमी कावा’ तो त्यांच्या अंगीं फार उत्तम रीतीनें वसत होता. उगाच वडाची साल पिंपळाला लावण्याकरितां ऐतिहासिक व्यक्तींना अतिशयोक्तीचीं विशेषणें देऊन स्वतःचें समाधान करण्याचा हा प्रकार नव्हे. तात्या टोपे यांचे प्रतिपक्षी जे इंग्रज त्यांनीं त्या वेळी जीं वर्णनें लिहिलीं आहेत तीं पुराव्याकरितां केव्हांहि ग्राह्य मानलीं पाहिजेत. तात्या टोपे यांना पकडल्याची बातमी कळल्याबरोबर झांशी जिंकणारा इंग्रजी सेनानायक सर ह्यू रोझ यानें एका खाजगी पत्रांत असे उद्गार काढले होते कीं, “सर्व बंडवाल्या पुढाऱ्यांत तात्या टोपे यांचे अंगीं विलक्षण धडाडी, कर्तबगारी व दुर्दम इच्छाशक्ति होती, आणि त्यांचें संघटनाकौशल्य तर वाखाणण्यासारखें होतें.”

“Of all the rebel chiefs who acted a part in the rebellion, Tantia possessed the greatest enterprise as reg-

ards initiation, and the most enduring resolution in character. His talents for organisation were also remarkable."

१८५७ सालच्या विद्रोहापर्यंत जसा नानासाहेबांचा उदय झाला नाही, तसा तात्या टोपे यांचाहि झाला नाही. ब्रह्मावर्ताच्या जहागिरींत नानासाहेबांचें पडेल तें काम खासगी कारभारी म्हणून ते करीत. कानपूरची पहिली लढाई होईपर्यंत नानांच्या दरबारीं अजीमुल्लासारख्या मुसलमानांचें प्राबल्य अधिक होतें. पण नंतर सर्व सूत्रें तात्या टोपे यांचे हातीं आलीं तेव्हां त्यांच्या कर्तबगारीला अधिक वाव मिळाला. कानपूर ब्रह्मावर्त पडलें तेव्हां त्यांनीं काल्पी हें केंद्र निर्माण केलें, आणि जेव्हां काल्पीहि पडली तेव्हां ग्वालेर हस्तगत करून तेथें नव्या राज्याची स्थापना केली! असा हा मातींतून सुवर्णनगरी उत्पन्न करणारा, निराशेंतून आशेची सृष्टि निर्माण करणारा अजब किमयागार होता! पुढें ग्वालेर पडलें तेव्हां आशेचा सर्वच खेळ आटोपला. लढाईंत जय मिळत गेल्यानें सैनिकांत कांहीं तरी उत्साह टिकविता येतो, पण जय मिळण्याची काडीमात्र आशा नाहीं अशा दुर्धर स्थितींत धैर्यानें परिस्थितीला तोंड देणें हें फार अवघड आहे! महाराष्ट्राच्या अंगीं जो विशेष गुण आहे तो म्हणजे 'विपदि धैर्य' हाच होय. 'अनेक पराजयांनीहि अपराजित' असलेली तात्यांची बुद्धिमत्ता व विपत्कालचें धैर्य पाहून विस्मय वाटल्याखेरीज राहात नाहीं. तात्या टोपे यांच्या गनिमी काव्याच्या लढायांच्या हकिगती अतिशय चित्तवेधक आहेत व शेवटची हकीकत तर फारच करुणास्पद आहे.

ग्वालेरच्या लढाईंत पराजय झाला तेव्हां मुख्य मंडळी निरनिराळ्या टोळ्या करून अनेक दिशांना पांगली. रामराव गोविंद व रघुनाथसिंग हीं कांहीं माणसांनिशीं झांशीवालीचा मुलगा दामोदरराव ऊर्फ आनंद याला घेऊन निवाऱ्याच्या आश्रय-स्थानाकडे गेलीं. रावसाहेब व तात्या टोपे जावरा अलीपूरकडे पळाले. बाळासाहेब हे नानासाहेबाबरोबरच या वेळीं अयोध्या रोहिलखंडांत होते. आतां पळाला सुरुवात झाली. राज्यसाधनाचा हेतु व आशा आतां संपलीच होती प्राणरक्षण हेंच सर्वस्व झालें होतें. १८५८ चे जूनपासून १८५९ चे मार्चअखेरपर्यंत फौजा हाताशीं घेऊन तात्या टोपे भटकत होते. उत्तरेस अलवार तों दक्षिणेस नर्मदेच्या पलीकडे नागपुरापर्यंत, त्याचप्रमाणें पश्चिमेस उदेपूर ते पूर्वेस सागरपर्यंत, एवढया टापूंत भिंगरीप्रमाणें दररोज केव्हां चाळीस मैल, तर केव्हां साठ मैल वेगानें

त्यांच्या हालचाली सुरू होत्या. तीन हजार मैलांचा हा प्रवास झाला असेल! इंग्रजांच्या सात आठ फौजा त्यांचेमागें वर्षभर त्यांनीं नाचवत ठेवल्या होत्या. हातीं शस्त्रसंभार नाहीं, सैन्य नाहीं, पैसा नाहीं, मित्र नाहींत, कोणी मातबर पुढारी व सहकारी जाग्यावर उरले नाहींत अशा बिकट परिस्थितींत, मागें निराशा व पुढें मृत्यु मूर्तिमंत उभा असतांना तात्या टोपे यांनीं गनिमीकाव्याने दहा महिने नुसता धुमाकूळ मांडला होता. एकप्रकारें ती मृत्यूशींच शर्यत होती. लागोपाठ पांच सहा दिवस दररोज चाळीस चाळीस मैलांची मजल मारून, आज या ठिकाणीं तर नंतर अकस्मात् दीडशें मैल दूर, असें इंग्रजांना त्यांचें धूमकेतुसारखें दर्शन घडत असे. त्यांच्या चपळ हालचालींना रसेल यानें Forked Lightening म्हणजे, क्षणार्धांत शाखापल्लवित होणाऱ्या विद्युल्लतेची उपमा दिली आहे. गनिमी काव्याला इतकें समर्पक विशेषण कोणी क्वचितच दिलें असेल.

तात्या टोपे यांच्या पाठलागाचें पुढील वर्णन वाचण्यासारखें आहे—

An officer who took part in Tantia Tope's pursuit wrote—" Each fresh commandant who took the field fancied that he could catch Tantia; prodigious marches were made, officers and men threw aside all baggage, even their tents, and accomplished upwards of forty miles daily. The rebels did fifty ! The end was, all our horses were sorebacked, and a rest of a week or ten days rendered absolutely necessary. Then came a new aspirant for a C. B. and Tantia's head, who brought fresh troops and camels in the field. He perhaps not only had to chase Tantia, but to keep clear of the other forces commanded by a senior in rank to himself. It was wonderful the amount of energy that was thrown into the pursuit, and the hundreds of dead camels strewn over every jungle track : Roads were no object, or rivers either, to pursued or pursuers. On they went until dead beaten ! Occasionally some one more fortunate than the rest had the luck to catch up the fugitives and cut up stragglers, but it was always in heavy jungle. They had the best of in-

formation and never trusted to the open country when any force was near. We had the very worst of information, even in the territories of professedly friendly Rajas. *Verily the sympathy of the people was on their side.*"

—*Memoirs of Dr. Sylvester.*

असे हे रणशूर तात्या टोपे किती तरी दिवस इंग्रजांच्या हातीं लागले नाहींत. त्याना पकडण्याकरितां एक लाख रुपयांचें बक्षीस सरकारनें लावलें होतें! पण सामान्य जनतेपैकीं कोणींहि त्यांचा विश्वासघात केला नाहीं. कोणी कशीहि त्यांना मदत पोंचवी. राजेलोकांकडून जी मदत इंग्रजांना मिळणार नाहीं अशी हरएक मदत त्यांना रानावनांतले शेतकरी आणि वनचर करीत. कारण त्यांना हें माहीत होतें कीं, तात्या लोकांचे पाठीराखे आहेत आणि इंग्रजांशीं ते स्वराज्याकरितां झगडत आहेत!

अखेर सैन्यांतील लोक कंटाळले व निघून जाऊं लागले. सदैव पळणें हें त्र जीवन कसें होऊं शकेल? रावसाहेब पेशवे बरोबर होते. त्यांच्याशीं कुरबुर व अखेर भांडणें होऊं लागलीं. पडना काळ व विनाश यांचें हें निशाणच आहे. अखेर परोणच्या जंगलांत राजा मानसिंहाची गांठ पडली. त्यांनीं दोघांनीं कितीतरी गोष्टी केल्या असतील, अनुभविल्या असतील पण आज त्याचें काय झालें? आणि पुढचे दिवस आतां कसे काय जाणार? मानसिंह या विचारांत होना व तात्या टोपे यांना तर हा विचार रोजचाच होता. तथापि सिरोंज येथें फौज सोडून देऊन चार दिवस त्यांनीं निवांतपणें मानसिंहाकडे विश्रांति घेण्याचें ठरविलें. नेपिअर व मीड यांचे हाताखालची इंग्रजी फौज या वेळीं परोणपासून अगदीं जवळ, सुमारें अर्ध्या किंवा एक मैलाचे अंतरावरच होती. पण पांच आठवडे तात्या परोणच्या जंगलांत आहेत ही बातमी त्यांना कोणीहि कळविली नाहीं, याचे उलट, तात्यांचे हस्तक व हेर मात्र मीडच्या फौजेंत होते. त्यांचेकडून तात्यांना बातम्या कळत असत. कदाचित् मानसिंहाकडूनहि कांहीं बातम्या कळत असतील. एरवी पांच आठवडे परोणच्या जंगलांत त्यांना निर्वेधपणें काढतां आलें नसतें!

पण फितूर खेळविणें हें शस्त्र दुधारी आहे. साप खेळविणारा गारुडी अखेर सर्पदंशानें मरण पावतो त्याप्रमाणें, हेरांचीं सूत्रें नित्य चाळविणारालाहि एखादे वेळीं

स्वतःचें कितुरांच्या जाळ्यांत अडकण्याची पाळी येते. मानसिंहाकडून अनेक गोष्टी तात्या टोपे ऐकत. पण स्वतः मानसिंह मीड यांचेशी बोलण्यांत किती पुढें गेला होता व स्वतःची मान त्यानें किती अडकावून घेतली होती हें मात्र त्याने उघड केलें नाहीं. तात्यांनाहि तो अंदाज आला नाही असें दिसतें.

परोणच्या जंगलांत मानसिंहाचा चुलता अजितसिंह व पेंढाऱ्यांचा वृद्ध पुढारी नारायणसिंग यांचे पाठलागावर मीड असतां प्रथम नारायणसिंग त्याचे हातीं लागला. व त्यानें नंतर मानसिंहाचीं बायकामुलें कोठें राहतात तें ठिकाण जनरल मीड यास सांगितलें. नायब कमाविसदार प्रभुलाल याचीहि जनरल मीड यास फार मदत झाली. हीं बायकामुलें इंग्रजांचे हस्तगत झाल्यामुळें मानसिंहहि सहजच गळाला लागला. मीड याला कळून चुकलें होतें कीं, पाठलागांत तात्या टोपे कोणालाहि सांपडणें अशक्य आहे. कितुरीनें सांपडले तर ते सांपडतील. पण तेंहि कदाचित्. म्हणून त्यानें उगीच एक खडा टाकून पाहण्याचें ठरविलें. मानसिंहाला तो म्हणाला, 'तुम्हीं लोकांनी राजरोस बंड केलें. सरकारनें तुमच्यावर दया तरी आतां करण्याचें काय कारण आहे? तुमच्या मदतीची सरकारला काय पर्वा आहे? स्वतःच्या बळावरच त्यांनीं हें बंड मोडून काढलें." तेव्हां मानसिंहानें आपण राजनिष्ठ राहूं असें अगदीं गयावया करून सांगितलें 'पण या राजनिष्ठेची खात्री काय? जामिनकी कशानें पटविणार?' त्यावर मानसिंह म्हणाला, 'कृपा करा, हा प्राण तुमच्या सेवेला आतां अर्पण केला आहे असें समजा!'

'त्याची तरी कसली एवढी मातबरी? लष्करांत जे शिपाई येतात ते प्राणावर उदार होऊनच येतात. लढाईंत कधी तरी मरावयाचें आहे हें त्यांना कळतच असतें. त्या आशेवर इतके दिवस आम्हीं त्यांना पगार देऊन खाऊं घातलें आणि त्यांनीं बंड मात्र केलें! तें कांहीं नाहीं. यापुढे बंडाशी संबंध असलेला जो कोणी सांपडेल त्याला सरळ फांसावर द्यावयाचें असें आम्ही ठरविलें आहे.' हें ऐकून मानसिंहाचे पाय अगदीं गळून गेले. तेव्हां मीड त्याला म्हणाला, पण 'तशीच कांहीं महत्त्वाची कामगिरी सरकारची तूं करून देशील तर कांही आशा आहे. मग शिफारस करून तुझे प्राण मला वांचवितां आले तर पाहीन!"

"असें कोणतें तुमचें काम मी करूं?" असें मानसिंहाने म्हणतांच, मीड यांनें युक्तीयुक्तीने तात्या टोपे यांना पकडून देण्याविषयीं आपला मनोदय हळूहळू

व्यक्त केला. पण हें काम करण्यास मानसिंह प्रथम मुळींच कबूल होईना. आपणांस कांहींच माहीत नसल्याचा बहाणा तो करूं लागला. तेव्हां 'त्याचें मन वळविण्यास महाप्रयास पडले' असें मीड यानें लिहिलें आहे.

मानसिंहाची व तात्या टोपे यांची परोणच्या जंगलांत गांठ पडली तेव्हां मानसिंह या दुर्धर मनःस्थितींत होता. त्याच्या प्राणांच्या रक्षणाचा मोबदला दुसऱ्याचे प्राण घेऊन पटवावयाचा होता! व तें सुद्धां रणांगणांत उघड रीतीने नव्हे, तर विश्वासघात करून!

एक दिवस रावसाहेब पेशवे व फिरोजशहा हे सैन्य घेऊन नजीक आले आहेत असें समजतांच आपण पुनः त्यांना जाऊन मिळावें, असे तात्यांचे मनांत आलें. यावर आणखी दोन तीन दिवस राहण्याचा मानसिंहानें त्यांना फार आग्रह केला. आजपासून तिसरे दिवशीं मी नक्की येतों असें त्यानें सांगितलें. त्याप्रमाणें रावसाहेबांचे सैन्यास न मिळतां, तात्या त्याचेच घरीं राहिले. मध्यंतरी मानसिंहाने मीड यास सर्व बातमी कळवून शिपायांना बरोबर घेतलें व रात्रीं तात्या त्याचे घरांत विश्वासाने झोंपले असतां त्यांना एकदम असावध पकडलें. सावधगिरीने जवळपासचीं सर्व हत्यारे त्यांनीं दूर करविलीं होतीं. न जाणो वाघाशीं गांठ आहे!

नंतर त्यांना मीडच्या छावणींत नेऊन दाखल करण्यांत आलें. तात्या टोपे याचें वर्णन मीड याने त्यावेळच्या प्रतिवृत्तांत पुढीलप्रमाणे केलें आहे—

"तात्या टोपे यांना गिरफदार करून आणलें तेव्हां त्यांचे जवळ एक तरवार, एक कुकरी व ११८ मोहोरा असलेली पिशवी सांपडली. तात्यांना उर्दू, गुजराथी व मराठी भाषा येत होत्या व इंग्रजी केवळ सहीपुरतें येई. त्यांचें वय सुमारे चाळीस पंचेचाळीस, उंची मध्यम-सुमारे पांच फूट, धनुष्याकृति भिवया, काळेभोर डोळे व रेखीव नजर, चेहरा मोठा-दाढीमिशा व कल्ले असलेला, अशी त्यांची भव्य रुबाबदार चर्या होती! बुद्धिमत्तेची झांक व अंगांतील कर्तृत्वशक्ति तोंडावर स्पष्ट दिसत होती. ते तुटक, मोजकें स्पष्ट बोलत. आणि जबानींत जास्त चौकस अगर फाजील प्रश्न विचारला म्हणजे "मालुम नहीं!" अशा दोनच गंभीर शब्दांनीं नकार दर्शवीत."

इंग्रजांच्या हातीं सांपडल्यावर आपलें काय होणार तें तात्यांना कळून चुकलें.

आता निष्कारण चौकशीचा फार्स व कालहरण कशाला ? चौकशीची मला इच्छा नाही, गरजहि नाही. मरणाला मी तयार आहे. कोणाहि कुटुंबियांना भेटण्याची माझी इच्छा नाही. मात्र माझे वृद्ध वडील आणि कुटुंबीय यांचा मात्र माझेकरितां छळ करूं नये एवढीच त्यांनीं विनंति केली होती.

ता. १५ रोजीं लष्करी कोर्टासमोर त्यांना आरोप वाचून दाखविल्यावर त्यांनीं एक सुसंगत स्टेटमेंट तोंडानें सांगितलें. तें त्यांना वाचून दाखविल्यावर त्यांनीं तें लक्षपूर्वक ऐकून कांहीं ठिकाणीं दुरुस्ती केली व नंतर खालीं 'तात्या टोपे' अशी स्वतःची इंग्रजींत सही केली.

या जबानींत आपण कोणाहि इंग्रजाचा खून केला नाहीं, तसेंच एका नानासाहेबा-खेरीज कोणाचाहि हुकूम मानला नाहीं, या दोन गोष्टी त्यांनीं निक्षून सांगितल्या. तात्या कांही 'ब्रिटिश सरकारचे प्रजाजन' नव्हते. तसेंच त्या वेळां शस्त्रबंदीचा कायदाहि झाला नव्हता. म्हणून या दोन्ही कारणाकरितां त्यांना दिलेली फांशीची शिक्षा कायदेशीर म्हणतां येणार नाहीं, असें विधान मॅलेसन यानें इतिहासांत केलें आहे व तें बरोबर दिसतें. आणि खरोखरच पुढें कर्नल वुइल्यम्स् यानें कानपुरांत वर्षभर बसून शेंकडों लेखी जबान्या घेतल्या, पण कानपूरच्या दोन्ही कत्तलींत नानासाहेबांचें अगर तात्या टोपे यांचें अंग होतें ही गोष्ट कोणत्याहि पुराव्यानें शाबीत झाली नाहीं !

ता. १८ एप्रिल सन १८५९ रोजीं शिवपुरीस त्यांना फांशी देण्यांत आलें. शिडीवर ते स्वतः चढले आणि धैर्यानें मान पुढें करून फांसांत त्यांनीं स्वतः अडकावून घेतली' असें तेथें हजर असलेल्या प्रेक्षकानें वर्णन केलें आहे. फांस लोंबूं लागल्यावर कांहीं वेळानें लष्करी सैन्यें जेव्हां चालतीं झालीं, तेव्हां शेंकडों लोकांनीं तेथें गर्दी करून त्या हुतात्म्याच्या चरणाला स्पर्श केला, आणि मुकाट्यानें अश्रु ढाळीत ती मंडळी घरोघर परतली !

तात्या टोपे यांचेबद्दल मार्टिननें पुढील उद्‌गार काढले आहेत—

" Tantia Tope fought to the last...This able general whose movements Russel's graphic pen compared to *Forked Lightening* and who led our troops to so many weary mar-

ches, crossing the Nurmada to and fro, passing between our columns, behind them, and before them, traversing mountains, ravines, valleys, swamps, and marching for weeks together thirty and forty miles a day–was a comely well made Brahmin, fifty years of age, with a large finely shaped head, piercing black eyes, sharply arched grey eyebrows, and an abundant head of grey hair with whiskars, beard and moustaches of the same colour. When apprehended and heavily ironed he was quite calm, said 'he wished no trial, and expected nothing but death. Only he wished that it might be speedy and that his captive family might not be made to suffer on his account.' He was tried by court-martial and hanged."

(मार्टिनकृत ब्रिटिश इंडिया, पृ. ८१)

महाराष्ट्राच्या इतिहासांत 'मराठ्यांचे शेवटचे सेनापति' म्हणून तात्या टोपे यांचें स्थान चिरकाल राहील. बॅरिस्टर सावरकर यांनीं तात्या टोपे यांचें वर्णन 'अपयश आलेला शिवाजी' असें केलें आहे; तें सकृद्दर्शनीं कांहीना अतिशयोक्तीचें वाटेल. पण असाहि विचार केला पाहिजे कीं, त्या पडत्या काळांत शिवाजी असता तरी काय करता? कोणीं सांगावें, जयसिंगाच्या वेळेप्रमाणें त्यालाहि हार खावी लागली असती. यश किंवा अपयश ही एक नशिबाची बाब आहे. म्हणून प्राप्त परिस्थितींत मनुष्य आपलें कर्तव्य करितो कीं नाहीं इतकाच त्याचा गुण ऐतिहासिक किंमत ठरवितांना घ्यावयाचा असतो. शिवाजीच्या काळचे मराठे पराक्रमी होते आणि एकोणिसाव्या शतकांतले मराठे लोक सर्व नादान होते असें म्हणवत नाहीं. कारण दोन्हीहि एकाच खाणींतली माती ना? आजहि हिंदुस्थानांत कोणी शिवाजी, नेताजी पालकर किंवा नाना फडणीस वावरत नसतील असें नाहीं. पण पडत्या काळांतील व्यक्तीची खरी ऐतिहासिक किंमत मनांत बरोबर समजावयाला मनुष्याच्या अंगीं सहृदय मार्मिक दृष्टी लागते. तात्या टोपे यांच्या उदाहरणावरून, मराठ्यांचे अंगची गनिमीकाव्याची इतिहासप्रसिद्ध परंपरा एकोणिसाव्या शतकाचे अखेरपर्यंत जागृत होती इतकें मात्र उघड दिसून येतें. त्याचें भूषण आजच्या मराठ्यांनीं कां मानूं नये?

# २१

## तात्या टोपे यांची जबानी

ता. १० एप्रिल १८५९ रोजीं मेजर मीड यांच्यापुढें तात्या टोपे यांची चौकशी होऊन त्यांनीं पुढील जबानी दिली. देवाशपथ खरें सांगेन, खोटें सांगणार नाहीं, अशी शपथ जरी प्रत्येक साक्षीदार कोर्टापुढे घेत असला तरी पुष्कळदां त्याचा अर्थ ‘ खोटें बोलणार नाही, पण स्वतःला विघातक असें खरें सांगणार नाही’ असाहि असतो. म्हणून कोर्टातल्या जबानीला ‘ ऐतिहासिक सत्या’ची सर्वथैव किंमत देतां येत नाहीं. कोर्टामध्यें शपथेबर जें ‘ सत्य’ सांगितलें जातें त्याचें वर्णन लो. टिळक विनोदाने “ त्रिधाविभज्य वृषभो रोरवीति ” या ऋचेच्या रूपकानें करीत असत, व हाच न्याय इतर व्यवहारांत व इतिहास–संशोधनांतहि चांगला लागू पडतो. कारण एका सत्याचे तीन तुकडे झालेले असतात. अर्थात् इतर ठिकाणच्या पुराव्यांतून ते हुडकून काढून ज्याला ते एकत्र जोडतां येतात त्यालाच खरें सत्य हातीं लागतें. दुर्दैवाने तात्या टोपे यांचें हस्ताक्षर अगर चारदोन पत्रेंहि आज लपलब्ध नाहींत. फक्त सविस्तर अशी एवढीच जबानी उपलब्ध आहे, याकरतां पुढे ती समग्र दिली आहे. ती देतांना वाईट वाटतें एवढें मात्र नमूद करतों:—

" माझें नांव तात्या टोपे. वडिलांचें नांव पांडुरंग. आम्ही मूळचे नगर पातोडा जिल्हा, जोल परगाणा येथें राहणारे. अलीकडे बिठूर अगर ब्रह्मावर्त येथें आमची वस्ती असे. माझें वय अदमासें पंचेचाळीत वर्षांचें असून नानासाहेब पेशव्यांच्या खासगीकडे माझी नेमणूक आहे.

सन १८५७ च्या मे महिन्यांत कानपूरचे कलेक्टर यांनीं बिठूर येथें नानासाहेबांना अशी चिट्ठी पाठविली कीं आपलीं ( कलेक्टरचीं ) बायकामुलें सुरक्षिततेकरितां इंग्लंडला पाठवावी. या गोष्टीला नानासाहेबांनीं संमति दिली. नंतर चारच दिवसांनी नानासाहेबांनी आपल्या फौजेसह कानपुरास यावें म्हणून कलेक्टर यांनीं पत्र लिहिलें. त्याप्रमाणें सुमारें शंभर शिपाई, तीनशें बुणगे व दोन तोफा घेऊन मी व नानासाहेब कलेक्टर यांच्या घरीं गेलों. कलेक्टर शहरांतील घरी नव्हते. ते तटबंदीच्या छावणींत गेले होते. त्यांनी आम्हांला निरोप पाठविल्यावरून रात्रीं आम्ही त्यांच्याच बंगल्यांत राहिलों. सकाळीं कलेक्टर आला. आणि त्यानें नानांना स्वतःच्या बंगल्यांतच राहावयास सांगितलें. नेटिव शिपाई बेदिल झाल्याकारणानें आम्ही मदतीला वेळींच आलों असें त्याला वाटलें. आमच्या वतीनें पगाराकरितां त्यानें जनरल साहेबाला लिहिलें. त्यावरून आमच्या शिपायांचा पगार दिला जाईल असें कलेक्टरला लिहून आलें. आम्ही कलेक्टरच्या घरीं चार दिवस होतों. नंतर दोन दिवसांनी इन्फंट्री सैन्य व सेकंड लाइट कॅव्हल्री या तुकड्यांनीं वेढा घालून नानासाहेबांना व मला कैद केलें व सरकारी खजिना व दारुगोळा सर्व लुटून फस्त केला. शिपायांनीं दोन लक्ष अकरा हजार रुपये नानांच्या स्वाधीन केले. पण त्यावर देखरेखीकरितां स्वतःचे संत्री ठेवले. नानाहि या शिपायांचे कैदीच होते म्हणाना ?

आमचेहि शिपाई नंतर बंडवाल्यांना मिळाले. शिपाई नानासाहेबांना दिल्लीस चला असें म्हणाले. कानपुरापासून सहा मैल आम्ही आल्यावर नाना म्हणाले, रात्रीं जाण्यापेक्षां उद्यां पुढें जाऊं. म्हणून सर्वांनीं तेथेंच मुक्काम केला. दुसऱ्या दिवशीं नानांनी दिल्लीला जाण्याचें नाकारलें तेव्हां बंडवाले म्हणाले, तर मग कानपूरला चला व आमच्याकरितां लढा. नानांनीं हें कबूल केलें नाहीं, तथापि शिपायांनीं नानांना कैद करून कानपुरास नेलें व पुढारीपण देऊन लढण्यास लावलें! कानपुरास चोवीस दिवस लढाई चालली होती. चोविसाव्या दिवशीं जनरल व्हीलर यानें तहाचें निशाण उभारलें. एक इंग्रज स्त्रीकैदी पेशव्यांकडे होती. तिच्याकडून नानांनीं व्हीलर यास पत्र लिहविलें.

कीं, " शिपाई माझ्या ताब्यांत नाहींत, तथापि तुमची इच्छा असल्यास तुम्हांस व तुमच्या बायकामुलांस नावांतून अलाहाबादेपर्यंत पोंचवूं. " व्हीलर यास ही कल्पना पसंत पडून त्यानें नानांकडे एक लाख रुपये पाठवून दिले. दुसऱ्या दिवशीं मी चाळीस नावा सिद्ध केल्या व सर्व इंग्रज स्त्रिया व मुलें यांना अलाहाबादेस जाण्याकरितां त्यांत बसविलें, इतक्यांत सर्व फौज व तोफखाना घेऊन शिपाई तेथें आले. शिपायांनीं नदीत उड्या टाकल्या व सर्वांची सरसहा कत्तल केली. नावांना आगी लावल्या. ३९ नावा जळून गेल्या व एक निसटली ती कोलाकंकरपर्यंत पोंचली. पण ती पकडून पुनः कानपुरास आणली व त्यावरील सर्वांची कत्तल झाली.

यानंतर चार दिवसांनी नानासाहेबांना मातोश्रीच्या श्राद्धाकरितां ब्रह्मावर्तास जाणें होतें. तेव्हां शिपायांनीं त्यांना जाऊं दिलें. पण पुनः शिपायांनीं त्यांना कानपुरास आणून, जो सरकारी खजिना शिपायांनी त्यांच्याजवळ 'ठेव' ठेवला होता त्यांतून शिपायांनीं आपला पगार घेतला, आणि अलाहाबादेहून हसन फत्तेपूर येथें इंग्रज फौज आली होती त्यांशीं लढण्याची त्यांनीं तयारी केली. ही लढाई करण्याचें नानांनीं नाकारलें, म्हणून मी व नानासाहेब कानपुरासच राहून ज्वालाप्रसाद यास तिकडे पाठविलें. फत्तेपुरास पराजय होऊन बंडवाले कानपुरास आले. तेथेंहि लढाई होऊन त्यांचा पराजय झाला. नंतर नाना व मी ब्रह्मवर्तास गेलों. तेथेंहि बंडवाले आमच्या मागोमाग आले.

ब्रह्मावर्तास आम्ही मध्यरात्रीं पोहोंचलों. दुसऱ्या दिवशीं कांहीं द्रव्य बरोबर घेऊन नाना फत्तेपुरास गेले. तेथें बंडवाल्यांनीं फत्तेपूर लुटलें. ब्रह्मावर्ताहून नानासाहेब, रावसाहेब, बाळासाहेब व मी सर्व बायकांमाणसांसह नावेमधून फत्तेपुरास आलों. आणि चौधरी भोपाळसिंह याजकडे उतरलों. कांहीं दिवसांनीं बेचाळिसाव्या नेटिव्ह इन्फंट्रीकडून त्यांचें पुढारीपण घेण्यासंबंधीं नानासाहेब यांस निरोप आला.

नानासाहेबांचा सदर तुकडीस निरोप मी त्या लोकांना कळविला. या बेचाळिसाव्या पलटणीनें ब्रह्मावर्तास जाऊन इंग्रजांशीं लढाई केली. पण त्यांत ते हरल्यामुळें मी परत गंगा उतरून नानांकडे आलों. नंतर कांहीं दिवसांनीं नानांनीं मला ग्वालेरला जाऊन तेथील कॉटिंजंट फौज आपणास मिळते कीं काय याचा प्रयत्न करण्यास सांगितलें. तेव्हां मी मुरार येथें जाऊन सदर फौज वश करून काल्पी येथें आणली. तेथें बाळासाहेब आलेले होते. त्यांना घेऊन मी कानपुरकडे प्रयाण

केलें. कानपुरास अकरा दिवस युद्ध होऊन आमचा मोड झाला. दुसऱ्या दिवशीं शिवराजपूर येथेंहि आमचा मोड झाला. तेव्हां बरोबर पंधरा तोफा घेऊन आम्ही पळ काढला. रावसाहेबांनाहि नानांनीं कानपुरास पाठविलें होतें.

नंतर आम्ही त्रिवर्गानीं 'नाना माव की घाट' येथें गंगा उतरून खेरा येथें रात्रीं वस्ती केली. पुढें रावसाहेब यांच्या सांगण्यावरून परत काल्पीस आलों व तेथला दारूगोळा घेऊन चरखारी येथें गेलों. बरोबर ९०० शिपाई, दोनशें स्वार व चार तोफा होत्या. नानासाहेबांनीं रावसाहेब यांनाहि आमच्या मदतीस पाठविलें. अकरा दिवस लढून आम्ही चरखारी घेतली. तेथील राजापासून तीन लक्ष रुपये व चोवीस तोफा पाडाव केल्या. याच प्रसंगीं बाणपूरचा राजा, शहागडचा राजा, दिवाण दशरथ, दौलतसिंग, कुचव्वा खारवाला, तसेंच शेंकडों लोक आमच्या पक्षाला मिळाले!

इतक्यांत झांशीची महाराणी लक्ष्मीबाई यांच्याकडून अशी तांतडीची चिठी आली कीं, आपण गोरे लोकांशीं लडत आहों तरी ताबडतोब कुमकेस यावें. त्याप्रमाणें मी झांशीस गेलों. वाटेंत बरवासागर येथें राजा मानसिंह मला येऊन मिळाला. आमच्याजवळ बावीस हजार फौज व अठ्ठावीस तोफा होत्या. झांशीपासून मैलावर लढाई होऊन आमचा पराजय झाला. चारपांच तोफा घेऊन बंडवाली फौज काल्पीस पळून गेली. मीहि भांडेर कुंच या मार्गानें सुमारें दोनशें लोक घेऊन काल्पीस गेलों. राणी लक्ष्मीबाई व मी एकाच दिवशीं सायंकाळीं काल्पीस पोचलों. आपणांस लढण्याकरितां सैन्य देऊन मदत करावी, अशी लक्ष्मीबाई यांनीं फार काकुळतीनें रावसाहेब यांना विनंति केली. तेव्हां रावसाहेब यांनीं सर्व सैन्य उभें केलें, व मला त्यांच्या मदतीस जाण्यास सांगितलें. यानंतर कुंच येथें लढाई झाली ती दुपारपर्यंत चालली होती. त्यांत मोड झाल्यावर जलोनपासून चार मैलांवर चिरकी येथें माझी आप्त मंडळी आहेत तेथें मी गेलों. रावसाहेब यांचाहि काल्पीस पराभव होऊन ते गोपाळपुरास आले.

नंतर आम्ही सर्वांनीं ग्वाल्हेरवर चाल करून शिंद्यापासून तें एकाच दिवसांत घेतलें. तीन दिवसांनीं शिंद्याची सर्व फौज आम्हांला येऊन मिळाली. अमरचंद भाटियापासून सर्व खजिना व द्रव्य ताब्यांत घेऊन फौजेला पगार वाटला. यावेळीं आमच्याबरोबर रामराव गोविंदराव होता. इकडे काल्पीहून व शिरपूरहून अशा

दोन इंग्रजी फौजा आमच्यावर ग्वाल्हेरवर आल्या. ती लढाई चार पांच दिवस चालून त्यांत राणी लक्ष्मीबाई पडल्या. रामराव गोविंद यांनीं त्यांचा अग्निसंस्कार केला. बंडवाल्या फौजेचा मोड होऊन आम्ही पंचवीस तोफांनिशीं पळ काढला. रात्रीं ज़ावरा अलीपूर येथें राहिलों. सकाळीं आमच्यावर हल्ला आला. सुमारे तास दीड तास लढाई झाली. तेव्हां सर्व तोफा टाकून आम्ही चंबळ नदी ओलांडली व टोंक्यास गेलों. तेथें टोंक्याच्या नबाबाशीं लढून त्याच्या चार तोफा घेतल्या. व माधवपूर व इंदगड या मार्गानें भिलवाड्यास पोंचलों. पण तेथेंहि पाठीवर इंग्रज आल्यानें नाथद्वारपासून जवळच कोटरा हें ठिकाण आहे तेथें गेलों. या वेळीं मजजवळ नऊ दहा हजार माणसें व चार तोफा होत्या. दुसऱ्या दिवशीं पाटणपासून मैलावर इंग्रजांशीं लढाई होऊन त्यांत आमचा पराजय झाला.

पाटणला आलों तेव्हां आमचेबरोबर बांद्याचे नबाब व इंदुरखी येथें मिळालेले कुमोन्याचे नबाब हे होते. पाटणच्या राजाचा आम्ही पराभव करून त्याचा दारूगोळा हस्तगत केला व सैन्याचा पगार देण्याकरितां त्याजजवळ पैसा मागितला. तो म्हणाला पांच लक्ष देतां येतील. रावसाहेब पेशवे म्हणाले, पंचवीस लक्ष द्या. हो ना करितांना पंधरा लक्ष द्यावे असें ठरलें. नंतर राजवाड्यांत जाऊन सवा दोन लक्ष रुपये त्यानें रोख पाठविले व दुसऱ्या दिवशीं पांच लाख पुरे केले.

पांचव्या इरेग्युलर घोडदळाचा वरदीमेजर इमाम अली यानें राजाला वाईट रीतीनें वागविल्यामुळें रात्रौ तो पाटणहून निघून गेला. आम्ही तेथें चार पांच दिवस राहून सैन्यास तीन महिन्यांचा पगार वाटला. स्वाराला तीस रुपये व शिपायाला १५ रुपये दरमहा दिले. नंतर १८ तोफा घेऊन सिरोंजकडे निघालों. वाटेंत राजगड येथें इंग्रजांची गांठ पडून तोफा टाकून द्याव्या लागल्या. निजाकिल्लीचे (?) वाटेनें सिरोंज येथें आठ दिवस राहिलों. नंतर इसागड येथें गेलों. तेथील लोकांनीं आम्हांस रसद दिली नाहीं म्हणून इसागड हें ठिकाण लुटलें. रावसाहेब यांनीं मला चंदेरीकडे पाठविलें व आपण तालबटला वळसा घालून निघाले. मी चंदेरीला गेलों व रावसाहेब ललतपूरला गेले. चंदेरीवर शिंद्यांचीं माणसें होतीं त्यांनीं तोफा डागून आमच्यावर चार गोळे टाकले. चंदेरीहून तीन दिवसांनीं मंगरोळ येथें आलों. तेथें इंग्रजांशीं लढाई होऊन आमचा पराभव झाला.

नंतर जाखलोनहून सुलतानपुरास गेलों. तेथें रावसाहेब आलेले होते. तीन

दिवसांनीं इंग्रज पाठीवर आले. रावसाहेबांनीं जाखलोन येथें सैन्य नेऊन लढाई दिली. मी तेथें हजर नव्हतों. नंतर रावसाहेब ललतपुराहून कांजुरिया येथें गेले. इतक्यांत इंग्रज आले. तास दीड तास चकमक झाली. आम्ही तोफा टाकून तालबहटला पळालों. नंतर १२ मैलांवर इटाव्याला गेलों. रात्रभर चालत होतों. सकाळीं इंग्रजांची गांठ पडल्यावर फौज दुभंगली. रावसाहेब व मी राजगड मार्गानें नर्मदा ओलांडली व खारगांवला गेलों. कंदूला येथें सरकारी ठाण्याला आग लावली. खारगांवला होळकरांचे १४० लोक, एक इंनफंट्रीची तुकडी व दोन तोफा सामील करून घेऊन आम्ही गुजराथचा रस्ता धरला. वाटेंत शिपायांनीं टेलिग्राफच्या तारा तोडल्या आणि ग्वालेरकडे जाणाऱ्या सरकारी गाड्या लुटल्या व चपराशी व चौकीदार यांना कैद केलें. कांहीं चौकीदारांना शिपायांनीं फांशी दिले! नंतर मुख्य हमरस्ता सोडून आम्ही पश्चिमेकडे वळलों. पण इतक्यांत इंग्रज आल्यामुळें आम्ही दोन तोफा तशाच टाकून नर्मदा गांठली.

परतीरावर कोणी इंग्रज अधिकारी सुमारे शंभर लोकांनिशीं होता. आम्ही नदी उतरूं लागतांच त्यानें पळ काढला. चिकला खेडेगांवीं लूट करून आम्ही रात्रीं कूच केलें व चौतीस मैलांवर राजपूर येथें मुक्काम केला. तेथील राजापासून ३९०० रुपये व तीन घोडे घेऊन छोटा उदेपुरास गेलों. तेथून जवळच देवगडबारी येथें दाट जंगल आहे. तेथें सैन्य फुटलें व आम्ही दोन दिवस मुक्काम केला. पुनः सैन्याचे लोक एकत्र जमतांच बन्सवाडा येथें गेलों. तेथे एका व्यापाऱ्याच्या जवळ सोळा सतरा उंट कापड होतें. तें लुटलें आणि सालोमार (?) येथें उदेपूरच्या राजाचा कारभारी केसरसिंग होता त्याजपाशीं रसदेची मागणी केली. इतक्यांत इंग्रज फौज पाठीवर आल्यामुळें पुढें उदेपुरास न जातां परत भिलवाड्यास आलों.

प्रतापगडाजवळ नीमचहून आलेल्या इंग्रज सैन्याची गांठ पडली. त्यानंतर मंदसोरहून पुढें तीन मुक्कामांत झिरपूर येथें गेलों. नंतर नरहरगडलाहि आमचा पराभव झाल्यामुळें रावसाहेब पेशवे यांनीं रिसालदार नन्हेखान याला मानसिंगाकडे पाठविलें. मानसिंग आल्यावर तेथून दोन मैलांवर परोण आहे तेथें जाऊन आम्ही मुक्काम केला. तीन दिवसांनीं भिलवड्याचे पुढें आठ मैलांवर नदीपाशीं आम्हास पोचवून मानसिंगानें निरोप घेतला. पुढें इंद्रगडास फिरोजशहा एका तुकडीसह आम्हांस येऊन मिळाला. दौसा येथें पुनः इंग्रजांशीं लढाई झाली. त्यांत पराभव होऊन

मारवाडपासून साठ मैलांवर एका गांवीं मुक्काम केला. तेथेंहि पुनः पराजय झाल्यानें फिरोजशहाची तुकडी रावसाहेब यांच्या सैन्यांतून फुटली व दुसरीकडे गेली. दुसऱ्या दिवशीं ठाकूर नारायणसिंग, मानसिंगाचा चुलता अजितसिंग, ठाकूर गंगासिंग हे आम्हाला येऊन मिळाले.

देवडघारीपासून रावसाहेब पेशव्यांशीं माझीं सारखीं भांडणें होत होतीं. मी या धांवपळीला कंटाळलों होतों. व सोईची वेळ आली कीं तुमची नोकरी मी सोडून देईन असें मी त्यांना सांगितलें. ती वेळ आतां आली व मी या दुसऱ्या लोकांना मिळालों. रावसाहेबांपाशीं त्या वेळीं सहा हजार लोक होते. मजजवळ दोन हिंदुस्थानी सेपाकी, एक खिजमतगार व चार घोडीं होतीं. हे म्हणजे रामराव व नारायण गोविंद. खिजमतगार एक दोन मुक्कामानंतर पळून गेला. परोणच्या जंगलांत मानसिंहाची गांठ पडली. नंतर अजितसिंह निघून गेला. नारायणसिंह मजबरोबर होता.

मी सैन्याला रजा दिली हें बरोबर केलें नाहीं असें मानसिंह मला म्हणाला. मी म्हणालों, "तें बरोबर अगर चूक कांहींहि असो. सतत धांवण्याला मी कंटाळलों म्हणून येथेंच कांहीं दिवस राहण्याचा विचार केला." नंतर कांहीं दिवसांनीं असें कळलें कीं रावसासाहेब हे सैन्यासह पाटण येथें आले असून सिरोंजकडे जात आहेत. तेव्हां त्यांचा मानसिंहाच्या संमतीने शोध केला. पण असें कळलें कीं रावसाहेब तेथें नसून इमामअली, फिरोजशहा, अंबापाणीचे नबाब, आदिल अहंमद वगैरे लोक आठ नऊ हजार फौजेसह तेथें आहेत. इमामअलीकडून मी त्यांना येऊन मिळण्याविषयीं मला निरोपहि आला. नानासाहेबांचा शिक्का मजजवळ असलेला हरवला होता. तो मी दुसरा करविला.

महुदिया येथें मेजर मीड यांचे छावणींत यावेळीं मानसिंह होता. इमामअलीच्या निरोपाविषयीं त्याला कळवून 'मी जाऊं कां राहूं ?' असें मी त्याला विचारलें. मानसिंगानें इंग्रजांना शरण जाण्यापूर्वी मला विचारलें होतें. त्यानें एक इसम मजजवळ ठेवला असून असें सांगितलें होतें कीं, जेथें हा मनुष्य तुला घेऊन जाईल तेथें थांब. माझ्या जाण्यासंबंधीं निरोपाला, तीन दिवसांनीं गांठ घेतों नंतर ठरवूं' असा मानसिंगानें उलट निरोप पाठविला, म्हणून त्याच जागीं मी थांबलों.

तिसरे दिवशीं राजा मानसिंग येऊन भेटला व मेजर मीड यांची गांठभेट होऊन त्यांचें मन आपल्यासंबंधानें बिथरलेलें नाहीं असें त्यानें मला सांगितलें. मग मी

जाऊं का राहूं ! असें त्याला विचारलें. तो म्हणाला तें सकाळीं सांगेन. नंतर मी झोंपीं गेलों. मी निद्रित असतां सरकारच्या शिपायांनीं मला गिरफदार केलें आणि मेजर मीड यांच्या छावणींत आणलें."

( सही ) **तात्या टोपे**

मुशेरी छावणींत आरोपी कैदी तात्या टोपे यांनीं ता. १० एप्रिल १८५९ रोजीं सदर जबानी राजीखुषीनें दिली.

( सही ) **मेजर मीड**

वरील जबानी कांहीं इंग्रजी ग्रंथांत समग्र छापलेली आहे. पण तिचें भाषांतर देखील आजवर उपलब्ध नव्हतें. या जबानींत ऐतिहासिक व्यक्ति, स्थळें व हालचाली यांचा इतका बारीक व भरपूर तपशील आहे कीं ही जबानी देणारी व्यक्ति तात्या टोपेच होती याबद्दल शंका राहात नाहीं. थॅार्नटन यानें मीडचें चरित्र लिहिलें आहे त्यांत सदर जबानीविषयीं म्हटलें आहे—

" This statement is a remarkable one. It is so terse and businesslike as to be wearisome, But so far as it can be tested, the narrative is for the most part, singularly accurate. It nowhere minimises defeats or exaggerates successes, and gives the impression at any rate, of being strictly true. ( P. 75 )

इतिहासाला पुष्कळ उपयोगी असा सुसंगत तपशील या जबानींत असला तरी, ' कोर्टापुढील आरोपी ' ची ती जबानी आहे हें लक्षांत ठेवून तिचा तारतम्यानेंच उपयोग केला पाहिजे.

# २२

## नानासाहेब पेशव्यांची अखेर

‘हिमालयांत’ या पुस्तकांत श्री. नानासाहेब चाफेकर यांनीं असें विधान केलें आहे कीं, शेवटचे बंडवाले नानासाहेब हे नेपाळांत वारले हें खरें नाहीं. ते नेपाळांतून गुप्तपणानें चीनमध्यें गेले! तसेंच ‘सह्याद्री’ मासिकांत एका वाचकानें पत्र लिहून असें कळविलें होतें कीं, नानासाहेब हे १९३४ पर्यंत हयात होते! व सांगलीस येऊन त्यांनीं एकदोघां इसमांना भेटहि दिली होती. हीं दोन्ही विधानें विस्मयकारक असलीं तरी तीं ऐतिहासिक दृष्टीनें असत्य आहेत. नानासाहेब १९३४ सालीं जिवंत असावयाचे म्हणजे ते एकशें आठ वर्षांचे असतील या साध्या हिशेबानें तरी यांतील चूक लेखकाच्या लक्षांत यावयास पाहिजे होती. इतिहास-संशोधक राजवाडे यांनीं दुसऱ्या बाजीरावांची कन्या कुसुमावती आपटे यांना विचारून शेवटच्या पेशवे-मंडळींची व त्यांच्या परिवाराची अखेरची हकिगत दिली आहे. पण त्यांत नानासाहेबांच्या मृत्यूची तारीख ६ ऑक्टोबर १८५८ अशी चुकीची दिली आहे. वास्तविक हा सन १८५९ पाहिजे. शेवटची पेशवे-मंडळी नेपाळांत चाळीस वर्षें पूर्णपणें अज्ञातवासांत राहात असल्याकारणानें एकोणिसाव्या

शतकाच्या अखेरपर्यंत त्यांचेबद्दल अनेक नवलकथा पसरल्या होत्या व महाराष्ट्रांतील लोकांना तो एक जिज्ञासेचा व जिव्हाळ्याचा विषय होता. अलीकडे इतिहास-संशोधनामुळें या शेवटच्या पेशव्याबद्दल अनेक गोष्टी निश्चित झाल्या असल्यामुळें नानासाहेबांसंबंधीं अखेरची हकीगत पुढें देत आहे :—

१८५७ च्या डिसेंबरांत दुसरी कानपूरची लढाई झाली आणि १८५८ च्या मार्चमध्यें लखनौमध्यें बंडवाल्यांचा पराभव झाला. तेव्हांपासून काल्पी केंद्र रावसाहेब पेशव्यांकडे सोपवून नानासाहेब आयोध्या रोहिला खंड या प्रांतांत लखनौच्या बेगमेच्या आश्रयानें असत. जून महिन्यांत ग्वालेरची मोठी लढाई बंडवाले हरल्यामुळें इंग्रजी सैन्य नानासाहेबांच्या पाठलागाला मोकळें झालें. सरसेनापति कॉलिन कँबेल याकडे नानासाहेबांचा पाठलाग करण्याचें काम होतें. नानासाहेब, बाळासाहेब, लखनौची बेगम, रोयाचा नरपतसिंग, खानबहादुरखान, वेणीमाधव, मेहेंदी हसन, महंमद हुसेन, फैजाबादचा मौलवी ही सर्व प्रमुख मंडळी अयोध्या व रोहिलखंड प्रांतांत गड व किल्लेकोट यांच्या आश्रयानें राहात होती. कुंवरसिंह व अमरसिंह यांचा जूनमध्यें पराभव झाला. ग्वालेरहि आटोक्यांत आलें होतें, यामुळें सर्व इंग्रज फौजा मोकळ्या होऊन अयोध्येच्या बंडवाल्यांवर घालतां येण्यासारख्या होत्या. सेनापति कॉलिन कँबेलजवळ नुसतें पायदळच ऐशीहजार असून एकंदर फौज सवा लाखावर असावी. बंडवाले आतां सारे वीस पंचवीस हजार असतील नसतील. अर्थात् त्यांना एवढ्या सैन्यानें नामोहरम करण्यांत मोठ्या शौर्याचा किंवा लष्करी चातुर्याचाहि प्रश्न नव्हता. केवळ अगणित सैन्यभारानेंहि ते दडपून जाण्यासारखे होते ! तथापि अयोध्येचा प्रांत डोंगराळ, जंगली असल्यामुळें फार दुर्गम. यामुळें याहि मोहिमेला वर्ष लागलें व अखेर पेशवेमंडळी नेपाळांत निसटून गेल्यामुळें ती हातीं लागली नाहींतच !

कॉलिन कँबेल यानें प्रथम लखनौ ते फैजाबाद अशी गोमती व घोगरा नदी-कांठानें फळी धरून तेथून बंडवाल्यांना वर रेटीत न्यावयाचें असें ठरविलें. अमेथीचा नबाब शरण आला, पण शंकरपूरच्या वेणीमाधवानें किल्ला खाली करून देण्याची हूल दाखवून तो पंधरा हजार सैन्यानिशीं वर निसटला. तुळशीपूर, बळरामपूर, बराईच, नंदपारा इत्यादि ठिकाणें बंडवाल्यांनीं चांगलीं लढविलीं. पण इंग्रजांचें सैन्य फार असल्यामुळें निभाव लागत नसे. यामुळें गोगरा नदी उतरून नेपाळच्या जंगलांचा

अखेर आश्रय करण्याचें बेगम व नानासाहेब यांनीं ठरविलें. आतां बंकी हें बैरामघाटावरचें शेवटचेंच ठिकाण उरलें होतें.

ब्रिटिश सैन्यें अवघड व अनोळखी अशा जागीं आल्यानें त्यांना घाटांची माहिती अगदीं नव्हती; कोणी माहिती देऊन मदत करीत नसत, पैसे देऊन फितूर उत्पन्न करावा तर सावजाचा वास लागत नसे. यामुळें बंडवाले आपण होऊन शरण येतील तर अधिक बरें असें इंग्रजांना झालें. यामुळें मोहीम संपणें ही कालावधीची बाब झाली. त्या वेळचा लंडनटाईम्सचा बातमीदार रसेल लिहितो-" सध्यां आम्ही किती अवघड जागीं आलों आहों तें नुसतें सांगून देखील कळण्यासारखें नाहीं. नेपाळच्या अगदीं जवळ आम्ही आलों असून समोर उंच हिमालयाच्या बर्फाच्छादित टेकड्यांची रांग दिसत आहे. अयोध्येचा सपाट प्रदेश या टेकड्यांच्या उतारावर आहे, पण मध्यें अशीं दुर्गम व क्रिर अरण्यें आहेत कीं त्यांत कोणाहि माणसाचा प्रवेश होणें दुर्घट आहे! हिमालयांतून धो धो वाहणाऱ्या प्रपातांनीं येथें मोठमोठीं दऱ्याखोरीं निर्माण झालीं आहेत. त्यांतील बिकट पाऊलवाटांची माहिती फारच थोड्यांना असेल. तसा माहितगार आम्हांला कोण भेटणार? आणि भेटला तरी कोण माहिती सांगणार? या टेंकड्यांचे पलीकडच्या खोऱ्यांत तराईचा प्रांत आहे. मोठमोठ्या दलदली, सरोवरे व अरण्यें यांनीं तो प्रदेश इतका व्यापलेला आहे कीं, कोठें वीतभर जागा सांपडायची नाहीं, मग सैन्य नेण्यासारखा रस्ता कोठचा?"

अशा दुर्गम प्रदेशांत बंडवाल्यांचेहि किती हाल झाले असतील तें कल्पनेनेंच जाणलें पाहिजे. इतक्या लोकांना तेथें धान्य तरी कसें मिळणार? यामुळें फार हाल होत. सदासर्वकाळ रानांत वास्तव्य आणि इंग्रजांच्या पाठलागामुळें जिवाचीहि भ्रांत सतत असल्यामुळें दूरदूर अंतरावर हांके आणि स्वार यांचा रात्रंदिवस खडा पहारा ठेवावा लागे. इंग्रज सैन्याची थोडी जरी हालचाल दिसली तरी हे हांके ताबडतोब येऊन नानासाहेबांस बातमी देत. असा हा अज्ञातवास किती दिवस टिकणार? का तो केव्हांच संपावयाचा नाहीं? आतां आपणांला कोण मदत करणार? ज्या हेतूकरितां बंड केलें त्यांतलें काय साध्य झालें? कोण कोण जाग्यावर उरले? इंग्रजांशीं तह करणें शक्य नाहीं का? शरण गेलें तर राहिलेलें आयुष्य तरी सुखानें जाईल. असे अनेक नाउमेदीचे विचार त्यांचे मनांत येऊन

जात ! आशा ही मनुष्याला कधीं सुटत नाहीं. आज आपली अगदीं विपन्नावस्था झाली आहे; पण त्यांतच तग धरून राहिले तर कोणीतरी हात देऊन यांतून आपणांला बाहेर काढील असेंहि त्यांस एखादे वेळीं वाटत असे.

पण इंग्रजांनीं अगदीं पाताळांत जाऊन देखील बंडवाल्या पुढाऱ्यांना हुसकून काढण्याचा चंग बांधला होता. अखेर ता. ३१ डिसेंबर १८५८ रोजीं रापती नदीचे कांठीं इंग्रजी सैन्याचा बंडवाल्यांचे फौजेशीं मोठा चुरशीचा संग्राम झाला. बंडवाल्यांची फौज सुमारें पांच हजार होती. या सैन्यांत स्वतः नानासाहेब पेशवे, बाळासाहेब, लखनौची बेगम, मेहेंदी हुसेन वगैरे सर्व खाशी मंडळी हत्तीवरून स्वतः लढत होती. पेशव्यांचे सैन्यानें तोफांची मारगिरी चांगली केली. रापती नदीच्या पात्रांत उतरून उभय पक्षांचे वीर मोठमोठया आरोळ्या देऊन तरवारीनें युद्ध करीत होते. त्यांत अनेक मेले व कित्येक वाहून गेले ! सरतेशेवटीं निभाव नाहीं असें पाहून नदीपलीकडच्या अरण्यांत पेशवे व त्यांची प्रमुख मंडळी पसार झाली ! रात्र पडल्यानंतर जिकडे तिकडे सर्वत्र सामसूम झालें, व भयानक काळोखानें त्या अरण्यांत आपलें साम्राज्य बसविलें ! बंडवाल्यांची रीत अशी असे कीं, ते शक्य तोंवर लढाईची गांठच घालीत नसत. आणि प्रदेश तर महादुर्धट, यामुळें सहा महिन्यानंतर कॉलिन कँबेल अगदीं कंटाळून गेला, व त्यानें होपग्रँट व ब्रिगेडिअर हॉर्सफोर्ड यांवर तें काम सोंपवून दिलें. इकडे जंगबहादुर यानें बंडवाल्यांनीं नेपाळच्या हद्दीमधून बाहेर निघून जावें असा इंग्रजांच्या समाधानाकरितां जाहीरनामा काढला. पण त्यानें एकीकडे बेगमेकडे आपला बद्रींसिंग या नांवाचा हस्तक पाठवून असें कळविलें कीं, तुम्ही आपल्या सैन्याला रजा देऊन जवळ असलेले राजे, तालुकदार, तुमचे स्नेहीसोबती, नोकरचाकर यांचेसह नेपाळांत खुशाल राहा; मी तुमची व्यवस्था लावून देतों, आणि इंग्रज सरकारकडूनहि तुम्हाला माफी मिळवून देतों. पण बेगमेनें हें म्हणणें कबूल केलें नाहीं. नानासाहेबांचा सल्लाहि असाच पडला. कारण सैन्याला रजा दिल्यावर जंगबहादुराला केव्हांहि आपणाला पकडून इंग्रजाच्या हवालीं करितां येईल.

यावर पुष्कळ भवती न भवती झाली व बद्रिसिंगाच्या नानासाहेबांशीं मुलाखती झाल्या. या मुलाखतींत नानासाहेब पेशवे, हजरत महल, बेगम, युवराज ब्रिजिस कादर, बाळासाहेब वगैरे सर्व मुख्य मंडळी होती. या वेळीं नानासाहेबांच्याजवळ

सुमारें दीडशें हत्ती, पांच हजार घोडेस्वार, बारा हजार पायदळ व इतर बाजारबुणगीं आश्रित कामकरी अशीं एकंदर माणसें सुमारें पसतीस हजार होतीं. इतक्या सर्वांना जंगबहादुरास नेपाळांत राहा म्हणतां येईना, जाहि म्हणतां येईना. अखेर सर्वांचे विचारानें नानासाहेबांनीं जंगबहादुर यास ता. ३ फेब्रुवारी १८५९ रोजीं पत्र लिहून तें बद्रिसिंगाजवळ दिलें. तें असें:—"लखनौच्या बेगमसाहेब यांना त्यांचेजवळ असलेले सर्व राजे, तालुकदार, शिपांई, आश्रित यांसुद्धां आपण चित्तौन येथें भेट घेण्यास पत्रद्वारें विनंति केली, तो मजकूर विदित झाला. आपल्या महनीय औदार्याबद्दल आजवर आम्ही कर्णोपकर्णी ऐकतच होतो. ते समक्ष प्रत्ययाला येऊन फार आनंद वाटला. सर्व बाबतींत इंग्रजांशीं आपला हितविरोध असतां त्यांनाहि आपण मदत केली! हें पाहून असें मनांत आलें कीं, आजवर अनेक उदार राजे यापूर्वी हिंदुस्थानांत झाले व आजहि आहेत, पण त्यांना आपली तुलना नाहीं. यावरूनच भरंवसा वाटतो कीं, येथील सर्व परिवारांसह आम्ही चित्तौनला आपल्या भेटीस निघून आलों तर आपण आपला उदार आश्रय आम्हांस नाकारणार नाहीं! आतां जगांत आपणाशिवाय आम्हांस दुसरा आधार नाहीं! इंग्रज सरकारनें आजवर इतके तहनामे मोडले आणि इतक्या वचनांना हरताळ फासला आहे कीं, त्याचा येथें पुनरुच्चार करण्याचें कारण नाहीं. आणि त्यांनीं अखेर लोकांचा धर्महि बुडविण्याचा प्रयत्न केला म्हणून तर बंड झालें? येथून निघण्यापूर्वी आमचे बंधु श्रीमंत महाराजा गंगाधरराव, उर्फ बाळासाहेब पेशवे यांनीं स्नेहभावाचें पत्र पाठविलेंच आहे. तरी आपल्या इच्छेप्रमाणें ते आपली भेट घेऊन आपणांशीं योग्य ती चर्चा करतीलच."

लखनौच्या बेगमचा मुलगा युवराज ब्रिजिस कादर यानेंहि असेंच पत्र पाठविलें. पण या दोनहि पत्रांचा उपयोग झाला नाहीं. सरतेशेवटीं आपणांला या मंडळींना पकडतां येत नाहीं असें पाहून जंगबहादुर यानें राजरोस इंग्रज सरकारला तसें कळविलें व हॉर्सफोर्ड याला नेपाळच्या हद्दींत येण्याची परवानगी दिली! रापती नदीला वळणें आणि उतार पुष्कळ. पाण्याला जोर अतिशय. पण कसें तरी करून हॉर्सफोर्ड यानें नदी ओलांडून पुढें चाल केली, तों त्याला आढळलें कीं, सिटका घाटावर बंडवाल्यांनीं जय्यत मोर्चेबंदी करून तोफा रोंखल्या आहेत, इंग्रजांनीं पुढें चाल करतांच थोडीफार लढाई करून बंडवाले तोफा टाकून पळून गेले. नंतर तपास करतां इंग्रजांना कळलें कीं, नानासाहेब, बेगम वगैरे मंडळी तेथें नाहींत. ती पस्तीस

मैल तरी दूर आहेत! आतां या डोंगराळ प्रदेशांत सैन्य घेऊन त्याचा पाठलाग तरी कसा करावयाचा! असें पाहून हॉर्सफोर्ड यानें तो नाद सोडून दिला.

इंग्रज सैन्यांत असलेला एक सैनिक लिहितो, "या लढाईच्या वेळीं एकंदर देखावा इतका कल्पनातीत सुंदर होता कीं, त्याचें चित्र मनावरून पुसून जाणें शक्य नाहीं. समोर रापती नदीचें पात्र सुमारें दोनशें यार्ड रुंद संथ वाहत असून तिच्या पाण्याला वेग होता. नदीच्या पात्राला अगदीं लागून दोन्हीं कांठावर मोठमोठे उंच वृक्ष होते. आणि या पाठीमागें त्याहिपेक्षां उंच जशी हिमालयाची पर्वतराजी दिसत होती. पात्रांतून पलीकडे जाण्याची अनेक सैनिकांची लगबग चाललेली होती. असा चित्तवेधक देखावा सहसा पहावयास सांपडत नाहीं, यामुळें तो विसरणेंहि शक्य नाहीं."

नानासाहेबांसंबंधीं होपग्रँट आपल्या पुस्तकांत लिहितो—ता. ७ मे १८५९ रोजीं मी बळरामपूर येथें आलों. तेथें नानासाहेब व बाळाराव यांचीं मला पत्रें आलीं! त्यांत बाळारावानें लिहिलें होतें कीं, आपण कोणाहि युरोपियनाचा खून केला नाहीं व करविला नाहीं, व संधि मिळेल तर आपला निरपराधीपणा शाबीत करून देण्यास आपण तयार आहों! कानपूरच्या कत्तलींत घाटावर एक दहा वर्षांची मुलगी जखमी झालेली आसन्नमरण स्थितींत कांहीं धोब्यांना आढळली, तिला आपल्या कुटुंबांत आश्रय दिला असल्याचेंहि त्याचे पत्रांत लिहिलें होतें. नानासाहेबांच्या पत्रांत मात्र इंग्रजांना लाखोली वाहिली होती. "पुणें व सातारा ही जहागीर परत मिळाल्याशिवाय आम्ही शस्त्र खालीं ठेवणार नाहीं. हिंदुस्थानचें राज्य गिळंकृत करून उलट मलाच बंडखोर Outlaw ठरविण्याचा इंग्रजांना काय अधिकार पोंचतो?" असें त्यानें विचारलें होतें.

इंग्रजांनीं माफीचा जाहीरनामा छापला होता त्यामुळें मोठें काम झालें! सुमारें पंचवीस हजार लोक शस्त्रें टाकून मिळेल त्या मार्गानें निघून गेले. पेशव्यांचे परिवारांत आतां फार थोडे लोक उरले होते. जंगबहादुरच्या प्रदेशांत आश्रय मिळेनासा झाला कीं, घांट ओलांडून ब्रिटिश हद्दींत यावें, इंग्रज फौजांनीं पाठलाग केला कीं, पुनः नेपाळच्या अरण्यांत प्रवेश करावा असें करितां करितां नानासाहेबांची प्रकृति फार हैराण होऊन क्षीण झाली. एके दिवशीं मनास अतिशय वाईट वाटून त्यांनीं कालिमातेला आपल्या करंगुलीचा होम केला आणि अभीष्टसिद्ध्यर्थ प्रार्थना

केली ! ! त्या जंगलांतील हवेमुळें बाळासाहेब हें पांचसहा महिन्यांपूर्वींच वारले होते. तसलाच ताप नानासाहेबांस येऊं लागला. अखेर १८५९ चे आक्टोबरांत अत्यंत हालअपेष्टा व वनवास भोगून देवखरी येथील रानांत एका निर्झराचे कांठीं नानासाहेबांना हिंवतापानें मृत्यु आला. नजीकच एका गांवीं पेशव्यांचीं सर्व स्नीनातेवाईक माणसें होतीं. त्यांनीं येऊन त्यांचा अग्निसंस्कार केला. इंग्रज सरकारनें नानांना जिवंत पकडणारास एक लाख रुपयांचें बक्षीस लावलें होतें. पण कोणीहि त्यांचा विश्वासघात केला नाहीं !

नानासाहेबांच्या मृत्यूबद्दल इंग्रज सरकारनें पुष्कळ दिवस मुद्दामच वेड पांघरलें होतें. पण कित्येक इंग्रजांना ही गोष्ट खात्रीलायक कळलेली होती. शेरर या वेळीं कानपुरांत असून निरनिराळ्या अपराध्यांची चौकशी करण्याचें काम त्याचेकडे होतें. तो आपल्या पुस्तकांत लिहितो-" याच सालच्या हिवाळ्यांत ( १८५९.६० ) नेपाळच्या जंगलांत नानांना मृत्यु आला. कारण या वेळीं त्याच्या परिवारांत अगर खास आश्रित असलेले बरेचसे लोक पकाएकीं नेपाळांतून आयोध्यामार्गानें खालीं आले. याच सुमाराला ज्वालाप्रसाद पकडला जाऊन त्याला अगदीं पक्क्या बंदोबस्तांत कानपूरला आणलें होतें. कित्येकांनीं अशी शंका एकदोन वेळां घेतली कीं, नाना खरोखरच मेला कीं नाहीं ? पण मला वाटतें या शंकेंत काहींच अर्थ नाहीं. ज्वालाप्रसाद आमच्या कैदेंत असतां त्याच्यावर सक्त पाहरा होता. त्याचें फांशी जाण्याचें नशिब ठरल्यासारखेंच होतें. मीं इतकेंच केलें कीं, त्याला खातांपितां यावें इतपत त्याच्या बेड्या सैल केल्या. त्यांमुळें त्याला थोडें बरें वाटलें. त्याच्या शिक्षेंत बदल करणें हें कांहीं माझ्या हातीं नाहीं हें त्याला माहीत होतें. यामुळें माझ्याशीं तो अगदीं मोकळेपणानें बोलत असे, आणि माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देत असे. तो म्हणाला, " नानासाहेब वारले तेव्हां मी हजर नव्हतों. पण त्यांना अग्निसंस्कार झाला तेव्हां मात्र मी समक्ष हजर होतों " हें कांहीं तरी मुद्दाम तो खोटें सांगत होता असें दिसलें नाहीं. त्यानें सांगितलें तें सर्व मला अगदीं खरें खरें वाटलें. "

नानासाहेबांचा मृत्यू १८५९ साली घडला याबद्दल श्री. टिकेकर यांची सह्याद्री लेखांतील एक दोन पत्रें वस्तुस्थिति निदर्शक वाटतात. सिद्धिमान सिंग जंगबहादुरास लिहितो, " नाना व बाळाराव यांची आई मजकडे आली आणि हुजुरांची

भेट घेण्याची खास जरूरी आहे, शक्य तितक्या लवकर व्यवस्था करावी ” म्हणून तिनें कळविलें. आमच्या छावणींत बुखार बिमारी फार पसरली आसून आमची सोय दुसरीकडे कुठें चांगल्या हवेच्या जागीं झाल्यास फार बरे. नानांचा कैलासवास झाला. देवखरीस क्रियाकर्मांतरे करण्यास जागा नाहीं व सोयहि नाहीं. आपणांसमक्षच सर्व संस्कार व्हावे अशी इच्छा आहे. पण पैसा नाहीं; फार काय पण सुतकांत नेसण्याकरितां पांढरें पातळहि नाहीं. शिवाय आमचें कांहीं दागदागिनें विकावयाचे आहेत. त्यासाठीं गिऱ्हाईक हुडकाल तर फार बरे ’ असें ती म्हणाली. ( ऑक्टोबर १८५९ ).

तसेंच सिद्धमानचें दुसरें पत्रः—नानाच्या क्रियेसाठीं एक ब्राह्मण पंडित उत्तरक्रियेची पोथी, बाईबरोबर दिली. आणि त्याचप्रमाणेंच क्रिया यथासांग पार पडली. [ मिति कार्तिक शु॥ १० संवत् १९१६, ता. ५ नोव्हेंबर १८५९ ] पण टिकेकर यांनी हीच नानांची मृत्युतारीख असें म्हटलें आहे तें मात्र चूक वाटतें. ही क्रियाकर्मांतरांची तारीख आहे. म्हणजे १८५९ च्या आक्टोबरांत नानासाहेब वारले हें निश्चित ठरतें.

यापुढें त्रिवर्ग पेशव्यांच्या स्त्रिया वगैरे सर्व मंडळींनीं नेपाळांतच राहावयाचें ठरविल्याकारणानें इकडे त्यांची कांहींच हकिकत कळेनाशी झाली. यामुळें सामान्य लोकांत नानासाहेब अद्याप जिवंतच आहेत असा नंतर कित्येक वर्षें भ्रम होता. पेशव्यांच्या स्त्रियांनीं नानांचें क्रियाकर्मांतर जंगबहादुराचे अधिकाऱ्यासमक्ष करून त्याची खात्री पटविली. पण इंग्रजसरकार पुष्कळदां वेड पांघरून नानांच्या मृत्यूबद्दल रेसिडेंटमार्फत जंगबहादुराकडे वरचेवर चौकशी करीत असे. त्यावर जंगबहादुरानें एक चांगलाच तोडगा अंमलांत आणला. एक दिवस रेसिडेंटनें हाच विषय बोलण्यास काडला तेव्हां तो म्हणाला, “ नाना नेपाळांत जिवंत आहे अशी तुमची खात्री असेल तर तुम्हीं खुशाल आपले लोक येथे तपासाला पाठवा. आमच्या हद्दींत त्यांची बडदास्त आम्ही ठेवूं. हवी असेल ती मदत देऊं. तपासाला कोणतीहि हिल्ला हरकत करणार नाहीं. नाना सांपडला तर मी त्याला तुमच्याच हवालीं करीन. पण इंग्रजी अंमलदार नेपाळी हद्दींत शिरण्यापूर्वी तुम्ही माझेशीं एक लेखी करार करावा. त्यांतली मुख्य अट अशी कीं, जर ठरीव मुदतींत नानासाहेब सांपडला नाहीं तर ब्रिटिश सरकारनें नेपाळी दरबारास तराई व अयोध्येचा ईशान्य

भाग कायमचा तोडून द्यावा !! ही गोळी मात्र बरोबर लागू पडली व जंगबहादुरामागील संशयाचा ससेमिरा सुटला. असो.

या दुर्दैवी पेशव्याबद्दल आजवर इतिहासाचा फार वाईट ग्रह होता. पण आतां तो काळ राहिला नाहीं असें अलीकडील इंग्रजी इतिहासकारांच्या उद्गारांवरूनहि दिसून येतें. नाना बंडांत प्रथम न पडले तरी, एकदां पडल्यावर त्याचे सर्व परिणाम त्यांनी बिनतक्रार भोगले. इंग्रजांना शरण जाण्याचा मार्ग त्यांनी पत्करला नाहीं. बंडांत पडण्याचा परिणाम काय होईल याची कल्पना त्यांना खचित असलीच पाहिजे! या प्रसंगांत त्रिवर्ग पेशवे व पेशवेकुल नष्ट झालें! राजकारणांत पुष्कळदां असें घडतें कीं सहानुभूति बाधते. तोंडानें 'नाहीं' म्हणत असताहि चळवळीच्या क्रांतिकारक विपत्तींत माणसें ओढलीं जातात व नंतर स्वतःच्या मोठेपणाकडे पाहून त्यांना पाऊल मागें घेतां येत नाहीं. आणि अखेर 'प्रवाहपतित' होत होत, फांसावर लटकण्याचें त्यांच्या नशिबीं असतें हेंच खरे! नानासाहेबांकरितां जी नंतर पन्नास वर्षें हळहळ लोकांना वाटे ती याकरिता! कारण हेंच वस्तुस्थितीचें खरें वर्णन होतें. मराठेशाहीच्या इतिहासाचा 'शेवटचा दुवा' असें या पेशव्याबद्दल यथार्थपणानें म्हणतां येईल.

# परिशिष्ट

## (१)

## पेशव्यांचे स्त्रियांची नेपाळांतील हकीगत

दहा वर्षांपूर्वी प्रस्तुत ग्रंथकर्ता कानपूर, ग्वालेर, ब्रह्मवर्त येथें प्रवासास गेला असता, ब्रह्मावर्त येथें सुभेदार यांचे कारकून श्री. कृष्णाजी बळवंत रिसबूड यांची गांठ पडली. त्यावेळीं रिसबूड यांचें वय ६५ वर्षांचें असून बाजीरावाची बायको सईबाईसाहेब यांचें क्रियाकर्मांतर, त्यांनीच आपल्या हाताने केलें. नेपाळांतील पेशव्यांच्या आठ इनामी गावांची वहिवाट पाहाण्याकरिता तसेंच नेपाळांत व बाहेर ये-जा करण्याकरिता कारकून म्हणून हे रिसबूड काम करीत. तथापि यांचा दुसरा आप्तसंबंध म्हणजे असा कीं, बाजीरावाची बायको सईबाई ही यांची सख्खी चुलत आत्या. पेशव्यांचे बरोबर जीं अनेक घराणीं ब्रह्मावर्तास गेलीं त्यांतच तेथें

गेलेलें हें रिसबूड घराणें फार जुनें आहे. कृष्णाजीपंतांचे वडिलांचा सारा जन्म नेपाळांतच गेला व स्वतः कृष्णाजीपंतांनी पेशव्यांच्या नेपाळांतील गावांची वहिवाट चार वर्षे पाहिली. पुढील माहितीचें टांचण त्यांनी लिहून आपल्या सहीनिशीं प्रस्तुत लेखकाजवळ दिलें तें असेंः—

" नानासाहेबांचे बरोबर नेपाळांत त्यांच्या दोन सावत्र आया, त्यांची बायको ( यांना काकूसाहेब म्हणत ), एक भावजय, पुतणे रावसाहेब पेशवे यांची बायको रमाबाई, बयाबाईसाहेब आपटे इतकीं स्त्रीमाणसें व दोन ' कुणबिणी ' होत्या. एक कोठावळा परशुराम व दुसरा मीरमुनशी बाळाराम होता. हा जातीचा गोळक होता. माझे जन्माचे सुमारास वडील वारले. माझे चुलते हरीपंत हे सन १८६५ चे सुमारास श्रीमंत सईबाईसाहेब ( माझ्या सख्या चुलत आत्या ) यांचे घरीं नेपाळांत राहून त्यांचें कामकाज पहात. त्यांचा बहुतेक जन्म नेपाळांत गेला. नानासाहेब पेशव्यांच्या स्त्रीचें शेवटचें क्रियाकर्मांतर हरिपंतकाकांनी केलें व बाजीरावसाहेबांच्या पत्नी सईबाई यांची ' क्रिया ' माझे हाताने झाली. त्या वेळीं मी चोवीस वर्षांचा होतों. मीरमुनशी बाळाराम हा माझ्या देखत सुमारे ७० वर्षांचा होऊन वारला. तो बंडाच्या पुष्कळ गोष्टी सांगत असे त्या पुष्कळशा प्रसिद्ध हकीकतीपैकींच आहेत. तथापि त्यांपैकीं एक म्हणजे " नानासाहेब हे क्रूरकर्मा नसून अतिशय न्यायी व दयाळू असत. कानपूरच्या कत्तलींत नानासाहेबांचें मुळींच अंग नव्हतें. त्यांच्या पश्चात् शिपाई लोकांनीच ती परस्पर केली, ते नेते असल्यामुळे ती जबाबदारी त्यांच्यावर चिकटविण्यांत येते " असा त्याच्या भाषणाचा आशय असे. तिघा पेशव्यामध्ये बाळासाहेब हे विशेष उच्छृंखल व तापट असत. नानासाहेबांची बायको कृष्णाबाई अंगा-पिंडानें मोठी मजबूत, सशक्त व घोड्यावर बसणारी असे. तिला लिहितां वाचतांहि येत असे. सईबाई साहेबांनाहि घोड्यावर बसणें व लिहिणें येत असे. या दोघी पराकाष्ठेच्या धार्मिक व परोपकारी होत्या. नेपाळसरकारने खाटमांडू येथें ' थापाथली ' महालांत त्यांना एक मोठा वाडा राहावयाला दिला असून, त्यांना दर महिन्याला ४०० रुपये तनखा व आठ गांवें जहागीर दिलीं होतीं. गावांचें उत्पन्न सुमारें १२ हजार रुपये सालिना येत असे, शिवाय बारा नेपाळी शिपायांचा पगारहि नेंपाळ सरकारच देत असे. झालर असलेलें छत्र नेपाळांत राजाशिवाय दुसऱ्या कोणास वापरण्याचा अधिकार

नाहीं. पण नेपाळचें मुख्य देवस्थान पशुपतिनाथ याचे दर्शनास जातांना पेशव्यांच्या स्त्रियांना राजछत्र वापरण्याचा अधिकार होता. तसेंच ‘ देव पाटण ’ ही पशुपतिनाथाच्या जवळच राजघराण्यांतील लोकांच्या अंत्यसंस्काराची जागा आहे, तेथेच पेशव्यांचे घराण्यांतील स्त्रियांचे अन्त्यसंस्कार केले गेले. नेपाळ सरकारने पंतप्रधान पेशव्यांचें थोर नांव व महिमा पाहून या स्त्रियांना फार सन्मानाने वागविलें व त्यांना कमी पडू दिले नाहीं. सुमारें पस्तीस चाळीस वर्षे अव्याहत दर महिन्याला तनख्याची पहिली तारीख चुकली नाही; व या स्त्रियांना खर्च व दानधर्म करण्याला विवंचना पडली नाहीं. सईसाहेबांचा स्वभाव मोठा नेमधर्मी, धार्मिक व परोपकारी असे. नेपाळसारख्या कडक थंडीतहि त्या पहाटे चार वाजता उठून स्नान करीत व सात वाजेपर्यंत देवपूजा वगैरे धार्मिक कृत्यें आटपीत. नंतर स्वतः गोठ्यांतील गाईवासरांना दाणावैरण आहे की नाही याची स्वतः फिरून विचारपूस करीत. सरकारनें जे आठ गांव त्यांना दिले होते त्यांचे दिवाणी व फौजदारी अधिकार त्यानाच होते. त्यासंबंधी कामकाजांत लक्ष घालणें, हिशेब सांगून लिहविणें वगैरे कामें दुपारी होत. व संध्याकाळीं बाग वगैरे केला होता त्यांत थोडा वेळ फिरत. गत-वैभवाच्या गोष्टीबद्दल सहसा त्या बोलत नसत ! पोथीवाचनांत काळ घालवीत. सईबाईचेपेक्षा नानासाहेब पेशव्यांचें कुटुंब अधिक मनमोकळेपणाने इतरांशी बोलत असे. बाळाराम गांवच्या वसुलीच्या कामावर असे. येणेंप्रमाणे हकीगत आहे,’

( सही ) **कृष्णाजी बळवंत रिसबूड**
दस्तुर खुद्द.

( २ )

निर्वासितांच्या हकीगती आज आपण वर्तमानपत्रांत वाचतों, त्याचप्रमाणें १८५७ सालच्या निर्वासितांच्या हकीगती करुणास्पद आहेत. त्यावेळी युद्धांत जवळपास लाख माणसें बळी पडलीं, व सुमारें एक लाख माणसें घरादाराला मुकून निर्वासितांचें जीवन कंठीत होतीं. त्यांचे कसे हाल झाले असतील याची आजच्या परिस्थिती-वरून वाचकांनी कल्पना करिता येईलच. पण जीं माणसें खानदानी कुटुंबांतील होती त्यांना हा विपत्काल किती जाणवत असेल याचें वर्णन शब्दांनी करतां येणार

नाहीं. पेशव्यांच्या स्त्रीपरिवाराची हकीगत वर दिलीच आहे. असेच दिल्लीचा बादशहा बहादुरशहा हा रंगून येथें हद्दपारीचे दिवस कंठीत असतां, बरोबर त्याची सून होती तिनें दिल्लीस आपल्या आईला लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. दुःखी अंतःकरणानें लिहिलेल्या या पत्रांत शब्दाशब्दांत कारुण्य, लाचारी व दुःख यांचें पूर्ण प्रतिबिंब दिसून येतें. 'मेरा घर' या हिंदी मासिकावरून दादरचे श्रीयुत **गं. आ. नारकर** यांनी या पत्राचा अनुवाद प्रसिद्ध केला होता. सदर पत्राचा प्रस्तुत पुस्तकांत उपयोग झाल्याबद्दल लेखकाचे आम्ही आभारी आहों. सदर पत्र पुढें दिलें आहे:--

## शहाजादीचें पत्र

रंगून–बर्मा
दिल्लीच्या कैदी बादशहाचें घर,

पूज्य आईसाहेबांना नमस्कार,

मी आपल्या दिल्ली राजधानीपासून हजारों कोस दूर असलेल्या ठिकाणीं काळ्या पाण्याची शिक्षा भोगीत आहे. माहेराला मुकलें ! कायमचीच मुकलें !! आतां या जन्मीं तरी पुन्हां माहेरच्या कोणाला भेटण्याची आशा दिसत नाहीं. तुमचें पत्र साई सबीलशाहसाहेब घेऊन आले. जेव्हां ते बादशहाबरोबर बोलत होते, त्यावेळीं मी चिकाच्या पडद्याआडून पाहिलें. ते रडत होते. बादशहांचे डोळे सुद्धां अश्रूंनीं भरून आले होते. कांहीं वेळ गोष्टी करून झाल्यावर साईसाहेब जवांबख्तना बरोबर घेऊन माझ्या खोलींत आले व त्यांनीं मला पत्र दिलें. पत्र दिल्याबरोबर त्यांना रडूंच कोसळलें.

माझें लग्न झालें त्या वेळीं गालीब व जौक यांच्या शेरांविषयी चर्चा चालली होती. त्यावेळीं तुमच्याकडून ते शेर मी मागविले होते. त्यावेळीं ह्याच साई सबीलशाहसाहेबांनीं ते आणून दिले होते. त्या वेळीं मी हिंदुस्थानच्या युवराजाची पत्नी होतें. साई सबीलशाह सात देवड्या व पहारेकऱ्यांना ओलांडून माझ्याकडे आले. पण आज मी एक निर्वासित कैदी असून एका कैद्याची पत्नी आहे. एवढेंच नव्हे, पण कैदी सासुसासऱ्यांची सून आहे. आतां

येथें तो लाल किल्ला नाहीं, त्या सात देवड्या नाहींत आणि ते पहारेकरी सुद्धां नांहींत. पावसांत नेहमीं गळणारें एक साधेंसुधें लाकडी घर आहे. त्यांत दोन चार खोल्यांशिवाय दुसरी कसलीच सोय नाहीं. एका खोलींत बादशाह व राणी (सासूबाई) यांचें शयनगृह आहे. दुसऱ्यांत माझा व त्यांचा (जवांबख्त) बिछाना! तिसऱ्यांत नोकरचाकर, नि चवथ्या खोलीचा उपयोग स्वयंपाकगृह आणि दुसऱ्या इतर गोष्टींसाठीं केला जातो. मला येथील हवा मानवत नाहीं. पाऊस जास्त पडत असल्यामुळें डांससुद्धां बेसुमार आहेत. घर जुनें–पुराणें नि मोडकळीस आलेलें आहे. नेहमीं कांहींना कांही आजार हात धुवून पाठीस लागलेला आहेच. बादशाहा व महाराणी नेहमीं आजारी असतात. परंतु ईश्वराच्या कृपेमुळें जवांबख्त फक्त असे एकच आहेत कीं, त्यांना मात्र येथील हवेचा फारसा त्रास होत नाहीं. दिल्लीची जी परिस्थिति तुम्ही पत्रांत वर्णन केली आहे ती तर आम्ही दिल्लीला असतांना डोळ्यांनीच पाहिलेली आहे. हो, परंतु वडील बंधूच्या फांशीची बातमी मात्र पत्रामुळें नव्यानें कळली. तें तर बंडाच्या वेळीं बनारसला गेले होते. यांना कोणत्या गुन्ह्यासाठीं फांशी दिलें तें मात्र तुम्ही लिहिलें नाहीं. साईसाहेबांना विचारल्यावर ते म्हणाले, हजरत सैयद हसन अस्करींना फांशी दिलें त्याचेंहि कारण सुद्धां म्हणजे, त्यांना जें पत्र इराणच्या शाहानें लिहिलें होते त्यांत त्यांचा हात असून, त्यांना त्याविषयीं माहिती होती असें कोणी तरी म्हणत होते. आणि बनारसला सुद्धां एवढ्यासाठीं गेले कीं, या कटांत आपलें अंग नसून आपला कोणाला संशय येऊं नये असा बहाणा करतां यावा, हाच त्यांचा बनारसला जाण्याचा हेतु होता! मोठ्या बंधूना क्रूर रीतीनें फांशी दिलें नि त्यावेळीं तुम्ही स्वतः हजर होता. परंतु मला तर ह्या दुःखामुळें मूर्च्छाच आली. आम्ही जेव्हां दिल्ली सोडली त्यावेळीं ते कांहीं बनारसहून परत आले नव्हते. त्यांची धाकटी मुलगी त्यांची आठवण काढून काढून रडत असे हें सांईसाहेबांकडून ऐकून तर काळीज फाटूनच गेले. तिचें वय फार तर चार वर्षाचें असेल. त्या बिचारीला काय माहिती कीं, आपले वडील कोठे गेले आहेत तें! जेव्हा वडील बंधूचें प्रेत घरीं आणलें तेव्हां सईदा पुटपुटली, "अबा हजरत आमच्यावर रागावले आहेत, आमच्याबरोबर बोलत सुद्धा नाहींत, नुसते डोळे मिटून झोपून राहिले आहेत." हें सईदाचें बोलणें जेव्हा मला समजलें तेव्हां तर माझ्या काळजाचें पाणीच होऊन गेलें. सईदाची मला फार फार आठवण येते. आणि आतां तर वडील बंधूच्या मृत्यूची बातमी

ऐकल्यापासून तिची ती छोटी मूर्ति नि तिचा विचार डोळ्यांपुढून मुळीं हालतच नाहीं. सईदा म्हणजे मेलेल्या मृतात्म्याची जिवंत स्मृतिच ! तिला जर मला भेटतां–पाहतां आलें असतें तर हृदयाची जखम थोडी तरी भरून आली असती. पण ! मी कोठें नि सईदा कोठें ! आणि माझे आईवडील कोठें नि दिल्ली शहर कोठें ! आतां परत कांहीं दिल्लीला येण्याची आशाच नको.

आमच्या वडील मंडळींवर म्हातारपणीं अगदीं वाईट वेळ येऊन पडली आहे. हजरत बाबरवर सुद्धां आमच्यापेक्षां जास्त संकटें कोसळलीं होतीं. परंतु ते आमच्याइतके निराश झाले नव्हते. त्यांच्या पराक्रमाला दाही दिशा मोकळ्या होत्या. त्यांच्या तरवारींत पुरा जोर होता. त्यांच्या मनांत येईल त्या वेळीं हजारों नव्हे लाखों लोक सुद्धां त्यांच्या मदतीला धांवत येऊन त्यांचीं संकटें दूर होऊं शकलीं असतीं. पण आमची स्थिति अगदींच निराळी आहे. या शहरांतील एक मनुष्य सुद्धां आमच्याकडे सहानुभूतीनें पाहात नाहीं. या जगांत सहानुभूति प्रत्येकाला मिळत नसते. सहानुभूति दाखविणाऱ्यापासून कांहीं तरी मिळण्याची अपेक्षा असते तेव्हांच त्यांच्या सहानुभूतीला पाझर फुटत असतो. परंतु आमच्याकडून कोणाला काय बरें फायदा होणार ? आमची हुकमत व आमची सत्ता संपली आहे हें आतां सर्वांनाच कळून चुकलें आहे. आमच्या वैभवाचा दिमाख नाहींसा झाला आहे, आणि आम्हांला सहानुभूति दाखविणारे सर्व मरून गेले आहेत. आतां आम्हांला जो मदत करील किंवा आम्हांला सहानुभूति दाखवील त्यांना कैद किंवा फांशीची शिक्षा ठेवलेलीच ! याशिवाय आम्हांला मदत केल्याबद्दल त्यांना आणि दुसरें काय बरें मिळणार आहे ? हजरत इमाम हुसेनची हत्या करणाऱ्याला यजीदच्या दरबारांतून फारच कमी गुजराणा मिळत असे; आणि अर्थात् मजुरी म्हणून दीड शेर जव दिले जात असत. आणि त्या घातऱ्यानें दीड शेर जवासाठींच रसूलिल्लाहाच्या नातवाची कत्तल केली; परंतु जर हजरत इमाम हुसेन दीड शेर जव शाही फौजेंतील प्रत्येक मनुष्याला देऊं शकले असते तर तोच घातकी त्यांच्याबरोबर नमून राहिला असता.

आज आमची स्थिति सुद्धां अशीच झाली आहे. जे कोणी आम्हांला मदत करतील व आमच्याविषयीं सहानुभूति दर्शवतील त्यांना द्यायला आमच्याजवळ दीड शेर जव सुद्धां नाहींत ! मग त्यांनीं आम्हांला मदत तरी कां करावी ? अथवा आम्हांला

सहानुभूति दाखविण्याचा विचार तरी त्यांच्या मनांत कां यावा? हें सारें जग अशा उमेदीवरच चाललें आहे. जर आम्हांला कोणाची आशा–आकांक्षा पुरी करतां येणार नसेल तरी त्यांनीं आम्हांला मदत तरी कां करावी ? असो.

येथील भाषा एक प्रकारची तर धर्म दुसराच! येथील राहणी साहणी, खाणेंपिणें, सर्वच कांहीं आम्हांला अपरिचितसें आहे. आम्ही कोण आहोंत हें माहीत सुद्धां नाहीं त्यांना! आणि आम्हांला कैद कां केलें आहे याची दखल सुद्धां त्यांना नाहीं. आईसाहेब, आमची येथील कैद म्हणजे अशी आहे कीं, धड आम्ही कैदी नव्हे आणि धड स्वतंत्र सुद्धां नव्हे! धड जिवंत नव्हे आणि धड मेलेले सुद्धां नव्हे! आपल्या घरीं, आपल्या शहरीं आणि आपल्या देशांत जाऊं शकत नाहीं म्हणून कैदी समजावयाचें. व हातापायांत बेड्या नाहींत म्हणून स्वतंत्र म्हणायचें! बोलतों चालतों, खातों–पितों म्हणून जिवंत आहोंत झालें!! पण हें सर्व कोठपर्यंत लिहूं आणि काय काय म्हणून लिहूं! साई सबीलशाहाच्या तोंडूनच इकडील सर्व हकीकत व सर्व कांहीं कळेलच! सईदा सुलताना–(मोठ्या बंधूत्रीं अनाथ मुलगी) हिला पोटाशीं कुरवाळून नि तिचे मुके घेऊन आतेचा प्रेमपूर्वक आशीर्वाद सांगा. अबा हजरतची आठवण येऊं देऊं नका. नि आम्हांला सुद्धां विसरूनच जाऊं द्या. त्यांची भेट होणें तर अगदीं अशक्यच आहे व थोडयाबहुत प्रमाणांत आमची सुद्धां तीच गत आहे. ते तर खऱ्याखुऱ्या कबरस्थानांतच आहेत आणि आम्ही सुद्धां एक प्रकारच्या कबरस्थानांतच आहोंत! त्यांचें कबरस्थान स्वदेशांत तरी आहे. परंतु आमचें कबरस्थान सुद्धां मात्र परदेशांतच! आम्ही तर जिवंतपणीं सुद्धां कबरस्थानांतच आणि मेल्यावरहि कबरस्थानांतच!!

आईसाहेब! आदरपूर्वक प्रणाम,<br>
तुमची दुर्दैवी पुत्री<br>
शहाजादी

(३)

## बंडांतील प्रमुखांचा शेवट

१८५७ च्या संघर्षांत जीं प्रमुख माणसें पडलीं होतीं त्यांचा शेवट काय झाला तें येथें एकत्रच टिपणाचे रूपानें सांगतोः–

त्रिवर्ग पेशव्यांपैकीं नानासाहेब व बाळासाहेब नेपाळांत वारले व रावसाहेब पेशवे विमनस्क होऊन भटकत असतां फितुरीनें सांपडून १८६२ सालीं फांशी गेले. रणशूर कुवरसिंह व झांशीवाली लक्ष्मीबाई रणांत पडली. अमरसिंह व नानासाहेबांचा वकील अजीमुल्लाखान नापत्ता झाले. ज्वालाप्रसाद, रोहिलखंडचा महंमद अलीखान व बरेलीचे खानबहादुर खान यांना फांशीं देण्यांत आलें. वेणीमाधव नेपाळमधील लढाईंत कामास आले. लखनौमधील पुढारी म्हमूखान, तसेंच फरुकाबादचा नबाब याला जन्मठेप कैद मिळाली. फैजाबादचा प्रसिद्ध मौलवी अहंमद हुसेन हा पौवेनच्या किल्ल्यावर चाल करून जात असतां मारला गेला. महंमद हुसेन तसेंच बांदेवाले नबाब शरण येऊन त्यांनीं आपला जीव बचावला. तात्या टोपे फांशी गेले. दिल्लीचा वृद्ध बादशहा, त्याची तरुण बेगम झिन्नत महाल यांना ब्रह्मदेशांत हद्दपारी मिळाली. लखनौची बेगम पुढें वेषांतर करून अफगाणिस्तानांत पोंचली. आणि दिल्लीचा दुर्दैवी राजपुत्र फिरोजशहा हा इराणांतील रस्त्यांत भिकाऱ्याचे वेषानें भीक मागतांना कित्येकांना आढळून आला! याप्रमाणें गदरांतील प्रमुख पुढाऱ्यांचा आणि त्यांच्या महान प्रयत्नाचा शेवट झाला, व त्याची दारुण स्मृति मात्र पुढें इतिहासांत कायम राहिली!!

२३

# उपसंहार

गेल्या कांहीं प्रकरणांत १८५७ सालच्या चळवळीची आणि युद्धाची आम्हीं धांवती त्रोटक हकिगत सांगितली, त्यामुळें त्याचें मुख्य सूत्र वाचकांचे लक्षांत आलें असेल. पुष्कळ तपशील, लढाया व कत्तली यांना आम्ही संक्षेप दिला याचें कारण, शंभर वर्षांनंतर आज त्या गोष्टींना नवलकथांपेक्षां अधिक महत्व राहिलेलें नाहीं व त्या सांगितल्या तरी, ग्रंथाची मुख्य फलश्रुति त्यानें बदलूं शकत नाहीं. ती फलश्रुति हीच कीं, इंग्रजांची सत्ता नाकबूल करून व इंग्रजांच्या अन्यायांचा निषेध किंवा सक्रिय प्रतिकार म्हणून हिंदी लोकांनी बंड केले, पण शिस्त, संघटना व राष्ट्रीय बुद्धि या गुणांत याहि वेळीं इंग्रज हाच आमच्यापेक्षां शेर ठरल्यामुळें बंडाची चळवळ फसली. व त्याचा परिणाम इतका तीव्र झाला कीं सशस्त्र बंडाच्या चळवळीचें पुढें शंभर वर्षांत कोणी नांव देखील काढूं नये! त्या-वेळीं शस्त्रबंदीचा कायदा अंमलांत नसल्यामुळे सशस्त्र बंड होऊं शकलें असें नव्हे; उघड बंड करून मृत्यूच्या दारांत पाऊल घालणारें हवीं तेथून शस्त्रें पैदा करतात! १८५७ सालीं सरकारच्या पलटणीच फितूर झाल्या यामुळें बंड मोडणें सरकारला

अवघड गेलें. पण शस्त्रास्त्रें हातीं असलेल्या पलटणी फितूर करण्यांत बंडवाल्यांना यश आलें तरी, दुर्दैवानें एक गोष्ट मात्र बंडवाल्यांजवळ शेवटपर्यंत नव्हती. ती म्हणजे उत्तम सेनानायकत्व व लष्करी हालचालींची संघटना. याचीं अगदीं ठळक उदाहरणें या पुस्तकांतच वाचकांनां आढळलीं असतील.

बंडवाल्यांत एकहि पुढारी असा नव्हता कीं ज्याचा शब्द सर्वजण मानतील, किंवा जो अनेक ठिकाणची लष्करे कोठेंतरी एकत्र आणून लढाई देऊं शकेल. इंग्रज दिल्लीसमोरच्या टेकडीवर तीन महिने तळ देऊन होते, पण मुसलमानांना एकदाहि चढाई करून त्यांचा पराभव करता आला नाहीं. अखेर सप्टेंबरांत दिल्लीला वेढा पडला तेव्हां बखतखां खुशाल तीस हजार सैन्य घेऊन यमुनेच्या पुलावरून निघून गेला, तेव्हा दिल्ली सर झाली! बादशाहीच्या अभिमानानें हें सैन्य ठांसून उभें राहतें तर इंग्रजांनां जय मिळणें अशक्य होतें. कानपूरला अगदीं उघड्या मैदानांत बराकींत व्हीलरजवळ सुमारें हजार बाराशें इंग्रज माणसें होतीं. त्यांतहि तीन चारशें बायकामुलेंच होतीं. बाहेर संरक्षणाकरितां अगदी नांवाला एक वाळूची भिंत होती ती चार फूट देखील उंच नसेल! उलट नाना-साहेबांजवळ इंग्रजांकडून हस्तगत केलेलें मॅगेझीन व त्यांतील अगणित शस्त्रास्त्रें होतीं. पण चोवीस दिवसपर्यंत मारा करूनहि ही भिकार छावणी बंडवाल्यांना सर करून घेतां आली नाहीं! यांत कोणाचें खरोखर कौतुक करावें हें वाचकांनीच सांगावें! नानासाहेबांवर इंग्रजांनीं केलेले सर्व व्यक्तिविषयक आरोप खोटे असतील; पण बायकामुलांचें संरक्षण करीत व्हीलरच्या छावणींत जे शूर इंग्रज सैनिक अहोरात्र खडे उभे होते त्यांची अपूर्व कर्तव्यनिष्ठा बंडवाल्यांच्या सैन्यांत एकांत देखील नव्हती. त्यावेळीं वेढ्यांत असलेल्या एका इंग्रजानें उघड म्हटलेंहि कीं "या बायकामुलांमुळें आम्ही मोठ्या पेचांत अडचणींत आलों; पण आमच्या जागीं हे बंडवाले असते आणि आम्ही त्यांच्या जागीं बाहेर असतो तर, चोवीस दिवस कशाला, एका तासांत आम्ही ही छावणी सर करून दाखविली असती!

लखनौंत साऱ्या शहराविरुद्ध मूठभर इंग्रज एका रेसिडेन्सींतून झगडत होते. लखनौंत बंड होणार जसें दिसतांच लखनौतून कोठेहि पळून जावयाचें नाहीं, रेसिडेन्सी व मच्छीभवन ही दोन्ही ठिकाणें शिस्तीनें लढवावयाचीं अशी हेनरी लॉरेन्स यानें प्रथमपासून विचारपूर्वक योजना केली होती. आणि त्याप्रमाणें त्यांनीं चार महिनें मोठ्या धैर्यानें रेसिडेन्सी लढविलीहि. पण यांतहि इंग्रज अल्पसंख्य

म्हणून त्यांचेंच कौतुक करावें लागतें, हें कोणीहि कबूल करील. इंग्रजांची फौज परदेशांत होती किंवा येथेंच मुंबई मद्रासकडे होती ती वाट चालू लागेपर्यंत, किंवा येऊन पोंचेपर्यंत इंग्रजांनी मोठे संकटांत दिवस काढले. पण त्यांचा आत्मविश्वास अत्यंत जबर होता. मुंबई, मद्रास, कलकत्ता, लंडन हे तारायंत्र सुरू होऊन फौजा चालू लागतांच, हा लढा आम्ही हरूं असें इंग्रजांना चुकून देखील वाटलें नाहीं. त्यावेळच्या इंग्रजी अधिकाऱ्यांतील प्रमुख माणसें म्हणजे, आग्र्यास कोलविन, ग्वालेर येथें मॅकफर्सन, लखनौमध्यें सर हेनरी लॉरेन्स, मुंबईस एलफिस्टन, पंजाबांत जॉन लॉरेन्स व त्याचे सहकारी, हीं माणसें अशीं होतीं कीं चोवीस तासांत राजकारणाचें सूत्र त्यांनीं क्षणभर देखील सोडलें नाहीं; या जबर कर्तव्यनिष्ठेमुळेंच बंडवाल्यांवर अखेर प्यादेमात झाली. बंडवाल्यांत गांवातले बाजारबुणगे तमासगीर फार. पुढारी हवे तितके. त्यांतहि कोणी कोणाचें ऐकावयाचें हाच प्रश्न ! यामुळें इतर ठिकाणच्या लष्करांचें संचलन राहोच, पण एका ठिकाणच्या लष्करी हालचाली देखील नीट सूत्रबद्धतेनें होत नसत. त्यांत हुल्लड फार. इंग्रज आले कीं बंडवाले संख्येने कितीहि अधिक असले तरी दोन दिवस कांहीं टिकाव धरीत नसत. उघड्या मैदानांत लढाई झाली आणि इंग्रज ती हरले अशीं दहापांच उदाहरणेंहि बंडाच्या अनेक लढायांत काढून दाखवितां येणार नाहींत असें वाटतें. ज्या पळण्याला " गनिमी कावा " असें नांव देतात त्यांत पराजय झाला तरी सांवरून पुन्हा छापा घालण्याची व वेळ प्रसंगीं त्यांत प्राणार्पण करण्याची तयारी असते. नानासाहेबांनी कानपूरवर पुनः हल्ला करून तें घेतलें व पांच महिने हातांत ठेवून लखनौला शह निर्माण केला; किंवा तात्या टोपे यांनीं अखेरीस एक वर्षभर सहा इंग्रज फौजा आपल्या पाठीमागें नाचवत ठेवल्या अशीं गनिमी काव्याचीं उदाहरणें किती ? त्यावेळचे इंग्रजी सेनापती म्हणजे कांहीं नेपोलियन व वेलिंग्टनच्या तोडीचे नव्हते. सर्वसामान्य होते. आणि हिंदी पुढाऱ्यांनीं पुष्कळदां लष्करी विद्वत्तेंत त्यांशी तुलनेने बरोबरीहि केली. पण इंग्रजांच्या हालचालींत जी एक सूत्रबद्धता, संघटना दिसली ती बंडवाल्या पुढाऱ्यांत दिसली नाहीं. यामुळें जगदीशपूरचा कुंवरसिंग, झांशीवाली राणी, तात्या टोपे वगैरे कित्येकांत लष्करी चातुर्याचे गुण फार चांगले असतांहि, सहमत व इतरांची मदत यांचे अभावीं त्यांचे गुण रणांगणावर प्रभावी होऊं शकलें नाहींत!

१८५७ सालीं देशी सैन्य गोऱ्या सैन्यापेक्षां पांचपट अधिक झालें त्यामुळे बंड करणें सुलभ झालें असें कित्येकांस वाटते तें मात्र बरोबर नाहीं, हें त्यापूर्वीच्या

शंभर वर्षांच्या आंकड्यावरूनहि सिद्ध करितां येईल. इंग्रजांच्या पदरचें देशी सैन्य ब्रिटिश सैन्यापेक्षां नेहेमींच अधिक असे. या पलटणी फितूर करतां आल्यामुळेच बंड करितां आलें. १७५७ सालापासून आंकडे घेतले तरी ४:१ किंवा ५:१ हें प्रमाण फारसें बदललें नाहीं. कारण गोरी फौज हिंदुस्थानांत अशी होती किती ? इंग्रजांनी देशी फौजेच्या बळावरच हिंदुस्थान जिंकले ही गोष्ट कांहीं खोटी नव्हती. क्लाइव्हने प्लासीची लढाई जिंकली तेव्हां मद्रासच्या फौजेंत इंग्रज लोक मूठभर होते, देशी फौजच अधिक होती. सन १७७२ मध्यें बंगालच्या फौजेंत सारे ३५०० युरोपियन व २४००० नेटिव होते! १७७३ मध्यें मुंबई, मद्रास व बंगाल तीनहि प्रांत मिळून ९००० युरोपियन व ४५००० देशी फौज म्हणजे १:५ हेंच प्रमाण होतें. १७९७ मध्यें इंग्लंडमधून आलेलें बादशाही सैन्य फक्त ९ तुकड्या होतें. नाना फडणिसाच्या मृत्यूचे वेळीं हिंदुस्थानांतील गोरी फौज १३५०० व देशी फौज ७०००० होती पुढें मराठ्यांशी युद्धें झालीं त्यामुळें सन १८०८ मध्यें गोरें सैन्य २४५०० व देशी सैन्य एक लक्ष तीस हजार झालें. १८५७ सालीं बंडाचे वेळीं गोरे सैन्य ४५००० व देशी सैन्य दोन लक्ष पस्तीस हजार होतें. यांत देशी संस्थानांतील सैन्य सुमारे पस्तीस हजार होतें तें हिशेबांत धरलेलें नाहीं. तात्पर्य, १७५७ सालीं देशी व विदेशी फौजेचें प्रमाण होतें त्यापेक्षां १८५७ सालीं वेगळें नव्हतें! तेव्हांहि ५:१ हेंच प्रमाण होतें हें खरें, पण प्लासीच्या लढाईच्या काळीं जो मुलूख इंग्रजांकडे होता त्यापेक्षां १८५७ सालीं कितीतरी पट अधिक होता. मुलूख अधिक याचाच अर्थ असंतोषहि अधिक होता. व मुख्य गोष्ट म्हणजे १८५७ सालीं साऱ्या देशी फौजेचें इंग्रजांबद्दल मन बदललें होते! इंग्रज म्हणजे सच्चें सालस आहेत ही प्लासीच्या वेळची देशी शिपायांची भावना राहिली नव्हती. बंडाचा अनुभव आल्यानंतर १८५९ सालीं सरकारने जें रॉयल कमिशन नेमले त्यांत देशी विदेशी सैन्यांचे प्रमाणांत बदल करण्यांत आला. बंगालच्या फौजेंत हें प्रमाण २:१ व मुंबई व मद्रासच्या फौजेत ३:१ असे हें प्रमाण करण्यांत आलें. आणि जातीच्या भावनेचा खेळ पुनः करण्यांत येऊं नये अशीहि मुद्दाम दक्षता घेण्यांत आली. देशी सैन्यापेक्षां युरोपियन सैन्य अधिक ही गोष्ट मात्र आज तागायत दोनशें वर्षांत घडलेली नाहीं. इंग्रजाविरुद्ध लढण्याला इंग्रज मिळूं नये आणि हिंदी लोकांविरुद्ध लढण्याला इंग्रजांना हिंदी लोक हवे तितके मिळावे यावरूनहि आमच्या राष्ट्रीय स्वभावावर प्रकाश पडण्यासारखा आहे! (न. चिं. केळकर कृत

"Case for indian Home Rule" या पुस्तकांतून वरील सैन्यांचे आंकडे उद्धृत केले आहेत.)

१८५७ सालच्या युद्धाला 'स्वातंत्र्य युद्ध' असें नांव देण्याचा कित्येकांना अलीकडे मोह होतो. पन्नास वर्षांपूर्वी लोकहितवादी गोपाळराव देशमुख किंवा विनायक कोंडदेव ओक हे या घटनेचा उल्लेख "शिपायांचा दंगा" असा करीत. दादाभाई नौरोजी यांचेंहि पार्लमेंटमधील जॉन ब्राईटप्रमाणें मत असें होतें कीं सामान्य जनता जर या बंडापासून पूर्णपणें अलिप्त होती तर या बंडाचा खर्च म्हणून ४० कोट रुपये हिंदुस्थानच्या राष्ट्रीय कर्जांत समाविष्ट करणें बरोबर नाहीं. तो अन्याय होईल. 'सामान्य जनता या चळवळीपासून अलिप्त होती' हें या दादाभाईचें विधान मान्य करावयाचें तर या बंडाला 'स्वातंत्र्य युद्ध' असें मोठें नांव देणें अवघडच जाईल. म्हणून कोणत्याहि प्रचार कल्पनांचा मोह सोडून देऊन, वस्तुस्थितीला प्राधान्य द्यावयाचें तर आम्ही या घटनेला 'बंड' हेंच नांव अधिक पसंत करतो. केवळ तें अयशस्वी झालें म्हणून त्याला 'बंड' म्हणावयाचें असा अर्थ नाहीं. तर सारा हिंदुस्थान म्हणजे त्यांतील बहुजन-समाज त्यांत पडलाच नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांतील मुंबई व मद्रास इलाखा हे तटस्थ होते. आणि गंमत अशी कीं ज्या संस्थानिकांच्या हक्काककरितां हें बंड होतें त्या संस्थानिकांनीच इंग्रजांना मदत करून हें बंड मोडलें! राज्यक्रांतीची कल्पना कांहीं प्रमुख व्यक्तींच्या डोक्यांत त्यावेळीं आली असेल, पण बहुतेक सर्व पलटणी शिपाई किंवा बंडांत पडलेले जमीनदार लोक यांनीं स्वतःवरील विशिष्ट अन्यायाच्या प्रतिकारा करितां बंड केलें होतें. अर्थात दोघांचे हेतू वेगळे होतें. उघड किंवा गुप्त मतप्रचार त्यावेळीं हवा तितका झाला. पण एकाहि प्रमुख संस्था-निकाचे मनांत 'राज्यक्रांती' करितां बंड करावें ही कल्पना मूळ धरूं शकली नाहीं. याचें कारण, जाणत्या विवेकी पुढाऱ्यांत त्यावेळीं यासंबंधांत तीव्र मतभेद असावे असें दिसतें. आणि हे मतभेद अशाकरितां होते कीं, बंड करण्याकरितां जी आंतर-राष्ट्रीय अनुकूल परिस्थिति लागते ती पॅरिस येथें तह होऊन साफ बदलली होती!

हा मुद्दा कांहीं तारखा लक्षांत घेतल्या असतां सहज कळण्यासारखा आहे. तारीख ७ फेब्रुवारी १८५६ रोजी अयोध्येचें राज्य खालसा होऊन इकडील कांहीं राजकारणी मंडळी विलायतेस शिष्टाई करितां गेली असतां, आशिया व युरोप या दोन्ही खंडांत

युद्ध सुरू होऊन इंग्लंड परराष्ट्रीय संकटांत सांपडलें. ( मागें पृष्ठें ५८ पाहा ) रशिया विरुद्ध युद्ध सुरू होतें त्यांतच १ नोव्हेंबरला पर्शिया विरुद्ध युद्ध सुरू झालें. कँटन बंदराबद्दल तंटा होऊन ११ डिसेंबरला नागासाकी येथें जपानशीहि युद्धाला तोंड लागलें. याच परिस्थितींत ता. २ जानेवारी १८५७ रोजीं काडतुसांचें प्रकरण निघून असंतोषाच्या कोठारांत ठिणगी पडून पलटणींतील शिपाई बिथरले. त्यावेळीं रशिया व अफगाणिस्तान यांचेकडून मदत मिळण्याची आशा असल्यानें ( मागें पृ. १२० वरील जबानी पाहा ) असंतोषाचा फैलाव झपाट्यानें झाला. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, पुढें अवघ्या दोनच महिन्यांत १६ मार्च १८५७ रोजीं पॅरीस येथें इंग्लंड व पर्शिया यांचा तह झाल्याची बातमी येथें येऊन थडकली, आणि इंग्रजांची सद्दी आणि सुदैव पुनः सुरू होऊन आंतरराष्ट्रीय परिस्थितींत पुनः सामसूम झालें ! ! हिंदुस्थानांतलें गोरें सैन्य परदेशांत गेलें होतें तेंहि परत येण्याची वाट चालूं लागलें होतें. अशा स्थितींत हिंदुस्थानांत 'राज्यक्रांती'करितां बंड करण्याची अपेक्षा करणें म्हणजे फाजील आशावादित्वच नव्हतें काय ? कशाच्या आधारावर हें बंड करावयाचें ? बंड करील तो देशभक्त आणि न करील तो नादान, असें सरसकट कसें म्हणतां येईल ?

परराष्ट्रीय मदतीबद्दल सुभाषबाबूंचें एक वाक्य अगदीं मनन करण्यासारखें आहे. "**गेल्या दोन शतकांतला जगाचा इतिहास मी मननपूर्वक वाचला आहे. विशेषतः स्वातंत्र्याच्या लढ्याचें मी अध्ययन केलें आहे. त्यांत परराष्ट्राच्या सहाय्याशिवाय स्वातंत्र्य मिळाल्याचें एकदेखील उदाहरण मला आढळलें नाहीं.**" असें त्यांनीं स्पष्ट लिहिलें आहे. सुभाषसेनेच्या उठावणींत आणि १८५७ च्या उठावणींत मुख्य फरक असा आहे कीं, इंग्लंड निदान जागतिक युद्धाच्या आगींत सर्व बाजूंनीं होरपळून निघत असतां सुभाषसेनेनें उठाव केला. याच्या अगदीं उलट ता. १० मे १८५७ सालीं बंड सुरू झालें त्या आधीं दोन महिने, पॅरिस येथें तह होऊन जगांत पूर्णपणें आंतरराष्ट्रीय शांतता झाली होती. विजयी इंग्रज सैन्यें परत हिंदुस्थानकडे येण्याची वाट चालत होतीं; आणि जरी मध्यंतरीं बंडाला सुरवात होऊन इंग्रजांनीं प्राणसंकटांत दिवस काढले तरी, बंडाला यश येईल असें ज्याप्रमाणें एकाहि इंग्रजाला वाटत नव्हतें त्याप्रमाणें बहुतेक संस्थानिकांना, तसेंच इकडील विवेकी हिंदी मनुष्यांनाहि तसेंच वाटत होतें.

बंडाचे पुढारी स्वातंत्र्याच्या कल्पनेने प्रेरित होऊन या चळवळींत पडले नव्हते. ते व्यक्तिविषयक स्वार्थाकरिता म्हणजे स्वतःच्या राज्यांकरितां त्यांत पडले होते, हें कांही अंशीं खरें आहे. पण **संस्थानी स्वराज्य** हेंच त्यावेळच्या स्वराज्याच्या चळवळीचें रूप होतें. आजची लोकशाहीची कल्पना शंभर वर्षांपूर्वी कशी लावतां येईल? इंग्रजांच्या परकीय लोकशाहीपेक्षां संस्थानिकांची एकतंत्री राजसत्ता शतपटीनें बरी असें लोकांना प्रामाणिकपणें वाटत होतें; म्हणून तर त्यांनी कांही सस्थानिकांना आग्रहानें पुढारीपण देऊन इंग्रजांचा प्रतिकार केला. प्रत्येक चळवळीच्या वेळीं परिस्थित्यनुसार लोकांच्या असंतोषाचा कोणत्यातरी एकाद्या कल्पनेभोंवतीं आवर्त बनून राहतो. त्यावेळीं ही कल्पना 'संस्थानी स्वराज्या'ची होती याचें कारण, त्यापूर्वी पन्नास वर्षें अगोदर जें स्वराज्य होतें त्यांत ठिकठिकाणीं हीं संस्थानेंच नांदत होतीं. संस्थानें म्हणजेच स्वराज्य, यापेक्षां त्या वेळीं लोकांची राजकीय कल्पना अधिक नव्हती. इंग्रज येण्यापूर्वी ज्याचें जें जें होतें तें तें त्याला हवें होतें. यांत कोणाचा राजकीय स्वार्थ असेलहि!

बंड झालें त्यावेळीं हिंदुमुसलमानांची एकी आटोकाट होती. पण चार महिन्यांतच ती तकलुपी आहे, असें दिसून आलें. दिल्लींत एक जिहादी मुसलमानांची पलटण होती त्यांची समजूत काढतां काढतां बहादुरशहाचे नाकीं नव आले. अयोध्येच्या राज्यांत शिया पंथाचें वर्चस्व फार व सुनी पंथाइतका हा पंथ कडवा नसल्यामुळें हे लोक हिंदूंशी मिळून असत. तथापि व्यापक राष्ट्रीय बुद्धि असल्याने जसें राजकारण रंगतें तसें केवळ धर्मप्रेमानें रंगत नाहीं. मद्रासच्या किंवा हैद्राबादच्या फौजेने दिल्लीवर जाऊन मुसलमानांशीं लढण्याचें नाकारलें पण कानपूर, कालपी, ब्रह्मावर्त येथें हिंदु बंडवाल्यांवर त्यांनीं खुशाल आपलें हत्यार चालविलें. आणि लखनौ अयोध्येंत मुसलमान बंडवाले होते त्यांचा मोड इंग्रजांनीं पंजाबांतले शीख किंवा नेपाळांतील गुरखे आणून सहज केला, हीं त्यावेळीं सामान्य हिंदी माणसाच्या अंगीं असलेल्या राष्ट्रीय बुद्धीचीं दोन ठळक उदाहरणें आहेत. ही आमची राष्ट्रीय बुद्धि! इंग्रज तर भेदनीतींत प्रवीणच आहेत, पण हिंदी लोकांच्या चारित्र्यांतील या अवगुणांचा इंग्रजास फायदा मिळावा यांत हिंदी लोकांना भूषण कोणतें?

या बंडामध्यें इंग्रजांनीं क्रोडों रुपयांची संपत्ति हिंदुस्थानांतून विलायतेस धुवून नेली आणि हिंदुस्थान अगदीं धुळीस मिळविलें! बंड होण्यापूर्वी सनदशीर लूट

चाललीच होती, आणि बंडाचा पुकारा होतांच हात चालवून खिसे भरण्याला त्यांना कायद्याचें कसलेंच बंधन उरलें नाहीं. व तें काम लहानथोर इंग्रज अधिकाऱ्यांनीं अशा चोख रीतीनें बजावलें कीं त्यानें त्यांचें जन्माचें दारिद्र्य फिटलें! "प्रत्येक इंग्रज शिपायानें आपणांबरोबर विलायतेला कमींतकमी दहा हजार रुपये लुटीचे नेले असतील" असें मार्टिननें आपल्या पुस्तकांत म्हटलें आहे. त्यावेळच्या लुटींचीं रसेलसारख्या इंग्रजांनींच जीं वर्णनें लिहिलीं आहेत तीं वाचलीं असतां मार्टिनच्या म्हणण्यांत काडीमात्र अतिशयोक्ति नाहीं असें वाटतें. त्यावेळीं असा लष्करी नियमच होता कीं, एखादें शहर सर झालें कीं त्यांत मिळालेल्या सर्व लुटीवर हक्क सैनिकांचा, सरकारचा नव्हे. यामुळें शहर काबीज होतांच निरपराध जनतेवर इंग्रजांचे शिपाई लांडग्यासारखे तुटून पडत. त्यांत सोनें, रुपें, हिरे माणिक मोती हें तर जाईच, पण कापडचोपड, लाकडी सामान, धान्य वगैरे कोणतीहि उपयुक्त वस्तु शिल्लक राहात नसे.

वरसईकर गोडसे भटजी यानें झांशीतील लुटीची हकिगत दिली आहे त्यांत जें झांशीचें वर्णन तेंच प्रत्येक शहरांतील लुटीचें. दिल्लीच्या लुटींत प्राईझमनी म्हणून इंग्रजांना अठ्ठावीस लक्ष रुपये मिळाले, ब्रह्मावर्तास सुमारें वीस लक्ष रुपये मिळाले. लखनौ येथें तर अगणित संपत्ति मिळाली. चित्रकूटास पेशव्यांचे खजिन्यांत इंग्रजांना कित्येक लढायांस पुरेल इतकें अमूप द्रव्य मिळालें, असें मॅलेसन यानें लिहिलें आहे. अशी प्रत्येक ठिकाणची यादी करण्यांतहि अर्थ नाहीं. हें द्रव्य चोरापोरीं म्हणजे लूट करणाऱ्या शिपायांनां बक्षीस मिळालें आणि युद्धखर्च म्हणून चाळीस कोटीचा भुर्दंड हिंदुस्थानच्या डोक्यावर बसला तो वेगळाच! 'सत्तावन सालच्या बंडामुळे इंग्रज सरकारचें काडीमात्र नुकसान न होतां त्यांस उलट अनेक तऱ्हेनें फायदाच झाला. दैवबळ अनुकूल असलें म्हणजे असेंच होतें. बंडांत त्यांस जय मिळाला इतकेंच नव्हे तर, अनेक ठिकाणीं कोटी रुपयांची संपत्ति लुटीदाखल मिळून त्यांनीं विलायतेची लंका बनविली!'

'It is impossible to calculate even approximately what this payment of tribute amounted to, Sir George Wingate recons it at 100 millions from the beginning of the 19th century down to 1858, without calculating interest. Montgomery Martin reckons it at over 700 millons

during the first years of the century, calculating compound interest at Indian rate of 12 percent. And these calculations exclude the sums remitted from India in the 18th century!'

India in the Victorian Age. P. 220
By R. C. Dutt

बंडापूर्वी लोकांची आर्थिक स्थिति वाईट होती पण नंतर ती आणखी हलाखीची झाली. अशा या निर्धन प्रजेला बंडानंतर शस्त्रबंदीचा कायदा लावून सरकारनें पूर्णपणें निर्वीर्य केलें. बंड अयोध्येच्या राज्यांत झालें म्हणून तेथें प्रथम हा कायदा लावला. तेव्हा एकटया अयोध्या प्रांतांत लोकांकडून पंधरा लक्ष हत्यारें गोळा केलीं! त्यांत ६४२ इतक्या तोफा होत्या. पूर्वी भिल्ल, बेरड, रामोशी वगैरे जाति कांहीं अंशी अंगच्या वीरवृत्तीवर चरितार्थ चालवीत. त्यांना गुन्हेगार जाति असें सरकारनें ठरविलें त्यामुळें पुढें हजारो लोकांना चरितार्थाची देखील पंचाईत पडूं लागली. चोरांचिलटापासून देखील आपलें संरक्षण करण्याचें जनतेंत त्राण राहिलें नाहीं. हिंदुस्थान एवढा अवाढव्य देश, पण त्यांत जिकडे तिकडे शुकशुकाट झाला. इतकेंच नव्हे तर स्मशानशांतता नांदूं लागली! १८७७ सालीं दिल्ली दरबार झाला त्यावेळीं उत्तर हिंदुस्थानांत अवर्षणामुळे दुष्काळ पडून तीस लाख माणसें मेलीं! पण इंग्रजी राज्याच्या महोत्सवांत खंड पडला नाही आणि लोकांचें दैन्यहि काडी-मात्र सरलें नाहीं! या सर्व गोष्टी मनांत आल्या म्हणजे मोठी कालवाकालव होते, पण त्याला इलाज नाही! असो.

अशाहि स्थितींत आणखी वीस वर्षें गेली. १८५७ च्या बंडानंतर एक पिढी उलटून गेली. सशस्त्र बंडाची कल्पना मागें पडून सनदशीर राजकारणाने ती घेतली. क्रांतीबद्दल उत्क्रांतीची कल्पना आली. आणि साम्राज्यांतर्गत स्वराज्य हें हिंदु-स्थानचें ध्येय झालें. १९ वें शतक संपून विसावे शतकाच्या प्रारंभीं ब्रिटिश साम्राज्य वैभवाच्या इतकें शिखरास पोंचलें होतें कीं "ज्या साम्राज्यावर सूर्य कधींहि मावळत नाहीं" असें ब्रिटिश साम्राज्याचें वर्णन केलें जात असे. व तें वर्णन अगदीं यथार्थ होतें. यानंतर देशांत कॉंग्रेसचें सनदशीर राजकारण तसेंच दहशतवादी पक्षाचेंहि राजकारण सख्या चुलत अंतरानें चालूं होतें. त्यांतच गेल्या पंचवीस वर्षांत दोन महायुद्धें झालीं. पहिल्या महायुद्धानंतर ब्रिटिश साम्राज्याला कीड लागली

आहे असें दिसून आले. आणि दुसऱ्या महायुद्धांत रणांगणावर मिळालेला विजय काडीमात्र उपयोगी न पडतां, कर्जाच्या बोजाखालीं त्या भव्य साम्राज्याचा चुराडा झाला! साम्राज्याच्या पातकांची शीग भरली. व त्याचें त्याला प्रायश्चित्त मिळालें!

या जगांत सर्वत्र कर्माचा कायदा आहे. पण तोच कायदा उलट लावून असेंहि म्हणतां येते कीं, ज्या अनेक देशभक्तांनीं निःशस्त्र किंवा सशस्त्र मार्गानें सनदशीर किंवा बेसनदशीर मार्गानें, केवळ १८५७ सालापासूनच नव्हे तर त्या पूर्वीपासूनहि, इंग्रजी सत्तेविरुद्ध झगडा केला, त्या सर्वांच्या इच्छेला व कर्माला परमेश्वरी कृपेनें हें स्वातंत्र्याचें फळ आलें. त्याशिवाय गेलीं दीडशें वर्षे अखंड चाललेल्या या झगड्याची मीमांसा कशी लावतां येईल? हा झगडा करितांना अनेकांनी आपली उभी हयात घालविली आणि अनेकांनी राजकारणाकरिता देहदंड सोसून स्वतःचें बलिदान केलें. या जगांत जर कर्माचा कायदा नसेल तर त्यांच्या बलिदानाचें व वासनांचें पुढें काय झालें? त्या अतृप्त वासना अदृश्य होऊन नाहींशा झाल्या काय? पण हेंहि खरें नाहीं. माणसें मरतात पण त्यांच्या आशा जगतात. त्या आशांचा उदयकाळ, आज ना उद्यां खचित् कधींतरी येईलच येईल अशी त्यांना आशा असते म्हणूनच माणसें प्रसंगीं मृत्यूलाहि भीत नाहींत.

The dead do not fear death.
But they hope in the resurrection.

असें बायबलमध्यें म्हटलें तें खरेंच आहे. कांहींहि असो. १८५७ सालीं ज्या लोकांनीं स्वराज्याच्या आकांक्षेने बलिदान केलें त्यांच्या आकांक्षांवर आज शंभर वर्षांनीं यशाचा मुगुट चढून त्या सफळ झाल्या आणि आज हिंदुस्थानला स्वराज्याचे दिवस दिसून त्यांच्या सर्व श्रमांचे पांग फिटले असें म्हणतां येईल! दहा वर्षांपूर्वी ब्रह्मवर्तास गंगेच्या तीरावर तिच्या विस्तीर्ण पात्राकडे पाहात बसलो असतां १८५७ सालचा हा सर्व इतिहास मनांत येऊन, त्या महायज्ञांत समग्र पेशवेकुल नष्ट झालें याबद्दल अतिशय वाईट वाटले. आणि त्या पेशवे कुलाचें कांहींतरी ऐतिहासिक ऋण आपण स्मरावे अशा बुद्धीने हें पुस्तक लिहिण्याचा संकल्प केला. तो सत्य संकल्प आज दहा वर्षांनीं सिद्धिस गेला याबद्दल परमेश्वराचें कृतज्ञ बुद्धीने स्मरण करून हें पुस्तक पुरें करतो.



# वृत्तसार

[ वृत्तसार म्हणजे ऐतिहासिक चित्रपट किंवा दोन पानी संक्षिप्त सारांशच होय. पुढें कांहीं महत्त्वाच्या तारखा अशा रीतीनें क्रमवार दिल्या आहेत कीं, मुख्याची गोष्ट त्यावरून सहज लक्षांत यावी. त्यावेळीं परराष्ट्रीय राजकारणाची परिस्थिति काय होती, व एकीकडे हिंदी लोकांचें बंड व इंग्रजांची दडपशाही चालूं असतां, तिकडे विलायतेंत कंपनी सरकारचें राज्य विलायत सरकारनें आपल्या हातीं घ्यावें या वाटाघाटी कशा सुरु होत्या हें पाहून वाचकांनाहि गंमत वाटेल ! ]

## सन १८५६

७ फेब्रुवारी — अयोध्येचें राज्य खालसा

मार्च — **क्रीमियांतील युद्धाचा शेवट**

,, — धर्मस्वातंत्र्याचा कायदा

१ नोव्हेंबर — **पर्शियाविरुद्ध इंग्लंडची युद्धघोषणा।**

६ ,, — कॅनटन बंदरावर इंग्रजांची चढाई

११ डिसेंबर — नागासाकी येथें जपानशीं भांडण

## सन १८५७

२ जानेवारी — डमडम येथील काडतुसांचें प्रकरण

१९ फेब्रुवारी — बेहेरामपुरच्या पलटणीचा सत्याग्रह

३ मार्च — हाऊस ऑफ कॉमन्स व लार्ड सभा चीन व पर्शियांतील अनधिकृत युद्धाचा निषेध करतें. प्रधानमंडळ पार्लमेंट बरखास्त करतें

४ मार्च — **इंग्लंड व पर्शियामध्यें पॅरिस येथें तह**

२९ ,, — बराकपुरच्या ३४ वे पलटणीचा सत्याग्रह

१० मे — **मीरत येथें १८५७ चे बंडास प्रारंभ**

११ मे — बंडवाले दिल्ली काबीज करतात.

४ जून — नीमच बनारस व झांशी येथे बंड
( लक्ष्मीबाई बंडास सामील होत नाहीं. )
६ जून — कानपूर येथील बंड
७ ,, — जालंदर व फिरीझपूर येथें दंगे
२७ ,, — सत्तावनी संघर्षाची बातमी विलायतेस प्रथम पोंचतें
१ जुलै — मह्रूच्या छावणींत बंड;
,, — **लखनौच्या वेढ्याची सुरवात**
४ जुलै — हेनरी लॅारेन्स याचा मृत्यू
१२ जुलै — फत्तेपूर येथें बंडवाल्यांचा पराभव
१५ ,, — बिबीघरांतील कत्तल
१६ ,, — नानासाहेबांचा पराभव–हॅवेलॅाकचा कानपुरांत प्रवेश
२७ ,, — आरा येथें कुंवरसिंहाचें बंड
१ ऑगष्ट — कोल्हापूर येथील गडबड
१२ ,, — जगदीशपूरचे लढाईंत कुंवरसिंहाचा पराभव
२८ ,, — पेशावर येथें बंड
१४ सप्टेंबर — **दिल्लीचा पाडाव**
१० ऑक्टोबर— ग्वालेरची कंटिजंट फौज बंडास मिळते
२३ नोव्हेंबर — इंग्रज लखनौ सोडून जातात. हॅवेलॅाकचा मृत्यू
६ डिसेंबर — कानपूरची दुसरी लढाई–नानांचा पराजय
१९ ,, — **विलायत सरकारची हिंदुस्थानचें राज्य स्वतःकडे घेण्याची कंपनी सरकारला नोटीस**
३१ ,, — ब्रिटिश कंतान काबीज करतात.

## सन १८५८

६ जानेवारी— नेपाळचे जंगबहादुरचा इंग्रजातर्फे युद्धप्रवेश
१८ फेब्रुवारी— पार्लमेंटांत इंडिया बिलावर वादविवाद
२१ मार्च — **लखनौचा पाडाव**
२३ ,, — झांशीच्या वेढ्याची सुरवात
९ मे — जगदीशपूर येथें कुंवरसिंहाचा मृत्यु

| | | |
|---|---|---|
| २ जून | — | बँडवाले ग्वालेर सर करतात |
| | | जगदीशपूरचें जंगलांत अमरसिंह ना पत्ता होतो |
| १८ ,, | — | ग्वाल्हेरचे लढाईंत लक्ष्मीबाईचा मृत्यू |
| २४ | — | **इंडिया बिलाचे पार्लमेंटांत दुसरें वाचन** |
| २९ ,, | — | नरगुंदकर भावे यांजकडून मॅनसन याचा वध |
| ८ जुलै | — | **इंडिया बिल कॉमन्ससभेंत पसार** |
| १२ ,, | — | नरगुंदकर फांशी जातात |
| ३१ ,, | — | इंडिया बिल लॉर्डस् सभेंत पसार |
| १ सप्टेंबर | — | कंपनीचे राज्याचा शेवटचा दिवस |
| १ नोव्हेंबर | — | **व्हिक्टोरिया राणीचा जाहीरनामा** |
| ३१ डिसेंबर | — | रामती नदीवरील लढाई |
| | | नानासाहेब नेपाळांत निर्वासित होतात |

## सन १८५९

| | | |
|---|---|---|
| १९ एप्रिल | — | तात्या टोपे फांशी जातात |
| ८ ऑक्टोबर | — | नानासाहेबांचा नेपाळांत मृत्यू |

# Bibliography ( आधार ग्रंथ )

## Histories

1 Kaye–History of the Sepoy War. 3 Vols
2 Malleson–History of the Indian Mutiny. 6 Vols
3 History of British Empire–Dr. Nolan. 2 Vols
4 Martin–The Indian Empire.
5 Medowes Taylor–History of India.
6 Torrens– Empire in Asia.
7 Evans Bell– Empire in India.
8 Forrest–Selections from Indian records. 3 Vols
9 Justin Maccarthi–History of our times. 6th Vol
10 Evans Bell– Prospects and Retrospects
11 John Dikinson–Unheard counsellor
12 Edward Lecky–Fictions connected with 1857
13 Edward Thompson–The other side of the shield
14 Romesh Dutt-India in Voctorian Age.
15 John Bruce Norton–Topics for Indian Statesmen.
16 N. C. Kelkar– Case for Indian Home Rule.
17 Asoka Mehta–1857, The great Rebellion.
18 Maclaod Innes–The sepoy Revolt.
19 ,, ,, –Mutiny in Oudh.

## Memoirs and Reminiscences.

20 William Russel– My diary in India– 2 Vols.
21 Mitchell–Reminiscences of the great Mutiny.
22 Dr. Sylvester–Recollections of Campaign in Central India.
23 Life of medows Taylor.
24 Mackenzi– Six years in India.
25 Sir George Campbell–Memoirs of my Indian Career.

26 Lord Roberts–Fortyone years in India
27 Charters Macpherson–Memorial of service in India.
28 Thornton–Sir Richard Meade
29 Metcalphe–Two narratives of Delhi
30 Fred Roberts–Letters written during the Indiān Mutiny.
31 H. W. Sherer–Havelock's march on Cawnpore
32 Trevelyan–Cawnpore.
33 Mowbray Thomson–Story of Cawnpore

## मराठी साधनें

३४ वरसईकर गोडसे–बंडाची हस्तलिखित बखर
३५ चिं. वि. वैद्य–संपादित 'माझा प्रवास'
·६ पारसनीस–महाराणी लक्ष्मीबाईचें चरित्र.
३७ आपटे घराण्याचा इतिहास
३८ फाळके घराण्याचा इतिहास

वरील सर्व मराठी व इंग्रजी साधनांत वरसईकर **गोडसे यांची बखर** हें अगदीं अस्सल पहिल्या प्रतीचें साधन आहे हें नमूद करावेसें वाटतें. झांशी येथील सुप्रसिद्ध वेढा व बीजन यांत तो समक्षच हजर होता यामुळें त्याची हकीगत इतकी अपूर्व आहे कीं, त्याची सर कोणत्याच पुस्तकाला येणार नाहीं! मराठी वाङ्मयांतील सर्वोत्कृष्ट अशा सहा पुस्तकांत ती. तात्यासाहेब केळकर यांनीं या बखरीचे नांव घेतलें, त्यावरूनहि या पुस्तकाची योग्यता किती मोठी आहे हें लक्षांत येईल! सावरकरांचें पुस्तक चाळीस वर्षें अज्ञातवासांत होतें तर या पुस्तकानें पन्नास वर्षें अज्ञातवास भोगला! बंडाची नुसती हकीगत देखील प्रथम पंचवीस वर्षें कोणी टांकानें लिहिणें शक्य नव्हतें. पुढें सन १८८३ ज्या डिसेंबरांत श्री. चिंतामण-रावजी वैद्य यांचे आग्रहाखातर ती लिहिली गेली. पण गोडसे भटजींच्या हयातींत ती छापूं नये असा सल्ला मिळाल्यामुळें ती अज्ञातवासांत राहिली. पुढें १९०७ सालीं, म्हणजे बंड होऊन पन्नास वर्षें झाल्यावर "माझा प्रवास" असे नांव देऊन चिंतामणराव वैद्य यांचे नांवावर ती प्रथम प्रसिद्ध झाली! सांवरकरांचे पुस्तकांत

